महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला – संच

श्रीमंत सयाजीराव गायकवाड

प्रकाशक
दीपक वसंत खाडिलकर
प्रकाश वसंत खाडिलकर
श्री गंधर्व-वेद प्रकाशन
१२८६ सदाशिव पेठ
चिमण्या गणपतीजवळ
पुणे ४११ ०३०
दूरध्वनी । ०२०-२४४९३५०२
भ्रमणध्वनी – दीपक । ९८२३१९०७३४ प्रकाश । ९४२२०८६०८४



मुखपृष्ठ । मोहन थत्ते

अक्षररचना । प्रकाश बाळकृष्ण ढवळे

मुद्रितशोधन । विजय सरदेशपांडे
संदीप तापकीर

मुद्रक । सचिन कुलकर्णी
एक्सेल प्रिंटिंग अँड पॅकिंजिंग
१३१/५ एरंडवन, पुणे ४११ ०३८

प्रकाशन । नोव्हेंबर २०१०

मूल्य । ₹ २२०

नानासाहेब पेशवे भावनगरजवळ सिहोर
येथे एका गुहेत गुप्तपणे १९०२ पर्यंत राहिले.
त्यांचे १८५७ चे सहकारी गुजराथेत १९०६ पर्यंत
आजूबाजूच्या गावी राहात होते. ते एकमेकांशी
कबुतरांमार्फत संपर्क साधत असत.
मल्हारराव आणि सयाजीराव गायकवाड यांच्याशी
त्यांचे चांगले संबंध होते. त्यांची कागदपत्रे आणि
डायरी वाचून मला वेगळ्याच पण स्फूर्तिदायक
इतिहासाचा साक्षात्कार झाला आणि एक निराळीच
दृष्टी प्राप्त झाली. ते बहुमोल ऐतिहासिक साहित्य
मला उपलब्ध करून देणाऱ्या सनत मेहता[१]
आणि भास्कर व्यास[२] या माझ्या भावनगरी मित्रांना,
वर्ध्याच्या गांधीजींच्या आश्रमात वाढलेल्या
विष्णू करंदीकर या परम स्नेह्यास आणि त्यानंतर
या संशोधनात मार्गदर्शन करणाऱ्या
मुंबईकर सेतु माधवराव पगडी
यांना हा छोटा ग्रंथ सप्रेम, सादर अर्पण.

—दादूमिया



# प्रकाशकीय

आजच्या आधुनिक महाराष्ट्राच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण करणाऱ्या ६१ लोकाग्रणींच्या व्यक्तित्व, चरित्र आणि कर्तृत्वाची गाथा या चरित्र ग्रंथमालेच्या रूपाने जनताजनार्दनाच्या चरणी सादर करताना मनस्वी समाधान वाटते आहे.

'श्री गंधर्व-वेद प्रकाशना'ची प्रकाशने प्रामुख्याने विद्यार्थी व शिक्षकवर्गाला उपयुक्त ठरतील अशी असतात. संदर्भमूल्य असणारी पुस्तके प्रकाशित करण्याचे वेगळेपण आम्ही सुरुवातीपासूनच शक्यतो जपत आलेलो आहोत. त्यामुळेच, महाराष्ट्र राज्य निर्मितीचा सुवर्ण महोत्सव अभिनव पद्धतीने साजरा करण्यासाठी आगामी पिढ्यांतील विद्यार्थी, शिक्षक तसेच सर्व मराठी भाषक जिज्ञासू वाचकांना उपयुक्त ठरेल असा कोणता एखादा ग्रंथनिर्मिती प्रकल्प आपल्या प्रकाशनातर्फे हाती घ्यावा, याबाबतचे विचारचक्र २००५ पासूनच मनात घोळत होते. त्याच दरम्यान इतिहासाचार्य वि० का० राजवाडे यांचे 'राजवाडे लेखसंग्रह भाग ३ – संकीर्ण निबंध' हे पुस्तक वाचताना 'महाराष्ट्रातील बुद्धिमान, प्रतिभावान व कर्त्या लोकांची मोजदाद' हा निबंध विशेष आवडला (मूळ लेख लोकशिक्षण (सातारा) शके १८३५ इ० स० १९१३, पृ० ३७७ ते ३८४) त्या लेखात वि० का० राजवाडे यांनी महाराष्ट्रातील सार्वकालीन महत्त्वाच्या अशा 'बुद्धिमान, प्रतिभावान व कर्त्या' ४३ व्यक्तींची यादी दिलेली आहे. त्या सर्व व्यक्ती इसवी सन १८९३ ते १९१३ या कालखंडातील म्हणजेच एकोणिसाव्या शतकातील आहेत असे लक्षात आले. याच धर्तीवर, १९१४ ते २००५ या कालखंडातील लोकोत्तर व्यक्तिमत्त्वांची गणना करून ती सूची अद्ययावत का बनवू नये, असा विचार मनात चमकून गेला. पटकन आठवणाऱ्या नावांची यादी केली, तेव्हा ८०-९० नावे पुढे आली.

यादी तर तयार झाली. या यादीतील कित्येक नावे आजच्या पिढ्यांच्या केवळ कानावरूनच गेलेली आहेत, हे त्या यादीवर नजर टाकताच प्रकर्षाने जाणवले. मग, महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त आपण आपल्या

प्रकाशनातर्फे आजच्या महाराष्ट्राच्या सर्वांगीण प्रगती-समृद्धीस आकार देणाऱ्या, त्याची जडण-घडण करण्यासाठी हयात वेचून काळाच्या पडद्याआड गेलेल्या या लोकोत्तरांचा जीवन-कर्तृत्वपट ग्रंथरूपाने समाजासमोर मांडलाच पाहिजे, असे प्रकर्षाने वाटून गेले.

अशा किती लोकोत्तरांची जीवनचरित्रे एकाच वेळी (संचाच्या स्वरूपात) आपण प्रकाशित करू शकतो याचा विचार मग सुरू झाला. आमच्या आर्थिक क्षमतेचा आणि शक्यतेचा विचार केला, तेव्हा ६० चरित्रे आपण प्रकाशित करू शकू, असा विश्वास वाटू लागला. त्या दृष्टीने मग पुन्हा यादीचा विचार सुरू केला. इतिहासाचार्यांनी तयार केलेल्या ४३ व्यक्तींच्या यादीपैकी, ज्या १५ व्यक्तींसंदर्भातील पुरेसे संदर्भ साहित्य, तपशील, लेखनसाधने, संशोधन सामग्री उपलब्ध होणे आजमितीस दुष्कर असल्याचे ध्यानी आले त्या १५ व्यक्तींचा विचार प्रस्तुत प्रकल्पासंदर्भात बाजूला ठेवावा लागला. म्हणजे एकोणिसाव्या शतकातील २८ आणि आमच्या मनात विसाव्या शतकातील जी ८०-९० नावे आली होती, त्यापैकी ३२ नावे निवडायचे ठरवले. ही निवड करण्याचे काम अतिशय अवघड आहे असे लवकरच लक्षात आले.

महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला (संच स्वरूपात) करण्याचे आम्ही निश्चित केले, तेव्हा त्यासाठी तितक्याच तोलामोलाच्या संपादकाचा शोध आम्ही सुरू केला होता. पूर्वीपासूनच परिचय असलेल्या अरुण टिकेकर यांना भेटून आमच्या मनातील चरित्र-ग्रंथमाला संचाची कल्पना त्यांच्यासमोर विस्तृत स्वरूपात मांडली. अरुण टिकेकर यांनी प्रदीर्घ विचारविनिमयाअंती आमच्या कल्पनेला सहमती दर्शवली. 'मोठ्या प्रकल्पाचे काम करताना संपादक मंडळ असावे' अशी भूमिका टिकेकर यांनी मांडली. मग त्यांच्या सल्ल्याने द० ना० धनागरे आणि प्र० ना० परांजपे यांच्यासमोर वरील कल्पना मांडून त्यांची सहमती मिळवली. तसेच अभय टिळक, विनोद शिरसाठ आणि आ० श्री० केतकर यांना विचारून त्यांचा साहाय्यक संपादक म्हणून प्रकल्पात सहभाग निश्चित केला.

आता ३२ व्यक्तींची निवड करण्यासाठी प्रमुख संपादक, साहाय्यक संपादक व सल्लागार मंडळ (शं० ना० नवलगुंदकर, प्र० ल० गावडे व द० दि० पुंडे, कै० डॉ० अरविंद लेले व कै० गं० ना० जोगळेकर) आणि वाचनामध्ये रुची असणारे आमचे काही विचक्षण ग्रंथप्रेमी सुहृद त्यांची मते आजमावली. त्या वेळी लक्षात आले की, प्रत्येक यादीत २० नावे समान आहेत. त्यामुळे एकोणिसाव्या शतकातील २८, अधिक सर्वांनीच निवडलेली २० अशा एकूण ४८ नावांवर शिक्कामोर्तब झाले. त्यानंतर संपादक मंडळ, साहाय्यक संपादक आणि सल्लागार

यांच्याशी सर्वंकष चर्चा-विचार विनिमय करून आणखी १३ नावे निश्चित केली. या सगळ्यात चरित्रलेखकांची मुळातील संकल्पित ६० ही संख्या ६१ वर गेली.

हाती घेतलेल्या या प्रकल्पाचे आकारमान, हाताशी उपलब्ध असलेला वेळ व मनुष्यबळ आणि मुख्य म्हणजे या प्रकल्पाची वित्तीय बाजू ध्यानात घेता, चरित्र नायकांची संख्या ६१ पेक्षा अधिक न वाढवण्याचा निर्णय घेतल्याने जीवनाच्या काही अंगांतील लोकोत्तर व्यक्तींचा अंतर्भाव त्यात करता आलेला नाही, याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे. समाजकारण, इतिहाससंशोधन, समाजसेवा, पत्रकारिता, साहित्य, तत्त्वज्ञान यांसारख्या क्षेत्रांत उत्तुंग कामगिरी बजावलेल्या बुद्धिमान, प्रतिभावान आणि कर्त्या व्यक्ती अनेक होऊन गेल्या याची आम्हास कल्पना असूनही काही मर्यादा या घालून घ्याव्याच लागल्या, त्याला पर्याय नव्हता.

एका परीने बघितले तर, या ग्रंथमालेत अंतर्भूत असलेल्या ६१ लोकोत्तर व्यक्तिमत्त्वांचे चरित्र आणि कर्तृत्व शब्दबद्ध करणारा हा ११ हजार छापील पानांचा दस्तऐवज म्हणजे आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीचा साद्यंत आलेखच होय. या संपूर्ण प्रकल्पाची कार्यवाही नेटाने, शिस्तीने आणि शुद्ध संशोधकीय पद्धतीने घडून यावी यासाठी या प्रकल्पाचे सुकाणू पेलण्याची जबाबदारी अरुण टिकेकर, द० ना० धनागरे आणि प्र० ना० परांजपे यांच्यासारख्या तज्ज्ञ, व्यासंगी अभ्यासकांनी स्वीकारली याचा अतिशय आनंद आहे. या ग्रंथसंच प्रकल्पात समाविष्ट असणाऱ्या ६१ समाजपुरुषांचे व्यक्तित्व, कर्तृत्व आणि चरित्र संशोधकीय शिस्तीने परंतु वाचनीय व सुबोध शैलीत अक्षरबद्ध करणारा व्यासंगी संशोधक लेखकांचा सक्रिय सहभाग लाभणे, ही प्रस्तुत प्रकल्पाची दुसरी मोठी कमाई म्हणावयास हवी.

ही महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला प्रमुख संपादक, साहाय्यक संपादक, प्रकल्पाचे सल्लागार मंडळ, साहित्यक्षेत्रातील जाणकार मित्र आणि सर्वांत महत्त्वाचा भाग असलेले आमचे सर्व लेखक, चित्रकार रविमुकुल आणि मोहन थत्ते, अक्षररचना व मांडणीकार प्रकाश बाळकृष्ण ढवळे, मुद्रितशोधन करणारे विजय सरदेशपांडे, संदीप तापकीर, ज्योती टिळक, मुद्रक सचिन कुलकर्णी व बांधणीकार सुनील गोविलकर, चित्रा भावे आणि आमच्या कार्यालयीन व्यवस्थापिका अश्विनी सुमंत यांच्या निरलस सहकार्यामुळेच आज साकार झालेली आहे, हे आवर्जून नमूद केलेच पाहिजे.

या चरित्रग्रंथ प्रकल्पाचे शिवधनुष्य 'श्री गंधर्व-वेद प्रकाशन' या आमच्या संस्थेने का उचलले, असा प्रश्न कोणाच्याही मनात स्वाभाविकच उमटावा. महाराष्ट्र राज्य स्थापनेचा सुवर्ण महोत्सव हे तर एक मुख्य कारण होतेच. परंतु या मोठ्या

धाडसामागे आणखीही एक भूमिका आहे. मराठेशाही अस्तंगत होऊन ब्रिटिश अंमल येथे स्थिरावणे, ही एक अतिशय मूलगामी आणि बहुआयामी प्रक्रिया होती. ते स्थित्यंतर केवळ राजकीय नव्हते. सांस्कृतिक, सामाजिक, भाषिक अशी अनेकानेक परिमाणे त्यास होती. सर्वांगीण बदलांच्या वेगवान प्रवाहात जोराने फेकल्या गेलेल्या मराठी समाजाची नव्याने, कालोचित आणि प्रगल्भ पुनर्रचना करण्याचे जबरदस्त आव्हान तत्कालीन समाजातील तितक्याच कर्तृत्ववान व्यक्तींनी पेलले. मराठी समाजमानसाची जडणघडण नव्याने करण्यासाठी त्यांनी आपली आयुष्ये वेचली. खस्ता खाल्ल्या. समाजबांधणीच्या त्या कामास संस्थात्मक तसेच व्यवस्थात्मक अधिष्ठान लाभावे यासाठी संस्था स्थापन केल्या, वाढवल्या.

आज जागतिकीकरणाच्या वेगवान प्रवाहात लपेटल्या जात असलेल्या विद्यमान पिढ्यांची अवस्था फारशी निराळी नाही. आजचा मराठी समाजही परिवर्तनाच्या नानाविध लाटांना सामोरा जातो आहे. परंपरेचा धागा पूर्णपणे तुटलेला नसला तरी परंपरा आणि नवता यांचे संतुलन सांभाळताना आपल्या सर्वांचीच तारांबळ उडते आहे. अशा परिस्थितीत, या समाजपुरुषांची जीवन-चरित्रे आपण डोळसपणे न्याहाळावी, आपल्यावरील जबाबदारीचे भान त्यातून आपल्याला येऊ शकेल अशी प्रेरणा मनीमानसी निर्माण झालेल्यांसाठी संदर्भ ठेवा म्हणून हा ग्रंथसंच मार्गदर्शक ठरला तर हे शिवधनुष्य उचलण्यामागील ईप्सित पूर्णपणे साध्य झाले, याचे समाधान लाभेल. आजच्या २१ व्या शतकातील प्रगत महाराष्ट्रात नांदणाऱ्या प्रगल्भ पिढीला पूर्वसुरींच्या कर्तृत्वाचे दर्शन घडवण्या-बरोबरच तिच्या कर्तव्याचीही जाणीव करून देणे, या नम्र हेतूने हाती घेतलेल्या या प्रकल्पास आजचा मराठी भाषक समूह उचित असा प्रतिसाद देईल, याची खात्री आहे.

दीपक खाडिलकर
प्रकाश खाडिलकर

# महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला
(संच)

संपादक

---

अरुण टिकेकर

द० ना० धनागरे

प्र० ना० परांजपे

साहाय्यक संपादक

---

अभय टिळक

विनोद शिरसाठ

आ० श्री० केतकर

सल्लागार मंडळ

---

कै० गं० ना० जोगळेकर

कै० डॉ० अरविंद लेले

शं० ना० नवलगुंदकर

द० दि० पुंडे

प्र० ल० गावडे

विशेष साहाय्य

---

माजी खासदार अण्णा जोशी

धनंजय पुरोहित

रविमुकुल

ज्योती टिळक

रामकृष्ण जोशी

राजेंद्र जोशी

अच्युत गणेश फडके

महेश घोडके

अरविंद तेलकर

कार्यालयीन व्यवस्थापिका

---

अश्विनी सुमंत



# लेखक-परिचय

दामोदर विष्णू नेने ऊर्फ दादूमिया.

व्यवसायाने डॉक्टर, वडोदरा येथे स्वतःचे रुग्णालय,

वडोदरा येथील डॉक्टरांच्या संघटनांशी आणि वैद्यकीय संस्थांशी संबंधित विविध पदे भूषवली.

वडोदरा येथील रोटरी क्लबचे माजी अध्यक्ष.

इंग्रजी, मराठी, हिंदी आणि गुजराथी भाषांमध्ये अनेक दैनिकांतून आणि नियतकालिकांतून विविध विषयांवर लेख प्रकाशित, मराठी व इंग्रजीमध्ये विविध विषयांवर पुस्तके प्रकाशित.


नेने क्लिनिक
पोलीस ग्राऊंड समोर
खारीबाव, रावपुरा,
वडोदरा.
दूरध्वनी : (०२६५) २४३४३६१
भ्रमणध्वनी : ९८९८५७१९५६



# मनोगत

भारताच्या ताज्या इतिहासामध्ये इंग्रजी 'एस' आद्याक्षराने सुरू होणारे पाच दुर्दैवी नेते आहेत – शिवाजी महाराज, बडोदा नरेश सयाजी, स्वातंत्र्यवीर सावरकर, नेताजी सुभाषचंद्र आणि सरदार पटेल. इंग्रजांनी शिवाजीचा इतिहास विकृत करण्याचा घाट घातला; पण इतिहासचार्य वि० का० राजवाडे यांनी त्याविरूद्ध अशी फौज खडी केली की, इंग्रजांना सपशेल यशस्वी माघार स्वीकारावी लागली. त्यानंतर कोणा बाटग्याने टाइम्समधून 'शिवाजी का पावभाजी?' अशी अभद्र चळवळ सुरू केली, पण बाळासाहेब ठाकरे यांनी डोळे वटारताच मामला थंड पडला.

मल्हाररावयांच्याप्रमाणे सयाजीरावांनाही पदच्युत करायचेच, असा इंग्रज अधिकाऱ्यांनी चंग बांधला आणि योजनेनुसार त्यांच्या बदनामीची मोहीम सुरू केली. सुदैवाने दोन महायुद्धांनी सयाजीरावांना वाचवले. त्यांच्या स्वजातीयांनी त्यांच्या संस्कृतप्रेमामुळे आणि शिक्षणाच्या आग्रहामुळे त्यांना 'भटाळलेला राजा' अशी हेटाळणीपूर्वक कुजबूज सुरू केली. सयाजीरावांचे भाग्य असे थोर की, 'पुणे-बडोदे ॲक्सिस' त्या लोकांना फारसे माहीत नव्हते, म्हणून ते वाचले. अजून बडोद्यामध्ये संभाजी ब्रिगेड यशस्वीपणे आयात केली गेलेली नाही.

उरलेल्या तीन 'स'कार नेत्यांची अजून साडेसाती संपलेली नाही. त्यांचा अज्ञातवास अजून सुरूच आहे! घराणेशाहीच्या प्रचाराच्या अविरतपणे फिरणाऱ्या या राक्षसी रोड रोलरपुढे या दुर्दैवी पुरुषश्रेष्ठांचा अहिल्योद्धार करण्यासाठी अजून तरी एखादा धनुर्धारी राम पुढे आलेला नाही! इडापीडा टळो आणि या तीन नेत्यांचे ग्रहण लवकर सुटो, ही परमेश्वराजवळ प्रार्थना.

सयाजीरावांच्या सत्यार्थदर्शनाच्या मार्गात आडवे येणारे त्यांचे वारस होते, हे सांगितले तर आश्चर्य वाटेल. याचे कारण काँग्रेस पक्षाची जबरदस्त धास्ती. हे ऐकून तर तुमच्या आश्चर्याला पारावार उरणार नाही. या अभागी वारसांना आजोबांची वा पणजोबांची खरी थोरवी कधी कळलीच नाही. त्याला आर्थिक कारण तेवढेच

जबाबदार आहे. इंदिराजींनी 'आपण डावे आणि समाजवादी आहोत', अशी प्रतिमा उभी करण्यासाठी त्यांचा आर्थिक झराच आटवून टाकला. निरनिराळी कारणे घेऊन, निरनिराळी माणसे या वारसांपाशी देणगी मागण्यासाठी जात असत आणि ती पाहिजे तेवढ्या प्रमाणात मिळाली नाही म्हणून चिडून, हिरमुसली होऊन घरी परतत असत. कोणत्याही मराठी उत्सवासाठी वा समारंभासाठी या बंदिवान बडोदेकरांना महाराज वा राजमाता सोडून कोणा विद्वान पंडिताला बोलावण्याचे माहीत नसल्यामुळे, या वारसांच्या उपस्थितीत त्यांची शाब्दिक चमचेगिरी करण्याशिवाय अन्य पर्याय काहीच उरत नसे. त्यामुळे आजवर येथील समारंभाचे मराठी प्रसंग मनामध्ये 'सात्त्विक संताप', पण जनामध्ये 'तुम्ही आमचे मायबाप' असे 'शब्दांचे बुडबुडे' उडवण्याचे विनोदी प्रकार सतत घडत गेले आहेत.

एकदा सेतू माधवराव पगडी यांना राजवाड्यात घेऊन जाण्याचा प्रसंग माझ्यावर आला. सयाजीरावांवर एखादे उत्तम मराठी चरित्र असावे, अशी इच्छा त्यांनी फत्तेसिंगरावांजवळ व्यक्त केली. ''तुम्हा इतिहासकारांना सयाजीराव सोडून इतर दुसरे विषय मिळत नाहीत का?'' हा महाराजांचा प्रश्न ऐकून पगडी चाट झाले. ते मवाळपंथी असले, तरी स्पष्टवक्ते होते. ते महाराजांना म्हणाले, ''नेपोलियनवर ५००० वर ग्रंथ लिहले गेले आहेत, हे कदाचित आपल्याला माहीत नसेल, म्हणून सांगितले.'' घरी आल्यावर मी पगडी यांना म्हणालो, ''तुम्ही त्यांच्याकडे पैसे मागाल म्हणून ते घाबरले आणि तसे म्हणाले. काँग्रेसवाल्यांनी त्यांना एवढे लुटले आहे की, त्याचा एक ग्रंथ होईल आणि नेमके तुम्ही निवडणुकीच्या मोसमामध्ये त्यांना भेटलात.''

त्यावर पगडी म्हणाले, ''मी जर त्यांना काँग्रेसवाला आणि लुटारू वाटलो असेन, तर मला त्यांच्या बुद्धीची कीव करावीशी वाटते.''

''येथील सारा प्रकारच विनोदी आहे. यांनी सांगितले म्हणून मी सयाजीरावांचे इंग्रजी चरित्र लिहावयास तयार झालो. त्यांचे म्हणणे, माझे (लेखकाचे) आजोबा आणि वडील दोघेही सयाजीरावांचे वैयक्तिक सचिव होते, त्यामुळे तुम्ही ज्या आपुलकीने चरित्र लिहाल, त्या आपुलकीने दुसरा भाडोत्री माणूस त्या चरित्राला न्याय देऊ शकणार नाही; पण त्यांनी एक विचित्र अट घातली म्हणे. क्रांतिकारकांचे आणि सयाजीरावांचे संबंध होते, असे लिहावयाचे नाही. का तर म्हणे फत्तेसिंहराव काँग्रेसचे बडोद्यामधील खासदार आहेत आणि काँग्रेसला क्रांतिकारकांची नफरत आहे. काँग्रेसने सत्य आणि अहिंसा यांच्या बळावर स्वातंत्र्य आणले, असा या पक्षाचा अधिकृत दावा आहे.''

''मग पुढे काय झाले?''

"मी कळवले, मला असले मिळमिळीत चरित्र लिहण्यामध्ये जराही रस नाही."

"पण का?"

"अहो, माझे आजोबा अरविंदांच्या गंगनाथी असलेल्या बॉब स्कूलचे हिशेब-तपासनीस होते. त्यांचा पगार स्वतः सयाजीराव देत! क्रांतिकारकांना गुप्तपणे मदत देण्याचा अधिकार बडोद्यामध्ये फक्त माणिकराव आणि माझे आजोबा या दोघांनाच होता. माझे वडील सयाजीरावांचे वैयक्तिक सचिव होते. माझ्या काकांनी निवृत्त झाल्यावर आपले आत्मचरित्र लिहावयास घेतले होते. त्यांनी सांगितलेल्या आठवणींमुळे मला खऱ्या अर्थाने सयाजीरावांची ओळख झाली. दुर्दैवाने काका आत्मचरित्र पूर्ण लिहू शकले नाहीत. त्यांच्या पुतण्याने सयाजीरावांचे चरित्र क्रांतिकारकांचा भाग वगळून लिहावयाचे म्हणजे नादानीच म्हणायची!"

माझा सयाजीरावांचा अभ्यास सुरूच होता. त्याचे फळ म्हणून हजार पानांचे सयाजीरावांवर मी एक ऐतिहासिक चरित्र लिहले; पण ते वाचून माझ्या प्रकाशकाने मला ते बाड परत केले आणि नम्रपणे सांगितले, "माफ करा, फुले आणि शाहू महाराष्ट्राची दैवतं आहेत. तुमचा ग्रंथ वाचला की, त्या श्रद्धेला ठेच लागण्याची शक्यता आहे. मला महाराष्ट्रामध्ये राहून धंदा करायचा आहे."

सत्य कटू असते, हे मला ठाऊक होते. मी एकदम नाऊमेद झालो आणि सयाजीरावांचा नाद सोडला. त्या बाडातील माहितीवर दोन-तीन मराठी, इंग्रजी आणि हिंदी चरित्रे, माझे आणि क्रांतिकारकांचे नाव घ्यायचे टाळून इतरांनी प्रसिद्ध केली! एकाने तर त्याच्या पुस्तकाची सुरुवात माझ्या पहिल्या प्रकरणाने केली. 'Greatest plagiarism on earth!' दुसऱ्या आवृत्तीत ते प्रकरण गाळले आहे!

मला खाडिलकरांचा या चरित्रासाठी पुण्याहून फोन आला. त्या वेळी माझा दुसरा प्रकल्प सुरू होता. मित्रांनी सांगितले, "आधी हे चरित्र लिहून काढा, मग तुमचा जुना प्रकल्प आहेच, तो कोठे पळणार आहे? तुमच्याशिवाय या पुरुषश्रेष्ठाचे खरे चरित्र लिहण्याचे कोण धाडस करेल? निदान फॉर द सेक ऑफ रेकॉर्ड, ते तुम्ही लिहिलेच पाहिजे."

मी त्यांना म्हणालो, "सध्या सत्याच्या नावाखाली असत्याची, अहिंसेच्या नावाखाली हिंसेची, लोकशाहीच्या नावाखाली घराणेशाहीची आणि सेक्युलर-वादाच्या नावाखाली जातीपातींची चलती आहे. सयाजीराव खरे राष्ट्रपुरुष होते. त्यांचे राज्य खऱ्या अर्थाने 'रामराज्य' होते. आजच्या खोट्या नाण्यांच्या दुनियेमध्ये हा अस्सल सोन्याचा होन चालण्यासारखा नाही."

मित्र म्हणाले, "नव्या पिढीला एकदा अस्सल म्हणजे काय, हे समजले तर नकली नाण्यांचा सुळसुळाट आपोआप कमी होईल. नवी पिढी आज संभ्रमित झाली

आहे. त्यांना सत्य समजलेच पाहिजे. त्यासाठी तरी तुम्ही तुमच्या लेखणीचा उपयोग करावा.''

मी म्हणालो, ''मला तुमचे म्हणणे पटते. या धार्मिक, सांस्कृतिक, शैक्षणिक आणि राजकीय तालिबानांच्या, मुल्ला-मौलवींच्या आणि खानांच्या देशामध्ये टिकून राहण्यासाठी नव्या पिढीला एका जबरदस्त हिंदू 'आदर्शा'ची आवश्यकता आहे. कमीत कमी मला प्रयत्न तर करू दे. सत्य कटू असेल, अप्रिय असेल; पण ते लोकांपर्यंत पोचवण्याचे काम मला केले पाहिजे.''

''नवीन तरुण पिढीला या जुन्या घटनांमध्ये जराही रस नाही, याची तुम्हाला कल्पना आहे का?''

''चांगली कल्पना आहे. याचे कारण राजकीय पुढाऱ्यांनी आपल्याला खोटा इतिहास शिकवला आहे, याविषयी त्यांची खात्री पटली आहे आणि तो खरा इतिहास मी सांगण्याचा प्रयत्न करत आहे. नेहमीची प्रथा मोडून आणि जगाला त्यांचे असामान्य कर्तृत्व कळावे, म्हणून मी व्यक्तीचित्रणावर भर न देता त्यांच्या कर्तृत्वावर भर दिला आहे. 'राजा कालस्य कारणम' हे निरंतर सत्य आहे. सयाजीरावांचे कर्तृत्व वाचकांना ते पटवून देईल. आज त्यांच्या डोळ्यांसमोर कर्तृत्वशून्य पुढारीच पुढारी चारही बाजूला उभे आहेत. त्यांना पुढाऱ्यांची भीती वाटते.''

वाचकांनी सत्य काय आहे, ते समजून घ्यावे आणि त्यावर विचार करावा.

शब्द माझे बोबडे अन ज्ञान माझे तोकडे।
हिंदपुत्रांनो स्वतःला लेखिता का बापुडे? भ्रांत तुम्हा का पडे?

-दादूमियाँ

पितृच्छाया, खारीवाव,
बडोदे

# अनुक्रमणिका

# १



## उपोद्घात

स्वतंत्र लोकशाहीवादी भारत सरकारने सरकारी आणि आंतरराष्ट्रीय विमान सेवेसाठी बोधचिन्ह कोणते पसंत केले? डोक्यावर फेटा बांधलेला, कमरेत वाकून हसऱ्या चेहऱ्याने आपले स्वागत करणारा महाराजा. एका दशकापूर्वी पंडित नेहरू यांनी याच महाराजांना, ''अत्यंत मागासलेले आणि अजूनही सरंजामशाहीच्या जमान्यामध्ये वावरणारे'' असे म्हटले होते (पं० नेहरू, प्रस्तावना, 'व्हॉट आर द इंडियन स्टेट्स', पृ० १). या जाड्या लाल कोटातल्या हसऱ्या महाराजांना एका-मागून एक येणाऱ्या सर्व सरकारांनी खूप थोपटले आहे. इंग्रज सरकारच्या अधिकाऱ्यांनी त्यांना 'विश्वासू लष्करी सहकारी' म्हटले. हुकूमशहा म्हणून त्यांची निंदा केली. प्रजेचे नैसर्गिक पुढारी म्हणून त्यांना वंदिले. उधळे खुशालचेंडू म्हणून टीका केली आणि त्यांच्या डोक्यावर बसून डोळ्यांमध्ये खुपेल एवढे आदरातिथ्य हावरेपणाने ओरबाडून घेतले. इंग्रजांच्या म्हणण्यामध्ये अर्धसत्य होते. त्यांना बिघडवणारे शेवटी इंग्रजच होते ना?

या 'लाडावलेल्या बाळां'मध्ये दोन प्रकार होते. काही इंग्रजांच्या कृपेने १८५७ नंतर राजे झाले, तर काही तत्पूर्वीपासूनचे राजे होते. पहिल्या गटामध्ये अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकामध्ये राजकीयदृष्ट्या सडलेल्या अस्थिर भारतामध्ये उगवत्या इंग्रज सूर्याला नमस्कार करणाऱ्या आणि महापराक्रमी ईस्ट इंडिया कंपनी सरकारकडून आपले राजेपण भिक्षा म्हणून मिळवणारे शेवटचे पेशवे दुसरे बाजीराव, बडोद्याचे गायकवाड, हैदराबादचे निजाम आणि राजस्थानातील व मध्य भारतातील काही रजपूत संस्थानिक येतात. या प्रयत्नामध्ये त्यांनी कंपनी सरकारला जमीन किंवा रोकड स्वरूपात जबरदस्त मोबदला दिलेला आहे. कंपनी सरकारसमोर अद्ययावत लष्करी तंत्रांमध्ये, शस्त्रांमध्ये तसेच राजनीतीमध्ये आपण म्हणजे चांगलेच कमी पडतो, या जाणिवेतून त्यांना अशी लाचारी पत्करावी लागली. त्यांना स्पष्ट दिसत होते, एवढा घोर अपमानाचा सेतू पार केला की, राजलक्ष्मीचे वैभव आणि शान आपल्यासाठी हात जोडून स्वागतासाठी सज्ज आहे.

क्षात्रतेजाची परिस्थिती १८०५ मध्ये तशी बिकटच होती. पेशव्यांच्या वरवंट्याखाली आपण केव्हा येऊ आणि चिरडले जाऊ, या भीतीने रजपुतांची झोप उडाली होती. त्यातील बरेचसे सत्ताभ्रष्ट होऊन रानावनांमध्ये भटकत होते. शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले आदी पेशव्यांच्या सरदारांसमोर हे रजपूत वीर चळचळा कापत. पुढे तीच परिस्थिती कंपनी सरकारच्या शिंदे-होळकरांनी – वेलस्ली-डलहौसींनी – आणली. एडवर्ड थॉम्पसनने सत्यच लिहिले आहे, ''इंग्रज आले नसते, तर रजपूत वीर मराठ्यांनी केव्हाच नष्ट केले असते. अवधच्या नबाबाचे आणि हैदराबादच्या निजामाचे जीवन 'दिखाऊ' होते. केवळ थोडासा, समय जाण्याचेच बाकी होते.'' (एडवर्ड थॉम्पसन, 'मेकिंग ऑफ द प्रिन्सेस', ऑक्सफर्ड, १९४४, पृ० २४५). वेलस्लीची बालंबाल खात्री झाली होती, आपण 'आगे बढो'चे धोरण स्वीकारले नाही, तर मराठे ते काम करतील. साम्राज्यशाही ही काळाची गरज आहे. ती गरज आपण 'बळकवा आणि मटकवा' हे धोरण पत्करले, तरच ते कार्य यशस्वी होणार आहे. १८४१ मध्ये हे त्याने स्पष्टपणे कंपनीच्या संचालकांना समजावून सांगितले होते. वेलस्लीची तैनाती फौज लादण्याची दादागिरी आणि डलहौसीचा संस्थाने खालसा करण्याचा सपाटा संताजी-धनाजीप्रमाणे सर्व राजांना छळत होता.

ब्रिटिशांच्या मायावी जाळ्यामध्ये निजाम हा पहिला बकरा (१७९८), तर बाजीराव पेशवा आणि गायकवाड थोड्याच काळामध्ये दुसरे व तिसरे बळी ठरले. पाहता पाहता इंग्रजांनी मध्य भारतातील १४३ आणि राजपुतान्यातील १६ लहानमोठ्या विष्णूच्या अवतारांना तारून नेले. १८१८ हे वर्ष वसाहतवादाच्या इतिहासामध्ये सोन्याचे पान ठरावे. पेशव्यांचे सात अष्टमांश तत्कालीन भारताचे सार्वभौमत्व संपुष्टात आले आणि सत्तेचा कौल इंग्रजांच्या बाजूने लागणार, अशी स्पष्ट चिन्हे दिसू लागली. कालाय तस्मै नमः।

इंग्रजी सत्तेच्या आगमनाने पारंपरिक चातुर्वर्ण्याच्या दोन महत्त्वाच्या स्तंभांना आपोआप सुरूंग कसा लागला? ब्राह्मणांना जगायचे असल्यास इंग्रजी शिक्षण घेणे आवश्यक ठरले. सर्वांना भिक्षुकी, सावकारी किंवा शेती करणे शक्य नव्हते. इंग्रजांची नोकरी करणे म्हणजे सरळ सरळ लाचारी आणि गुलामीच होती. सर्वांनाच निःशस्त्र केल्यामुळे आणि सैन्यामध्ये असूनदेखील लढणे सोडून इतर सर्व (बुटांना पॉलीश, सकाळची परेड वगैरे) करावे लागत असल्यामुळे एक प्रकारची सुस्ती, आळस आणि शैथिल्य आले. राजेमहाराजांमध्ये निराळाच 'गंड' निर्माण झाला. काहीही केले तरी चालते, परचक्राचे मायबाप सरकारमुळे कधीच भय नाही, संस्थानामध्ये अंतर्गत बंडाळी झाली, तरी मायबाप सरकार ती मोडून काढणारच

आहे, पूर्वीप्रमाणे ब्राह्मण मंत्र्यांचा नैतिक आणि धार्मिक धाक नाही, तेव्हा आता 'फक्त खा, प्या आणि मजा करा' एवढेच काम आपल्यासाठी उरले आहे, अशी त्यांची समजूत झाली, तर ते अनैसर्गिक नव्हते. पूर्वीचे निर्बंध शिथिल झाल्यामुळे त्यांचे हात स्वर्गाला टेकल्यासारखे वाटल्यास आश्चर्य नव्हते. इंग्रजी अधिकाऱ्यांना जबाबदारीशिवाय हाती सत्ता मिळाली होती. याउलट राजेमहाराजांवर जबाबदारी लादली गेली होती; पण त्यांच्या हाती सत्ता औषधालाही नव्हती. कोणा राजाने इंग्रजी सत्तेविरुद्ध जरा जरी ब्र काढला, तरी त्याला पदच्युत करण्याची सत्ता इंग्रज अधिकाऱ्यांना मायबाप सरकारने दिली होती. थोडक्यात इंग्रज सरकारने ब्राह्मणांना कारकून आणि क्षत्रियांना गुलाम बनवले होते. ब्राह्मणांचा धर्मातील आणि क्षत्रियांचा शासनातील रस कमी झाल्यामुळे राज्यसंस्था अशक्त आणि हुकूमशाहीची बनली. वैश्यांना व्यापार आणि शूद्रांना सेवाच करायची असल्यामुळे राज्य कोणाचे हे त्यांच्यासाठी महत्त्वाचे नव्हते. पूर्वी वाईट सरकार असेल, तर राजवाड्यांमध्ये क्रांती होऊन शासनामध्ये बदल घडे किंवा कोणी जयचंद एखाद्या परकीय महंमद घोरीला स्वारीचे आमंत्रण देई. ब्रिटिशांमुळे दोन्ही शक्यतांचे निवारण झाले होते. आता कोणी विरोधी सूर काढल्यास त्याला क्रूर शिक्षा देऊन, ठोकून काढून स्थैर्य आणि शांतता विकत घेण्याची इंग्रजांनी सोय करून दिली होती. धूर्त इंग्रजांनी प्रजा आणि राजा यांच्यामध्येसुद्धा 'फोडा आणि राज्य करा' हे धोरण अवलंबले होते.

राज्यात बंड नाही म्हणजे सैन्यावरचा खर्च आपोआप वाचतो. त्यामुळे कमी सैन्य पुरते. सैनिकांना काम नसल्यामुळे ती सेना शोभेचीच राहते. एके काळी कंपनीच्या सेनेचा दरारा असे आणि ती त्यांना खूपच स्वस्त पडे! कंपनी सरकारच्या सैन्याचा ४० टक्के खर्च हे वेडे संस्थानिक करत असत (तत्रैव, पृ० २३). उगाच नाही माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनने म्हटले होते, "शिंदे, निजाम आणि रणजितसिंग वगैरे आमच्याविरुद्ध उभे ठाकले असते, तर आमची काय गत झाली असती? संस्थानिक खालसा होण्याच्या अगोदर आम्हाला खालसा व्हावे लागले असते!" (तत्रैव, पृ० २७१)

इंग्रजांचे सारेच वागणे १८५७ च्या सैनिकांच्या उठावानंतर बदलले. त्या उठावाच्या अनुभवाने ते शहाणे आणि सावध झाले. ते त्यापासून दोन धडे शिकले. एक डलहौसी-वेलस्लीचे 'आगे बढो' धोरण येथून पुढे बंद आणि दोन उद्या असे बंड पुन्हा झाले, तर आपल्याला या संस्थानिकांशिवाय कोण तारून नेणार? ही संस्थाने आपल्याला संरक्षणाची पहिली फळी आणि 'धक्का शोषक' म्हणून उपयोगात आणावीं लागतील. त्यासाठी आपले राजनीतीचे सर्व कौशल्य म्हणजे कुटिलता उपयोगात आणावी लागेल. तिची सुरुवात महाराणी व्हिक्टोरियाच्या

जाहीरनाम्याने झाली. ईस्ट इंडिया कंपनीशी राजामहाराजांचे जे करार झाले असतील, ते आम्ही कसोशीने पाळू, असे जाहीर करण्यात आले. त्रेचाळीस वर्षांनंतर पंचम जॉर्ज राजाने त्या आश्वासनाचा पुनरूच्चार केला. त्यानुसार राजे लोकांना संस्थानांतर्गत बाबतीत झुकते माप देण्यात आले. तेथून 'संस्थानिकांच्या अमलाची' (प्रिन्स ऑर्डर) सुरुवात झाली. त्यांचे प्रशिक्षण, त्यांच्या सवयी, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांचा बुद्धिविकास, त्यांची लग्ने, त्यांचे इतर व्यवहार वगैरे बारीकसारीक गोष्टींवर नजर ठेवण्यात येऊ लागली; जेणे करून त्या सर्व गोष्टींचा फायदा साम्राज्याच्या स्थैर्य, समृद्धी, विस्तार आणि शांतता यांना होईल. राजकुमारांना विशिष्ट शिक्षण देण्यासाठी खास केंद्रे उघडण्यात आली. उदाहरणार्थ सौराष्ट्रासाठी राजकोट येथे, मध्य प्रदेशासाठी इंदूर येथे, राजपुतान्यासाठी अजमेर येथे. सर्वांसाठी एका मध्यवर्ती महाविद्यालयाचा कधीच विचार केला गेला नाही. न जाणो, ते संघटित झाले आणि त्यांनी उठाव केला तर? सर केनेथ फिट्झ यांनी लिहून ठेवले आहे, "परंपरा, आजूबाजूचे वातावरण आणि फाजील लाड यांनी या राजकुमारांसाठी बालवयामध्ये असे काही मानस तयार केले जात असे की, कुठल्याही बदलाशी त्यांना जमवून घेता येणे अशक्य व्हावे... अती दक्षता, अती संरक्षण आणि अमली पदार्थांचे सेवन यांनी ही राजकुलातील पोरे बिघडली नाही, तरच नवल" (Fitz Sir Keneth, Twilight of the महाराजा या पुस्तकामध्ये).

रेसिडेंट कितीही उद्दामपणे वागला तरी ते सहन करावयाची मानसिक तयारी याच शिक्षणक्रमामध्ये अंतर्भूत असे. कर्नल मेकॉले नावाचा राजकीय प्रतिनिधी कोचीनच्या महाराजांना तासनतास बसवून ठेवी. एच० ए० विन्सेंट या राजकीय अधिकाऱ्याचे १९ नोव्हेंबर १८९८ चे एक पत्र उपलब्ध आहे. साम्राज्यशाहीचा उग्र दर्प म्हणजे काय? ते पत्र वाचून समजते. त्यामुळे म्हण पडली 'द व्हिस्पर ऑफ द रेसिडेंसी ईज द थंडर ऑफ द दरबार' (K.M. Panikkar, His Highness The Maharaja of Bikaner).

या रेसिडेंटांची आणि संस्थानांतील दिवाणांची निवड इंग्रजांचा राजकीय विभाग करते. याचाच अर्थ ते इंग्रजांनी लादलेले असतात. त्यांच्याशी दुष्मनी म्हणजे पदच्युतीचेच आमंत्रण. उदाहरणार्थ रामपूरचा नबाब (१८६७), मल्हारराव गायकवाड (१८७५), म्हैसूरचे महाराज, इंदूरचे दोन महाराज, अलवारचे महाराज, नाभाचे महाराज वगैरे. त्यांचा उद्दामपणा त्यांच्या भाषेमधून व्यक्त होत गेला. उदाहरणार्थ संस्थानिक प्रमुख झाले; पुढे ते सरंजामदार बनले. त्यांचे सार्वभौमत्व काढून घेण्यात आले. 'सिंहासन' गेले आणि 'गादी' आली. संस्थानिकांची 'लढाऊ

पथके' गेली आणि 'फौज' आली. त्यांचे 'सरकार' गेले आणि 'दरबार' आला. या शाही उर्मटपणाचा १८९९ मध्ये लॉर्ड कर्झनने तर कळसच गाठला.

भवाळपूर येथील नबाबाच्या सत्ताग्रहणाच्या वेळी १९०३ मध्ये केलेल्या भाषणामध्ये हिंदी संस्थानिकांना काहीही सत्ता नाही, 'राजसत्ते'च्या मेहरबानीमुळे त्यांना काही सवलती प्राप्त झाल्या आहेत वगैरे गरळ पण कटू सत्य ओकले. दुर्दैवाने त्याचा कोणाही राजाने निषेध वा विरोध केला नाही. त्यामुळे त्याला जास्त बळ आले आणि त्याने एक फर्मान काढले – ''कुठल्याही राजाने परदेशी जाण्यापूर्वी रेसिडेंटची परवानगी मागितली पाहिजे.'' त्यानंतर त्याने दुसरे फर्मान काढले – ''कुठल्याही राजाने पूर्वपरवानगीशिवाय दुसऱ्या राजाला किंवा संस्थानाला भेट द्यायची नाही.''

थोडक्यात राजांच्या परराष्ट्रीय धोरणावर तसेच संस्थानांतर्गत अधिकारांवर त्याने गदा आणण्याचा प्रयत्न सुरू केला. १९०४ मध्ये बिकानेरच्या गंगासिंहाना वैद्यकीय उपचार घेण्यासाठी मुंबई येथे जायचे होते. रेसिडेंटने ''१० दिवसानंतर निघा,'' असा त्यांना निरोप धाडला. तेवढा वेळ व्हाईसरॉयकडून परवानगी येण्यासाठी आवश्यक होता. गंगासिंह चिडले आणि त्यांनी रेसिडेंटला फसवून मुंबईला प्रयाण केले. सर मिर्झा इस्माईल म्हैसूरचे आणि जयपूरचे दिवाण होते. त्या राज्यांमध्ये त्यांनी लोकशाही आणण्याचा प्रयत्न केला; पण दोन्ही ठिकाणी रेसिडेंटने खूप विरोध केला.

१९१४ मध्ये लॉर्ड हार्डिंगला दोन भारतांमध्ये म्हणजे संस्थानिकांच्या अमलाखाली असलेल्या भारतामध्ये आणि ब्रिटिशांच्या अमलाखाली असलेल्या भारतामध्ये सेतू म्हणून काही तरी यंत्रणा निर्माण व्हावी, अशा अर्थाची सूचना संस्थानिकांनी केली. त्यावर कारवाई झाली, ती तब्बल सात वर्षांनी! ८ फेब्रुवारी १९२१ मध्ये मॉटेंग्यू-चेम्सफोर्ड अहवालानुसार पंचम जॉर्जने एक 'नरेंद्र मंडळ' निर्माण केले आणि गंगासिंहांना तिचे प्रमुख म्हणून नेमण्यात आले. गंगासिंहांनी आग्रह धरला की, ''लॉर्ड रीडिंगनी एक गोलमेज परिषद बोलावून साऱ्या संस्थानिकांचे म्हणणे ऐकावे.'' इंग्रज सरकार त्यामुळे सावध झाले. ''न जाणो, हे सारे एकत्र झाले तर काय?'' गंगासिहांची सूचना सरळ होती – ''प्रत्येक व्हाईसरॉय आणि रेसिडेंट बदलला की, दुसऱ्या म्हणजे नव्या माणसाच्या नव्या कल्पना (व्हीम्स) सुरू होतात. त्यापेक्षा धोरणांमध्ये एकसूत्रता असावी, यासाठी काहीतरी निश्चित नियम ठरवून द्यावे.'' निजामाने सत्तेमध्ये भागीदारीची भाषा असलेल्या जुन्या करारांचा विषय काढताच व्हाईसरॉयनी त्याला त्याची योग्य ती जागा दाखवून दिली आणि चूप बसवले. सरकारने तेथेही ''फोडा आणि राज्य करा''

हे धोरण वापरून नरेंद्र मंडळामध्ये दोन पक्ष निर्माण केले – ताटाखालची मांजरे आणि मर्यादित आकाशात विहरणारी, पण घरी परतणारी पाळीव कबुतरे.

लंडन येथे १९३० मध्ये काँग्रेसच्या गैरहजेरीत गोलमेज परिषद भरवली, तेव्हा हा फरक सर्वांना चांगला जाणवला. राजेमहाराजांच्या प्रतिनिधींनी काय बोलायचे आणि काय नाही, त्याची आधी रंगीत तालीम घेण्यात आली. तेव्हा जाणवले की, सरकारला संस्थानिकांविषयी प्रेम नाही. सशस्त्र क्रांतिकारकांपासून संस्थानिकांची मदत घेऊन स्वतःला कसे वाचवावे, यासाठी ती कसरत होती. गंगासिंहांनी सर तेज बहादूरांच्या सांगण्यावरून २५० प्रतिनिधींच्या संघराज्याची कल्पना मांडली. त्यामध्ये ८६ सर्वसाधारण आणि ८२ मुस्लीम प्रतिनिधी अशी योजना होती. स्त्रिया, जमीनदार आणि कामगार यांच्यासाठी राखीव जागा होत्या. थोडक्यात काँग्रेसला कधीही बहुमत मिळू नये, यासाठी पूर्ण खबरदारी घेतली होती. म्हैसूरच्या सर मिर्झांनी विचारले, ''तुम्ही म्हणता, संघराज्य ३० वर्षांपुरतेच राहील, पण त्यापुढे काय?'' त्यावर लॉर्ड लोथियनांनी उत्तर दिले की, ''त्यानंतर आम्ही सत्तेवर कदाचित नसू.'' (सर मिर्झा ईस्माईल, माय पब्लिक लाईफ).

। । ।

# २



# पार्श्वभूमी

**नानासाहेब पेशवे ( मृत्यू -१९०२)**

दुसरा बाजीराव १८१८मध्ये पुणे पडल्यावर १८५१पर्यंत म्हणजे त्यांच्या मृत्यूपर्यंत इंग्रजांच्या आठ लक्ष रुपयांच्या वार्षिक तनख्यावर ब्रह्मावर्त येथे पश्चात्तापदग्ध मानसिक अवस्थेत जगत होते. डलहौसीने नानासाहेब या त्याच्या दत्तक पुत्रास तो वार्षिक तनखा देण्याचे नाकारले. सातारा (१८४८), झांशी (१८५३) आणि नागपूर (१८५४) येथे त्याच इतिहासाची पुनरावृत्ती झाली. १८५६ मध्ये अवध येथे तसाच धरणीकंप झाला.

नानासाहेब हे शेवटच्या किंवा दुसऱ्या बाजीरावाचे दत्तक पुत्र. त्या आधी सिहोरच्या हर्षरामशास्त्रींच्या हाताखाली त्यांनी काशी येथे अभ्यास केला. कल्याण हा गुरुपुत्र नानांचा सहाध्यायी. ही ओळख पुढे फार कामास आली.

भूराजकारण म्हणजे भौगोलिक परिस्थितीवर आधारलेले राजकारण नानासाहेबांनी चांगले केले. फक्त गीतेमध्ये सांगितल्याप्रमाणे दैव त्यांना नडले, त्याने नेमकी साथ दिली नाही. म्हणून त्यांना सुरक्षिततेसाठी पळ काढावा लागला. मोरोपंत फडके हे नानासाहेबांच्या वेषामध्ये होते. ते नेपाळमध्ये पकडले गेले आणि नानासाहेब सुरक्षितपणे तेथून निसटले. जम्मू, लैलापूर, कोटली, मुलतानमधील रीया, खैरपूर, हिंगलाज, पर्शिया आणि त्यानंतर समुद्रमार्गाने कराची, रणू, रामदेव, पीर, कच्छ, मोरबी या मार्गे ते सरतेशेवटी भावनगरजवळ सिहोर या ब्रह्मपुरीत 'योगिंद्र दयानंद' म्हणून स्थायिक झाले. सिहोरजवळील भावनगर संस्थानचा राजा त्यांना अनुकूल होता. ते जंगलामध्ये गुहेत राहात असत. त्यांच्यापाशी भरपूर संपत्ती होती. त्यांचे हेरांचे जाळे व्यवस्थित आणि सक्षम होते. त्यांच्या मदतीने नवसारीचे तात्या टोपे (स्वामी टहलानंदजी), कर्नाळीचे रंगो बापू (स्वामी ब्रह्मानंदजी) वगैरे सहकाऱ्यांशी कबुतरांच्या मार्फत संपर्क साधणे सोपे होते. अजून येथे रेल्वे आली नव्हती. समुद्रमार्गे पळून जाणे तसे सोपे होते (The Organiser,

Weekly, New Delhi, 1 March, 1975). तात्या टोपे नवसारीच्या नृसिंहजी टेकडीवर संत टहलदासजी (भ्रमण करणारे) म्हणून १८६२ पासून राहू लागले. १९०५ मध्ये ते मरण पावल्यावर सयाजीरावांनी नवसारीत भगवा ध्वज अर्ध्यावर आणला होता. त्यांचे खास विश्वासू बॅ० केशवराव देशपांडे नवसारीस सुबे (कलेक्टर) होते! आज तेथे संत टहलदासांचा पुतळा दिसतो! कल्याणजी हा गुरुबंधू नानासाहेबांजवळ होता. सारे काही व्यवस्थित चालले होते. (तत्रैव).

नानासाहेबांचे परराष्ट्रीय धोरण आजच्या भाषेत 'साम्राज्यवादी' म्हणता येईल असे वाटेल; पण ते १०० टक्के कटू सत्य आहे (आमच्या नादानपणाने आमचा फार मोठा भूभाग आम्ही घालवला आहे). नानासाहेब लिहितात, "आमची सरहद्द हेराज ते सिंह (गा) पूर आणि गझनी ते श्रीलंका ही आहे. जावा, सुमात्रा आणि बाली बेटे आमचीच आहेत. मुसलमान आमचे बंधू आहेत; पण आम्ही त्यांना परत आमच्या धर्मात स्वीकारू शकलो नाही. त्यामुळे आम्हीच आमचा नाश केला" (तत्रैव).

## रंगो बापूजी

रंगो बापूजी हा आधुनिक भारतीय परराष्ट्रीय धोरणाचा पहिला रचनाकार. एके काळी सातारच्या छत्रपतींचे भले करण्यासाठी चिटणीस बंधू आणि चतुरसिंग भोसले यांच्याबरोबरीने पुण्याच्या पेशव्यांची सारी गुप्त माहिती इंग्रजांना सांगण्याचे पाप याने केले होते. ३ डिसेंबर १८२२ च्या एका लिहिलेल्या पत्रामध्ये पेशव्यांचे अन्न खाऊन आपण त्यांच्याच पाठीत कसा वार केला आणि कर्नल ब्रिग याला कशी मदत केली, याची सविस्तर माहिती आढळते. पेशव्यांचा खजिना आणि तोफा या रंगो बापूजीने ब्रिग साहेबाच्या पदरात टाकल्या! मतलब साधताच ब्रिग साहेबाने रंगो बापूजी आणि छत्रपती या दोघांना बुडवले. तो छत्रपतींच्या 'माफीपत्रावर सही करा' म्हणून मागे लागला. छत्रपतींनी सही करण्याचे नाकारले आणि आपली केस लढण्यासाठी रंगो बापूजीला लंडन येथे धाडले. १८४७ मध्ये छत्रपतींचे निधन झाल्यामुळे रंगो बापूजीच्या सर्व मेहनतीवर थंड पाणी ओतले गेले. २४ डिसेंबर १८४७ रोजी ईस्ट इंडिया कंपनीच्या हॉबहाऊस या अध्यक्षाने गव्हर्नर जनरलला पत्र लिहिले, "प्रतापसिंह कसा वेळेवर मेला! हल्लीचा राजा तर आजारीच असतो. तो निपुत्रिक मेला की, सातारा खालसा करायला आपल्याला किती वेळ?"

रंगो बापूजी १८५३ च्या डिसेंबरमध्ये लंडनहून परत येण्यासाठी निघाला. त्याची आर्थिक परिस्थिती अत्यंत बिकट होती. भारतामध्ये कंपनी विरुद्ध त्याने फार आरडाओरड करू नये यासाठी खर्चापोटी कंपनीने त्याला २,५०० पौंड रक्कम दिली तसेच भारतात परत जाण्याचे तिकीटही दिले. रंगो बापूजी हा छत्रपतींचा वकील

आणि अझिमुल्लाखान बादशहाचा वकील. दोघे एकमेकांना लंडनमध्ये भेटत आणि युरोपीय राजकारणाची चर्चा करत. दोघांनी लंडन येथे राहून इंग्रज लोक, इंग्रज राजकारणी, इंग्रज सैनिक आणि इंग्रज शासनव्यवस्था यांचा सखोल अभ्यास केला होता. युरोपीय राजकारणावरील आणि राजकीय मानसशास्त्राविषयक बरीच पुस्तके रंगो बापुजी यांनी खरेदी करून, भारतात आणली. रंगो बापूजीने आपल्याबरोबर झील नावाचा एक गोरा साहेब आणला होता. तो शस्त्रनिर्मितीमध्ये निपुण होता. लंडनहून आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञान यावर एक भली मोठी लोखंडी पेटीभरून पुस्तके आणि साहित्य त्यांनी भारतामध्ये आणले होते.

आल्या आल्याच रंगो बापूजींना धक्का बसला. इंग्रजांनी झील सर्पदंशाने मेल्याचे जाहीर केले. ''पण आमची लोखंडी पेटी कोठे आहे?'' त्यांनी इंग्रजांना विचारले. इंग्रजांनी उत्तर दिले, ''माहीत नाही.''

रंगो बापूजींना मुंबई बंदरावरील त्याचे स्वागत आठवले. तेथे हजारो माणसांनी गर्दी केली होती. जगन्नाथ शंकर शेठ, सर जमशेटजी जीजीभाई वगैरे मंडळी त्यामध्ये होती. त्यांनी सावधपणे रंगो बापूजींना बजावले ''सांभाळून राहा, काहीही दगाफटका होऊ शकतो, घाई करू नका.''

आपण स्वागत समारंभाच्या प्रसंगी बेसावध राहिल्यामुळे, आधुनिक शस्त्र-निर्मितीचा तंत्रज्ञ आणि त्यासंबंधीचे साहित्य यांना एकाएकी पारखे झालो, हे त्यांच्या लक्षात आले. ते १८५४ च्या जुलैपासून १८५५ च्या डिसेंबरपर्यंत एकदम अदृश्य झाले. कलम, कलमदान आणि पागोटे रोडेश्वराला अर्पण करून, त्यांनी संन्यास घेतला आणि ते आता स्वामी ब्रह्मानंद म्हणून नर्मदेच्या काठी राहू लागले. संन्यास घेतला तरी ध्येय एकच – ''अंगात प्राण असेस्तोवर इंग्रजांशी लढून देश स्वतंत्र करेन!'' रंगो बापूजी मुंबईमध्ये असतानाच इंग्रजांनी नागपूर आणि झांशी आपल्या घशामध्ये घातल्याची बातमी त्यांना समजली होती. म्हणून ते उत्तर भारतामध्ये जाण्यासाठी निघाले. एवढ्यात त्यांना अझिमुल्लाखान भेटला. कानपूरमध्ये ते तात्या टोपे यांना भेटले. ते दोघे बिठूरला गेले आणि त्यांनी नानासाहेब पेशवे यांची भेट घेतली. नानासाहेब पेशव्यांना रंगो बापूजींनी इंग्लड आणि युरोप येथील बदलत्या आर्थिक परिस्थितीची माहिती दिली. यंत्रयुगामध्ये आपण मागे पडलो आहोत. त्यामुळे कच्चा माल, औद्योगिक तंत्रज्ञान, हातातील कौशल्य यासारखे शोषण होतच राहणार. इंग्रजांशी लेखालेखी करण्यात काही अर्थ नाही. इंग्रजी न्याय म्हणजे इंग्रजांच्या बाजूला झुकणारा न्याय. काशी ते रामेश्वर तमाम हिंदुस्थान उठले तरच आपला निभाव लागेल. नाहीपेक्षा त्या प्रयत्नांना काही अर्थ नाही, असे रंगो बापूजींनी नानासाहेबांना बजावले.

दोन-तीन दिवस अखंड बैठका झाल्या. बुढ्या बादशहासाठी मुसलमान सैनिक लढतील. आपल्यासाठी हिंदू सैनिक. एकदा इंग्रजांचा काटा काढला की, दिल्ली आपल्याच हाती राहील. ८२ वर्षांचा बादशहा फार काळ जिवंत राहील असे वाटत नाही आणि जिवंत राहिला तरी तो आपल्याला नडणार नाही. सर्व तीर्थक्षेत्रांना मुक्त करण्याची आणि शिवाजी महाराजांचे स्वप्न साकार करण्याची सुवर्णसंधी आपल्या हाती चालत आली आहे.

उत्तरेची बाजू नानासाहेब पेशवे आणि तात्या टोपे यांनी सांभाळावी आणि रंगो बापूजींनी दक्षिण सांभाळावी असे ठरले (तत्रैव, १ मार्च १९७५). १८५७ ची क्रांती मर्यादित होती, असा बालिश आरोप करणाऱ्यांना रंगो बापूजी आणि नानासाहेब यांच्या बैठकांविषयी काहीच कल्पना नाही.

भोर संस्थानचे त्या वेळचे पंतसचिव चिमणाजी रघुनाथ यांनी रंगो बापूजींना लिहिलेली तीन पत्रे आज उपलब्ध आहेत. चिमणाजी रघुनाथ यांनी रंगो बापूजींच्या सांगण्यावरून माणसे आणि शस्त्रास्त्रे तयार ठेवली होती. याचा उल्लेख या पत्रांमध्ये आढळतो. या पत्रांच्या तारखा ७, ९ आणि १० जून १८५७ च्या आहेत आणि नानासाहेब पेशवे यांनी कानपूरला इंग्रजांविरुद्ध उठाव करण्यासंबंधीच्या पत्राची तारीख ६ जून १८५७ ही आहे. या दोन गोष्टी लक्षात घेतल्या की, फिरंग्यांचा नाश करण्यासाठी हे सर्व लोक कसे आतुर होते आणि कसे संघटित होते, याची कल्पना येऊ शकते.

रंगो बापूजी हा चांद्रसेनी कायस्थ मुत्सद्दी, कलम चालवणारा आणि योजक होता. नानासाहेब वा तात्यांसारखा योद्धा नव्हता. फासे कसे अचूक खेळायचे आणि कोणती प्यादी केव्हा आणि कशी सरकवावयाची, याचे ज्ञान रंगो बापुजी यांना फार चांगले होते. आणि त्यांच्या या ज्ञानाचा नानासाहेब आणि तात्यासाहेब यांनी योग्यपणे फायदा उठवावयाचे ठरवले.

रंगो बापूजी यांनी पाहिले की, महाराष्ट्रातला बहुजन समाज छत्रपतींच्या नावासाठी आजही लढावयास तयार आहे. या धोरणाने त्यांनी उमाजी नाईक यांच्या वेळचे मावळे, रामोशी, कातकरी, कोळी, भंडारी आपल्या गुप्त संघटनेमध्ये सामील करून घेतले. दऱ्याखोऱ्यातले गडकरी, किल्लेदार आणि जागोजागचे जहागीरदार, इनामदार यांना त्यांनी आपल्या सूत्रामध्ये बांधले. सातारा, भोर, रत्नागिरी, मावळ प्रांत, विजापूर, बेळगाव, कोल्हापूर एवढ्या मोठ्या भागावर त्यांचे प्रभुत्व होते.

नानासाहेब पेशवे यांना स्वातंत्र्ययुद्ध सुरू करण्यापूर्वी परराष्ट्रातील घडामोडींचे योग्य ते ज्ञान देण्याचे श्रेय रंगो बापूजी आणि अझिमुल्ला यांच्याकडे जाते. या आंतरराष्ट्रीय राजकीय ज्ञानाच्या बळावरच नानासाहेबांनी 'तवा तापला आहे,

तोवरच भाकरी शेकून घ्या,' हे धोरण आखले. रंगो बापूजी यांनी नानासाहेब पेशवे यांना पुढील मुद्दे सुचविले.

(१) युरोप आणि आशिया खंडामध्ये युद्धे होऊन त्यामध्ये इंग्लंड सापडले आहे. हळूहळू चीन, पर्शिया, जपान आणि रशिया अशी चार राष्ट्रे (भारत सोडून) इंग्लडची शत्रूराष्ट्रे झाली आहेत.

(२) १८५५-५६ मध्ये रशियाशी इंग्लंडचे युद्ध सुरू होतेच. १८५६ च्या मार्चमध्ये रशियाने इंग्लंडला सेबॅस्टेपूलच्या वेढ्यामध्ये असा काही मार दिला होता की, त्यामुळे इंग्लंड लष्करीदृष्ट्या वाटते तेवढे मजबूत नाही आणि इंग्लंडविरुद्ध रशिया भारताला सहज मदत करू शकेल, अशी राजकीय हवा सर्वत्र निर्माण झाली होती. रशियाची भारतावर स्वारी होणार, अशा कंड्याही उत्तर भारतामध्ये सर्वत्र ऐकू येत होत्या.

(३) रशियाशी युद्ध संपते न संपते, तोच इंग्लंडचे चीन आणि पर्शिया यांच्याबरोबर युद्ध सुरू झाले. ११ डिसेंबर १८५६ रोजी नागासाकी येथेही जपानशी इंग्रजांची कुरबूर सुरू झाली होती.

(४) भारतातील अन्यायी दडपशाहीविरुद्ध हवा गरम केली होती आणि इंग्लंडच्या संसदेमध्ये त्याचा निषेध करण्याचा ठराव आला होता; पण प्रधानमंडळाने संसदच बरखास्त करून इंग्लंडची अब्रू वाचवली.

रंगो बापूजी यांनी नानासाहेबांना ही जागतिक परिस्थिती सांगून इंग्लंड केवढ्या घोर आपत्तीत आहे याचे वर्णन केले. 'इंग्लंडची आपत्ती, ती आपली उत्कृष्ट संधी' या मुद्द्यावर त्यांनी भर दिला.

"संधी कशी?" नानासाहेब यांनी सवाल केला.

"पर्शिया आणि चीन विरुद्ध लढण्यासाठी इंग्रजांनी भारतातील पंचेचाळीस हजार गोऱ्या लष्करापैकी वीस हजार लष्कर परदेशी हालवले आहे. याचा अर्थ सध्या हिंदुस्थानामध्ये गोरे सैन्य जेमतेम तेवीस हजार असेल. अफगाणिस्थानचा दोस्त महंमद मनातून इंग्रजांविरुद्ध जळफळत आहे. त्याची लष्करी मदत आपल्याला होऊ शकेल."

"आणि इंग्रजांच्या हातची हिंदी सेना?"

"त्यांची फौज गोऱ्यांच्या पाचपट आहे. म्हणजे शंभर स्थानिकांना फक्त एकोणीस गोरे हे प्रमाण पडले! जातवारीने पाहिले, तर तीन शिपायांमध्ये एक ब्राह्मण आहे."

"त्याचा अर्थ?"

''स्वदेश आणि स्वधर्म यांचा ब्राह्मण समाज अभिमानी असतो. त्यासाठी सारसर्वस्वाचा त्याग करण्यासाठी तो मागे पाहत नाही.

''खरे.''

''१८५६ च्या जुलैमध्ये आम्ही सांगू तेथे जगातील कोणत्याही देशामध्ये लढण्यासाठी नेटिव्ह सैनिकांनी गेलेच पाहिजे, असा हुकूम कॅनिंगसाहेबाने काढला होता. ब्राह्मणाला परदेशगमन निषिद्ध आहे. केवढा जळतो आहे प्रत्येक सैनिक इंग्रजांविरुद्ध! या जुलमाचा आपण फायदा घेतलाच पाहिजे.''

''कसा?''

''प्रत्येक छावणीत गुप्तपणे आपले हस्तक धाडून हा असंतोष आपण आणखी पेटवला पाहिजे. हे काम सोपे नाही, पण अवघडही नाही. खूप फिरायला मात्र पाहिजे.'' या मसलतीनंतर साऱ्या उत्तर भारतामध्ये नानासाहेब आणि त्यांचे साथी प्रत्येक पलटणीतील स्थानिक अधिकाऱ्यांबरोबर गुप्तपणे चर्चा करत होते. त्यांची मने आपल्याकडे वळवत होते. रंगो बापूजींचे हे पवित्र कार्य - 'स्वदेश आणि स्वधर्म टिकवण्यासाठी फिरंग्यांना मारा' - दक्षिणेमध्ये सुरू झाले.

एवढ्यातच १८५७ च्या जानेवारीमध्ये चरबीची काडतुसे निघाली. त्याने तर असंतोषाचा स्फोट होऊन, सारे हिंदी लष्कर एकदम भडकले.

रंगो बापूजी यांनी दक्षिण भारतामध्ये एवढा धुमाकूळ घातला होता की, इंग्रजांना त्यांना मदत करत असणाऱ्या दक्षिणी राजांचाही संशय येऊ लागला होता. उत्तरेस उठाव झाला की ताबडतोब आम्ही उठाव करू, असे आश्वासन रंगो बापूजी यांनी नानासाहेब पेशवे यांना दिले होते. मंगल पांडेने थोडा उतावळेपणा करताच रंगो बापूजींची धावपळ झाली. इंग्रज अधिकारी डोळ्यांत तेल घालून, या दक्षिणी राजांच्या हालचालींवर नजर ठेऊन होते.

सर जॉन 'के' यांनी आपल्या ग्रंथामध्ये लिहून ठेवले आहे की, ''उठावासाठी दक्षिणी राजे आणि सरदार अगदी सुसज्ज होते.'' म्हणून इंग्रज अधिकाऱ्यांनी कोल्हापूर आणि सातारा येथील राजांना हद्दीबाहेर नेऊन ठेवले. सोलापूरचा राजा धेंकाप्पा यांनी कॅप्टन मिडोज टेलर याला जबानी देताना सांगितले की, मुधोळ, मिरज आणि जमखिंडी येथील राजांनी आपणास १८५७ च्या उठावामध्ये भाग घेण्यास उत्तेजन दिले होते. म्हणून जमखिंडीतील सरसेनापती छोटूसिंग यांना इंग्रजांनी तोफेच्या तोंडी दिले. जमखिंडीच्या राजाच्या विरुद्ध प्रत्यक्ष पुरावा हाती न लागल्यामुळे, राजाला निर्दोष सोडण्यात आले.

जी० बी० सेटन कार या दुय्यम राजकीय प्रतिनिधीने १७ मार्च १८५८ रोजी लिहिलेल्या पत्रामध्ये चक्क लिहिले आहे की, ''काहीही म्हणा, मला हा राजा

इंग्रजांशी निष्ठावान वाटत नाही. गेल्या ऑगस्ट, सप्टेंबर आणि ऑक्टोबर महिन्यातील या राजाची वागणूक संशयास्पद होती.'' या कारने २० मार्च १८५८ च्या पत्रामध्ये जामखिंडीच्या राजाला नजरकैदेत ठेवण्याची सूचना केली आहे. लॉर्ड एल्फिन्स्टनने देखील ''या जमखिंडीच्या राजाची भूमिका १८४० सालच्या कर्नूलच्या नबाबासारखी गुप्त, पण भयंकर आहे'', असे लिहून ठेवले आहे.

## कारस्थान फसले

जुन्या कागदपत्रांच्या नोंदींमध्ये क्रमांक ३८।१८५७ या फायलीत बेळगाव, सातारा आणि अहमदनगर जिल्ह्यांमध्ये उठावाची तयारी म्हणून तोफा आणि इतर दारूगोळा सापडला म्हणून नागरिकांची शस्त्रे काढून घेण्यात आली, असा उल्लेख आहे. एकट्या साताऱ्यामध्ये २३,८९५ शस्त्रे जप्त करण्यात आली. महाराष्ट्रामध्ये अनेक पत्रे पकडण्यात आली.

पत्रामध्ये उघडपणे असे काही क्वचितच लिहिलेले असे. त्यातील गुप्त संदेश शोधून काढण्यासाठी इंग्रज अधिकाऱ्यांची खूपच विनोदी धावपळ होई. रंगो बापूजींची इंग्लंडहून ज्यांना ज्यांना म्हणून पत्रे येत अशांची (उदाहरणार्थ शिवानंद शास्त्री) सर्व पत्रे उघडून वाचली जात. १८५७ च्या उठावाशी या लोकांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध होता असे नंतर आढळून आले. क्रमांक ३५,१८५८ या फायलीमध्ये अशी बरीच पत्रे आढळतात.

फाईल क्रमांक ३३/१८५८ मध्ये नरगुंदच्या राजाविरुद्ध प्रत्यक्ष असा खूप पुरावा इंग्रजांनी गोळा केलेला आढळतो. नरगुंदकरांना आश्रय का दिलात असा जबाब तोर्गुलकर महाराजांना तेथील राजकीय प्रतिनिधीने विचारलेला आढळतो. नरगुंदकरांबरोबर बाबाजी जगताप नावाची एक भयंकर कारस्थानी व्यक्ती असल्याचा उल्लेख आढळतो. महिपालसिंग नावाचा बंगाल प्रांतामधील बांदा इलाख्यातील जुना ठग सोलापूर येथे नोकरीसाठी आला होता. त्यांच्या साक्षीमध्ये बरीच नावे इंग्रज अधिकाऱ्यांना मिळाली. त्यांनी त्या व्यक्तीचे कंदन केले. सोलापूरच्या ब्राह्मण वजिराने (केशवराय) येथे रोहिले, अरब, पठाण, परदेशी आणि इतर लोकांना युद्धासाठी भरती केले, असे आपल्या अंतिम जबानीमध्ये सांगितले. १४ ऑगस्ट १८५७ रोजी त्याला फासावर चढवण्यात आले. १५ डिसेंबर १८५७ च्या एका पत्रामध्ये राजकीय प्रतिनिधीने सरकारला धाडलेल्या अडुवल आणि हुगळी येथे बेरड जमातीच्या उठावाच्या तयारीचे सुंदर वर्णन केलेले आढळते. म्हणून सर्व प्रांतातील नागरिकांनी आपली शस्त्रे सरकारला परत करावीत, असा हुकूम निघाला; पण मुधोळच्या स्वातंत्र्यवीरांनी तो मानला नाही.

शेखचंद शेख यासीन हा बीरवचा रहिवासी. त्याच्या जबानीमध्ये अहमदनगरच्या सशस्त्र उठावाच्या तयारीवर खूप प्रकाश पडतो. भीरच्या धोंडोपुरा या विभागातील शंकरभाऊ ब्राह्मण हा नानासाहेब पेशव्यांचा लष्करामध्ये भरती करणारा अधिकारी होता. हा शेख त्या सैन्यामध्ये दरमहा पंधरा रुपयांवर भरती झाला. आणखी शंभर रोहिले भरतीसाठी आणण्याची त्याच्यावर जबाबदारी टाकली गेली. शंकरभाऊ यांनी त्याला सात शेर शिसे आणि एक मण बंदुकीची दारू दिली. याच पद्धतीने नाशिक जिल्ह्यातील पेठ या गावी दोन हजार कोळ्यांची लष्करभरती झाली होती. त्यांनी लेफ्टनंट ग्लासपूलला घेराव घातला होता. राजा भगवंतराव हा त्या चळवळीचा 'मेंदू' होता. नानासाहेब पेशवे यांच्याशी त्याचा पत्रव्यवहार सतत होत असे. या भगवंतरावाला २८ डिसेंबर १८५७ रोजी फाशी देण्यात आले. होरसूलचा बाजार या कोळ्यांनी लुटला आणि तेथील मामलतदारांना अटक केली. या कागदपत्रांमध्ये १४ आणि २७ कोळी पुढाऱ्यांना वेगवेगळ्या ठिकाणी फासावर चढवल्याची नोंद आहे.

शिवानंद शास्त्री पंडितराव हे चांगलेच उद्योगी गृहस्थ होते, असे त्यांच्या सापडलेल्या पत्रांवरून दिसते. २७ डिसेंबर १८५७ रोजी सापडलेल्या एका पत्रामध्ये हे लिहितात की, "सप्टेंबरात होळकरांची स्वारी साताऱ्यास येईल. ही बातमी खुद्द होळकरांनीच सांगितली आहे. शिंदे सरकार उज्जैनला ४ नोव्हेंबर रोजी येतील म्हणून होळकरांचा मुक्काम थोडा लांबणीवर पडण्याचा संभव आहे. पत्राचे उत्तर सरळ धाडू नये. उज्जैनच्या भगवानदास चुनीलालच्या पत्त्यावर धाडावे, म्हणजे संशय येणार नाही. मी उज्जैनला शिंदे सरकारला भेटेन आणि पुढे उदेपूरला जाईन. होळकर महाराज साताऱ्यास येत आहेत, तेव्हा तयार असा."

हे पत्र वाचून इंग्रजांची किती गाळण उडाली असावी, याची वाचकांनी कल्पनाच केलेली बरी.

२३ एप्रिल १८५८ च्या 'ज्ञानप्रकाश'मध्ये नानासाहेब पेशवे महाराष्ट्रात येत आहेत अशी बातमी प्रसिद्ध झाली. त्यामुळे इंग्रज अधिकाऱ्यांचा थरकाप झाला.

२४ एप्रिल १८५८ रोजी लिहिलेल्या एका पत्रामध्ये हारपूर हा इंग्रज अधिकारी लिहतो, "मेजर आउल्डने कळवले आहे की, काही बंडखोर रत्नागिरीच्या सरहद्दीपाशी आले आहेत. सावधान असावे. ते पन्नास असावेत."

वरील पुरावे देण्याचे कारण एवढेच की, १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धासंबंधी सेन या लेखकाने खुद्द नानासाहेब पेशवे यांच्या दख्खनमध्येच त्यांची तयारी शून्य होती असे जे विधान केले आहे, ते किती अज्ञ, भोळेपणाने भरलेले आणि चुकीचे मार्गदर्शन करणारे आहे, ते लक्षात यावे म्हणून. दक्षिणेस रंगो बापूजींसारखा

खमक्या मुत्सद्दी नानासाहेबांनी ठेवला होता एवढी साधी गोष्ट या सेनबाबूंच्या लक्षात येऊ नये, हे केवढे दुर्दैव आहे!

### खंडेराव महाराज (१८५६-१८७०)

आनंदराव गायकवाड या दुर्बल राजाच्या राजवटीमध्ये दिवाणगिरी मिळण्याच्या स्वार्थी आशेने इंग्रजांचा बडोद्यामध्ये शिरकाव करून देणारे दोन महाभाग म्हणजे रावजी अप्पाजी आणि गंगाधरशास्त्री पटवर्धन, (डॉ० वि० गो० खोबरेकर, महाराष्ट्राचा इतिहास, भाग २, १९८७, पृ० ५९७) (शास्त्रींना दूर करून रावजींना बडोद्याचे दिवाण व्हायची महत्त्वाकांक्षा होती!) यांना काव्यात्मक न्याय मिळाला. रावजींच्या नावाने रावपुरा हा हमरस्ता बडोद्यामध्ये आहे. शास्त्री १८१४ मध्ये पुण्यामध्ये आले आणि त्यांचा पंढरपूर येथे २० जुलै १८१५ रोजी खून झाला. नऊ वर्षे (१८४७-१८५६) राज्य केल्यावर गणपतराव गायकवाड महाराज १८५६ मध्ये जलक्रीडा करत असताना पाण्यात बुडाल्यामुळे त्यांचा अंत झाला. त्यांना संतती नव्हती. म्हणून त्यांचे कनिष्ठ बंधू खंडेराव बडोद्याच्या गादीवर आले. तत्कालीन लेखकांनी त्यांचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आढळते...

''त्यांचे शरीर पिळदार व तेजस्वी होते. त्यांचे हात लांब व दंड कमावलेले होते. चेहरा जरा उग्र व कपाळ मोठे होते. रंग गोरा, डोळे मोठे व दृष्टी तीव्र होती. त्यांच्या दाढी व मिशांचे केस मधून मधून पांढरे होऊ लागले होते. ते पोशाख साधा करत. चड्डीवजा सफेत मांडचोळणा, मलमलीचा सदरा व डोकीला दिल्लीशाही सफेद टोपी किंवा कानटोपी, अशा साध्या व स्वच्छ पोशाखाने ते चौरंगावर बसत. थंडीच्या वेळेस छिटाची दुलई पांघरीत. गाडीलोडाच्या बैठकीवर ते फारसे बसत नसत. सणावारी व मोठ्या स्वारीच्या दिवशी ते गळ्यांत हिरेपांचूचा कंठा घालीत व भपकेदार जामानिमा करत. ते दिसण्यात उग्र होते, तरी मनाचे कनवाळू होते. ते सत्यप्रिय व निर्व्यसनी होते. मद्यपी व लबाड लोक त्यांच्यासमोर जाण्याला भीत असत.''

खंडेरावांचा कल मुसलमानी धर्माकडे अतिशय असे. ते स्वतःला महंमदाचे मोठे भक्त समजत असत. संतती नसल्यामुळे ते मुसलमान फकिरांच्या इतके नादी लागले की, ते आता धर्मांतर करतात की काय आणि बडोदे संस्थान मुसलमानी संस्थान होते की काय, अशी भीती सर्वांना वाटू लागली. त्यांनी सिद्दी सुलेमान, अमर आणि बल्लाळ या नावांच्या तीन मुलांना पुत्रवत मानले होते. त्यामुळे हे तिघेही जण इतके मगरूर झाले होते की, ते राज्यांतील मोठमोठ्या अधिकाऱ्यांचा उपमर्द करत. त्यांपैकी सिद्दी सुलेमान याने सर टी० माधवराव यांच्या वेळचे अधिकारी रा०

पेस्तनजी जहांगीरजी यांचा अपमान करून, त्यांना धमकी देण्यासाठी आपल्या तरवारीस हात घातला होता! त्या प्रसंगी सर टी० माधवराव यांनी त्याची नेमणूक बंद करून त्याला नरम आणले होते. तथापि त्याचा उद्धटपणा इतक्या थराला गेला होता की, त्याने त्यानंतर दिवाणास एक पत्र लिहून, आपली नेमणूक बंद केल्याबद्दल तक्रार केली. त्यावरून हा अडाणी मनुष्य मूर्खपणाने वागला असेल, असे समजून त्याच्या नेमणुकीचा ४/५ भाग पुन्हा सुरू करण्याचा दिवाणांनी हुकूम केला. पुढे खंडेराव महाराज गादीवर आल्यावर त्यांनी सुलेमान याला खासगीखात्यामध्ये कामाला लावले आणि अमर आणि बल्लाळ यांची फौजखात्यामध्ये नेमणूक केली.

आपल्याला पूर्वीप्रमाणे फुकट नेमणूक मिळण्याच्या ऐवजी काम करण्याचा हुकूम झाल्यामुळे या तिघांनी कामाचे राजीनामे दिले. पुढे १८८५ च्या ऑक्टोबर महिन्यात त्यांनी दिवाण काझी शहाबुद्दीन यांजकडे एक अर्ज देऊन खंडेराव महाराजांनी आपल्याला मुलांप्रमाणे मानल्यामुळे राजपुत्रांप्रमाणे आपली तैनात झाली पाहिजे, अशी मागणी केली आणि तीन दिवसांच्या आत मंजूर न झाल्यास आपण आपल्या हातांनी सरकारी तिजोरीतून तैनातीची रक्कम वसूल करून घेऊ, अशी त्यांनी धमकी दिली! हा अर्ज पाठवून देऊन, हे तिघे आणि त्यांच्या बरोबरचे दुसरे पाच लोक मिळून आठ जण बंदुका, पिस्तुले, तलवारी वगैरे घेऊन चिमणबाग बंगल्यामध्ये जाऊन बंडाच्या तयारीने राहिले. त्या वेळी मोहरमचे दिवस जवळ आले असल्यामुळे धर्मवेडाच्या भावनेने उसळी खाऊन मुसलमानांमध्ये दंग्याची प्रवृत्ती उत्पन्न होण्याचा संभव फार होता. म्हणून या गुन्हेगारांचा सोक्षमोक्ष मोहरमपूर्वी लावणे जरूर होते. या गुन्हेगारांना पोलीस अधिकाऱ्यांनी लालूच दाखवून, फसवून अटक केली. त्यासाठी चिमणबागेमध्ये (हल्लीचे शांतादेवी नर्सिंग होम) चक्क बंदुका वापरून युद्ध खेळावे लागले आणि गुन्हेगारांना ठार करावे लागले, कारण त्यांना सारखी भीती वाटत होती की, राजा त्यांना पाठीशी घालेल आणि त्यांचे प्रयत्न फुकट जातील (दाजी नागेश आपटे, सयाजीराव गायकवाड (तिसरे) यांचे चरित्र, पृ० ३७९).

खंडेराव फार सुदैवी होते. त्यांच्या नशिबाने हिंदी सैनिकांनी कलकत्ता ते दिल्ली असा इंग्रजांविरुद्ध उठाव केला. इंग्रजांसमोर त्यांच्या अस्तित्वाचा प्रश्न उभा राहिला. मल्हारराव पहिल्यापासून इंग्रजविरोधी आणि राष्ट्रवादी होते. ते १०० टक्के स्वधर्म आणि स्वदेश यांना मानणारे होते. खंडेरावांना कोणताही राजकीय रंग नव्हता. पेशवे काय किंवा इंग्रज काय, त्यांना दोघे 'परके मालक' होते, दोघेही सारखेच. एक पुण्यामध्ये तर दुसरा लंडनमध्ये. त्यांनी पेशव्यांच्या कचाट्यातून सुटण्यासाठी इंग्रजांना भरपूर आर्थिक आणि लष्करी मदत केली. त्यामुळे इंग्रजांना

पश्चिम किनाऱ्यावर अभयदान मिळाले. राष्ट्रवादी मल्हाररावांना खंडेरावांनी डभोईमध्ये एका लहान खोलीत कोंडून ठेवले. सात वर्षे त्यांना एकांतवासात ठेवले, इतके की त्यांच्या पत्नीसही तेथे कधी जाऊ दिले नाही.

खंडेराव महाराज गादीवर आल्याच्या दुसऱ्याच वर्षी (१८५७) साऱ्या भारतभर सैनिकांचा उठाव झाला आणि तो आगीचा वणवा बडोद्यामध्ये घुसणार असा रंग दिसू लागला. इंदूर आणि नसिराबाद येथे मोठाले दंगे झाले. बंडखोरांना तेथून बडोदा येथे येणे अगदी सुलभ होते. भडकलेल्या सैनिकांचा जमाव महूच्या रस्त्याने दोहदपर्यंत येऊन पोहचला होता. ते पुढे बडोद्यामध्ये प्रवेश करू नयेत म्हणून १००-१०० मैलांच्या अंतरावर नाकी बसवण्यात आली. बडोद्यापासून ५० मैलांवर नायकडे भिल्ल अशांत आणि अस्वस्थ होते. बडोद्यामध्ये राजरस्त्यावर काही खून पडले. राजपिंपळा येथे काही सैनिक थडकले होते. खंडेरावांनी नांदेडला आपले सैन्य धाडले. ओखामंडळ येथे वाघेर लोकांनी उठाव केला; पण ते बंड ब्रिटिश पलटणींनी मोडून काढले. बडोदे राज्याची स्थिती एखाद्या ज्वालामुखीच्या पर्वतासारखी झाली होती. केवळ खंडेरावांमुळे तो तस ज्वालामुखी थंड झाला. हे उपकार स्मरून गायकवाड इंग्रजांना दर वर्षी तीन  लक्ष रुपये वार्षिक खंडणी देत; ती त्यांनी उदार (?) अंतःकरणाने माफ केली. त्यांना दत्तक घेण्याचा अधिकार १८६२ मध्ये देण्यात आला आणि जी० सी० एस० आय० हा किताबही बहाल करण्यात आला.

नर्मदेचे पाणी कालव्याने बडोद्यामध्ये आणण्याची योजना खंडेरावांच्या तज्ज्ञ अभियंत्यांनी केली होती; पण इस्लामच्या प्रेमामध्ये पडलेल्या खंडेरावांनी ती रद्द केली. त्या ऐवजी तो पैसा सुंदरपुरा येथे आपल्या मुसलमान पहिलवान सहकाऱ्यांना शिकारीसाठी उपयोगी पडेल, असे हरणांचे वन तयार करण्यासाठी वापरला. इंग्रज रेसिडेंटने खंडेरावांना एका अक्षराने कधी दाटले नाही. खंडेराव  इंग्रजांसाठी 'देव' होते. हिंदूंना हा 'पीर' आवडत नसे.

## मल्हारराव (१८७१-७५)

खंडेराव गायकवाड १८५६ मध्ये बडोद्याचे महाराज झाले आणि तेव्हापासून पश्चिम भारतामध्ये इंग्रजांची चलती सुरू झाली. राजपिंपळा, ओखा, महू, महीकाठ ही सारी क्रांतिकारकांची लपण्याची स्थाने होती. उत्तरेतील उठावाबरोबरच या सर्व स्थानी इंग्रजांविरुद्ध बंडे झाली; पण खंडेरावांनी ती सारी मोडून काढली आणि ते इंग्रजांच्या गळ्यामधील ताईत झाले. देवाच्या घरी न्याय असतो, त्याला का कोणास ठाऊक, 'काव्यात्मक न्याय' (पोएटिक जस्टीस) असे म्हणतात. देवाने या

मल्ल राजास निपुत्रिक मरणाचा न्याय दिला. म्हणून केवळ, त्यांचे छोटे बंधू मल्हारराव बडोद्याच्या गादीवर आले.

इंग्रज मल्हाररावांना आपले शत्रू मानत असत. मल्हाररावांनादेखील इंग्रजांचे फारसे प्रेम नव्हते. आपला मोठा भाऊ या परक्या तांबऱ्यांना का मदत करतो, याचे त्यांना वैषम्य वाटे. इंग्रज गुप्तहेर मल्हाररावांच्या सतत मागावर असत आणि नेहमी त्यांच्याविरुद्ध वर अहवाल पाठवत असत. तत्कलीन रेसिडेंटचे एक पत्र मोठे बोलके आहे – "जर ग्वाल्हेर आणि इंदूर इंग्रजांच्या विरुद्ध उभे राहिले, तर बडोदे त्याच मार्गाने जाईल." खंडेरावांच्या कारकिर्दीमध्ये अहमदाबाद येथील गोविंदराव तथा बापूसाहेब गायकवाड यांनी मोठ्या भावाला धडा शिकवण्यासाठी खंडेरावांना पदच्युत करून अहमदाबादमधील इंग्रजांचा खजिना लुटण्याचा कट रचला होता. तो अर्थातच सफल झाला नाही, उलट त्यांना मदत करणाऱ्या मगनलाल शेठजींना मात्र त्यामध्ये तोफेच्या तोंडी दिले गेले आणि मल्हाररावांना सात चौरस वार क्षेत्रफळाच्या अंधाऱ्या खोलीत ठेवण्यात आले. त्यांना इंग्रजांनी निर्दय आणि अमानुष वागणूक दिली.

मल्हारराव नर्मदातीरी राहणाऱ्या ब्रह्मानंद स्वामींना म्हणजे एके काळी लंडनमध्ये राहणाऱ्या रंगो बापूजींना नेहेमी भेटत असत. ते गंगनाथ या नर्मदेच्या तीरावर वसलेल्या गावी त्यांच्या आश्रमामध्ये राहत. मल्हाररावांच्या हाती सत्ता आल्यावर खंडेरावांना गैरमार्गावर नेणाऱ्या आणि इंग्रजांशी निष्ठा ठेवणाऱ्या वाघम शेळके, हबिबुल्ला आणि भाऊ शिंदे या भ्रष्ट मंडळींचा भ्रष्टाचार शोधून काढून त्यांनी या सर्वांची मालमत्ता जप्त केली आणि ती ब्रह्मानंदांच्या चरणी ठेवली. पण ब्रह्मानंदांनी तिचा स्वीकार केला नाही. ते म्हणाले, "मी संन्यासी, सतत भ्रमण करणारा, मी ही संपत्ती घेऊन कोठे ठेऊ? त्यापेक्षा ह्या पैशांचा उपयोग आपण लोकोपयोगी कामे करण्यासाठी करावा."

"मी गंगनाथी मोठा घाट बांधतो," मल्हाराव म्हणाले.

"नको, गंगनाथचा एकांतवास मला फार प्रिय आहे. आपण माझ्या भल्यासाठी घाट बांधाल, पण होईल उलटे. लोकांचे येणेजाणे वाढेल आणि माझा एकांतवास निघून जाईल. कोणास ठाऊक, लोकांमध्ये इंग्रजांचे हेरदेखील असू शकतील."

"घाट बांधायची फार इच्छा आहे."

"मग थोडे पूर्वेस चांदोद गाव आहे. ते जुने तीर्थक्षेत्र आहे. तेथे घाट बांधा, जुन्या तीर्थक्षेत्राचे पुनरुज्जीवन होईल."

गुरूच्या आज्ञेनुसार मल्हाररावांनी चांदोद येथे दृष्ट लागेल असा देखणा घाट बांधला. साऱ्या गुजराथमध्ये ती वास्तू सौंदर्यासाठी प्रसिद्ध आहे. उरलेल्या पैशातून

चार भिंतींच्या आतील बडोदे शहराच्या पश्चिमेला सुरसागर तलावाच्या चारी बाजूंना लोखंडी नळांचा कठडा, तसेच चारी बाजूंनी पक्की सडक बांधली. त्यामुळे तेथे रात्री चुकून होणारे अपघात टळले. बडोद्यामध्ये आधुनिक वैद्यकीय सेवेची चांगली सोय नव्हती, म्हणून मल्हाररावांनी लोकांसाठी एक मोफत दवाखाना सुरू करून, गरिबांचे आशीर्वाद घेतले.

लोकोपयोगी सार्वजनिक बांधकाम करण्याची कल्पना मल्हाररावांची असणे शक्यच नाही. त्यांच्या पाठीमागे कोणतीतरी राष्ट्रवादी शक्ती निश्चित काम करत आहे, असा रेसिडेंटला संशय आला, तसे असेल तर आपल्याला पश्चिम हिंदुस्थानामधून लवकरच गाशा गुंडाळावा लागेल. काहीही करून या मल्हाररावाला लवकरात लवकर उडवले पाहिजे. संशय आणि भीतीमुळे रेसिडेंटची झोप उडाली. त्याने मल्हाररावांवर आरोप केला.

इंग्रज रेसिडेंटने मल्हारराव सबबी देत आहेत असा अपप्रचार करण्यास सुरुवात केली. अधिकृतपणे त्या वेळी दिवाण म्हणून दादाभाई नौरोजी उत्तम प्रकारे शासन सांभाळत होते. अनधिकृतपणे मल्हाररावांना नर्मदेच्या तीरी राहणाऱ्या क्रांतिकारकांचे चांगले मार्गदर्शन मिळत होते. पेशव्यांचे कुस्तीतील गुरू नारायण देवधर त्या वेळी बडोद्यामध्येच होते. दादासाहेब मुजुमदार आणि नारायण गुरू हे पडद्यामागून सूत्रे चांगल्या प्रकारे हालवत होते. अशा परिस्थितीत मल्हाररावांची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढतच होती. १८७१ मध्ये नवसारीच्या संत टहलदासांना मल्हारराव नवसारीत भेटल्याचा उल्लेख मिळतो (दै० संदेश गुजराथी, ६ जून १९८९). टहलदास म्हणजे सतत फिरतीवर असणारा! त्यांनी पुण्याच्या महादेव चिमणाजी आपटे वकिलांना मल्हाररावांचे वकीलपत्र स्वीकारण्याची विनंती केली. ते वारले म्हणून ते वकीलपत्र सार्वजनिक काकांकडे आले. पायलट जयंत दिगंबर आपटे यांनी सांगितलेली आठवण (धर्मभास्कर, सप्टेंबर २००९, पृ० ३२).

दादाभाई नवरोजी यांनी २ नोव्हेंबर १८७४ रोजी कलकत्ता येथील गव्हर्नर जनरल नॉर्थब्रुक यांना आपली रामकहाणी एका लांबलचक पत्राद्वारा कळवली आणि बडोदे संस्थानाच्या विकासाच्या मार्गात कर्नल फेयर हा कसा धोंडा बनला आहे, त्याचे त्या पत्रामध्ये विवरण केले. दादाभाईंचे ते पत्र वाचून गव्हर्नर जनरलने २८ जानेवारी १८७५ रोजी कर्नल फेयरला परत बोलावण्याचा निर्णय घेतला. त्याच्या जागी सर लुई पेली बडोद्याचे रेसिडेंट म्हणून नियुक्त केले गेले. बडोदे सोडण्याच्या आधी २ नोव्हेंबर १८७४ रोजी कर्नल फेयरने आणखी एक नाटक सुरू केले. सरबताच्या पेल्यामध्ये सोमल विष मिसळून माझा प्राण घ्यायचा मल्हाररावांनी प्रयत्न केला, असा आरोप कर्नल फेयरनी केला. त्याची चौकशी

करण्यासाठी मुंबईहून पोलीस कमिशनर शूटर बडोदा येथे आले. नवीन रेसिडेंट पेली आणि शूटर यांनी मिळून मल्हाररावांना पदच्युत करण्याचे सूचन कलकत्त्याच्या गव्हर्नर जनरलला कळवले. ७ जानेवारी १८७५ रोजी हे नाटक पाहिल्यानंतर दादाभाईंनी आपल्या दिवाणपदाचा राजीनामा दिला.

कलकत्याहून १३ जानेवारी रोजी रेसिडेंटला तारेने कळविण्यात आले की, ''मल्हाररावांना अटक करा आणि बडोद्याचे शासन काही काळ आपल्या ताब्यामध्ये घ्या.'' त्यानुसार मल्हाररावांना कैद करण्यात आले आणि बडोदे स्टेशनवर गोरे सैनिक आणि त्यांच्या मदतीसाठी सुसज्ज तोफा ठेवण्यात आल्या. मल्हाररावांची चौकशी करण्यासाठी एक आयोग नेमावा आणि त्यामध्ये अर्धे सभासद भारतीय असावेत, असा ठराव मांडण्यात आला.

या ठरावावर गणेश वासुदेव जोशी तथा सार्वजनिक काका आणि अण्णासाहेब पटवर्धन यांच्यासारख्या मान्यवर पुणेकरांच्या सह्या होत्या. साऱ्या भारतभर वृत्तपत्रांच्या संपादकांनी या ठरावाला आपला पाठिंबा जाहीर केला. एवढेच नाही, तर असा आयोग नेमायलाच हवा, असाही प्रचार साऱ्या भारतभर या संपादकांनी सुरू केला.

त्याचा परिणाम म्हणून २३ फेब्रुवारीला अशी चौकशी समिती नेमण्यात आली आणि तिचे कामकाज १८ मार्च १८७५ पर्यंत चालले. पुण्याच्या वरील ठरावानुसार तीन सभासद भारतीय होते – जयपूर नरेश, ग्वाल्हेर नरेश आणि ग्वाल्हेर दरबारातील प्रमुख सल्लागार दिनकरराव राजवाडे. बडोदा नरेश मल्हाररावांवर तीन आरोप होते - (१) कर्नल फेयरविरुद्ध हेरगिरी करणे (२) कर्नल फेयरच्या कर्मचाऱ्यांमधील अधिकाऱ्यांना लांच देणे आणि (३) कर्नल फेयरवर विषप्रयोग करणे.

कर्नल फेयरचा बचाव करण्यासाठी एकही साक्षीदार पुढे आला नाही. १३ मार्च रोजी मल्हाररावांचा इंग्रज वकील बॅरिस्टर व्हॅलेंटाईनचे भाषण सुरू झाले. त्यांनी मल्हाररावांचा मानसिक छळ कसा करण्यात आला, याचे अनेक पुरावे सादर केले. प्रेक्षक हजारोंनी उपस्थित होते. ते पुरावे ऐकून प्रेक्षक रुमालाने आपले डोळे पुसत होते. सरतेशेवटी चौकशी समितीच्या तीन गोऱ्या सभासदांनी एकमुखाने त्यांना दोषी ठरवले आणि तिन्ही भारतीय सदस्यांनी एकमुखाने त्यांना निर्दोष ठरवले. १८ एप्रिल १८७५ रोजी राणी व्हिक्टोरियाच्या सरकारने एक फर्मान प्रसिद्ध करून मल्हाररावांना आपल्या राजपदापासून पदच्युत केले. फर्मान जाहीर करण्याच्या आधी युरोपीय सेनेची एक तुकडी बडोदे येथे आणली होती (दा० ना० आपटे, सयाजीराव (तिसरे) यांचे चरित्र पृ० ).

इंग्रजद्रोही पण स्वदेश आणि स्वधर्मनिष्ठ मल्हाररावांची चार वर्षांची तेजस्वी कारकीर्द अशा हद्दपारीच्या शिक्षेने संपुष्टात आली. ते पुढे मद्रास (चेन्नई) येथे सात वर्षे जगले; पण त्यांच्यासाठी ती काळ्या पाण्याची सजा होती, कारण फेयरला मदत करणारा डॉ० सेवर्ड इंग्रज सरकारने मल्हाररावांच्या तैनातीस वैयक्तिक वैद्य म्हणून दिला होता! अशी होती इंग्रजांची न्यायबुद्धी!

। । ।

# ३



## व्यक्तिमत्त्व आणि कालखंड

ईस्ट इंडिया या व्यापारी कंपनीने भारताच्या प्रत्येक प्रांतामध्ये राजकीय हस्तक्षेप करून हळूहळू सारा हिंदुस्थान देश आपल्या ताब्यात घेतला. त्यांनी कधी कळ, कधी छळ, तर कधी बळाचा वापर केला. प्रेमात आणि युद्धात सर्व क्षम्य असते. १८१८ मध्ये बाळाजीपंत नातू या पेशव्यांच्या सरदाराने इंग्रजांना फितूर होऊन शनिवारवाड्यावर युनियन जॅक फडकवला आणि मराठा साम्राज्याचा अस्त झाला. क्रिया म्हटली की प्रतिक्रिया होणारच, हे इंग्रजांना चांगले माहीत होते. अपेक्षेप्रमाणे पराभूत हिंदूंना जाग येऊन ते संघटित होऊन इंग्रजांविरुद्ध उठाव करण्यासाठी ३९ वर्षे जावी लागली. या स्वातंत्र्ययुद्धाचे निमित्त करून कंपनीच्या हातून व्हिक्टोरिया राणीने सत्ता हस्तगत केली आणि कंपनीच्या विश्वस्तांकडून सत्ता इंग्रजी मुत्सद्द्यांच्या हाती आली.

जर्मनीचा कैसर आणि रशियाचा झार यांची नक्कल करून साध्या राणीची 'भारताची महाराणी' होण्यासाठी व्हिक्टोरियाने थोडा वेळ घेतला. यानंतरच्या काळाला 'इंग्रजी वसाहतवाद' असे म्हणतात. वसाहतींचा कच्चा माल वापरून औद्योगिक क्रांतीच्या बळावर हक्काच्या बाजारपेठेतून जास्तीत जास्त कमाई करून ग्रेट ब्रिटनला जगामधील सर्वात समृद्ध, सर्वात बलाढ्य आणि अजिंक्य महासत्ता बनवणे, हे इंग्रजी वसाहतवादाचे खरे स्वरूप होते. त्यासाठी आपल्या अमलाखाली असलेल्या/बंदी प्रजेला रुचेल-पचेल असे तत्त्वज्ञान निर्माण करून, त्या प्रजेला आश्वासने देत झुलवत ठेवणे आणि त्या प्रजेचे जास्तीत जास्त शोषण करणे, ही इंग्रज मुत्सद्द्यांची कुटिल राजनीती होती. त्या राजनीतीला अनुरूप असे राजनिष्ठ आधारस्तंभ उभे करून, त्यांच्या आधारे त्यांनी १५० वर्षे या अस्थिर साम्राज्याचा डोलारा शाबूत ठेवला. संस्थानिक, बाबू लोक (आयसीएस), समाजसुधारक, विचारवंत, इंग्रजी भाषेचे आणि इतिहासाचे शिक्षक आणि खिस्ती धर्मप्रचारक म्हणजे या साम्राज्यरूपी डोलाऱ्यास सांभाळून घेणारे स्तंभ होत. हे सारे शोभेचे स्तंभ. खरे स्तंभ म्हणजे पोलीस व सैनिक (आर्मी). हे कटू सत्य आहे.

१८५७च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर इंग्रज मुत्सद्दी बरेच काही शिकले. त्यासाठी आधीच्या मुसलमान सत्ताधाऱ्यांनी काय केले, याचा त्यांनी सखोल अभ्यास केला. त्या अभ्यासाच्या आधारावर त्यांनी आपली कुटिल नीतीची पायाभरणी केली. त्या नव्या राजधर्माची सूत्रे पुढीलप्रमाणे – १) फोडा आणि राज्य करा. २) मूर्ख बनवा आणि राज्य करा. ३) घाबरवा आणि राज्य करा. ४) विकत घ्या आणि राज्य करा आणि ५) समाजात सुधारणा करण्याचे नाटक करा आणि राज्य करा. थोडक्यात कौटिल्याच्या साम, दाम, दंड आणि भेद या राजनीतीची ही नवी इंग्रजी आवृत्ती होती. मुसलमान राज्यकर्त्यांनी हाच मार्ग स्वीकारला होता; पण त्यांनी केलेल्या चुकांची (आत्यंतिक द्वेष आणि हीन वागणूक, अत्याचार आणि बाटवा-बाटवी) पुनरावृत्ती आपण करावयाची नाही. आपण निर्माण केलेल्या चमच्यांद्वारे आपले राज्य न्यायी, शांततावादी आणि निधर्मी आहे याचा जगभर डांगोरा पिटायचा आणि आपले राज्य ही ऐतिहासिक गरज होती, हे भोळ्या हिंदूंना पटवून द्यायचे, असे त्रिसूत्री धोरण इंग्रज मुत्सद्द्यांनी ठेवले आणि यशस्वी करून दाखवले.

हे इंग्रजांचे राज्य उलथवून टाकायचे असेल, तर इंग्रजांचे खरेखुरे स्वरूप कोणते आणि नाटक कोणते हे जाणणारा आणि सांगणारा कोणी राजनीतीज्ञ आणि त्याने सुचवलेल्या मार्गाने जाऊन, शत्रूच्या व्यूहरचनेची नासाडी करणारा व शत्रूवर कुरघोडी करणारा प्रजाहितदक्ष आणि विवेकी राजा यांची जोडी आवश्यक होती. मुसलमानी राज्य नष्ट करण्यासाठी जसा समर्थ रामदास आणि शिवाजी या जोडीचा जन्म झाला होता, तशातला हा प्रकार.

दैव अनुकूल असेल, तर निरनिराळ्या काळामध्ये निरनिराळे गुरू भेटतात. दत्ताला नव्हते का चोवीस गुरू?

नुसत्या जोडीने जमते असे थोडेच आहे? शिवाजी-रामदासांच्या १०० वर्षे आधी तुलसीदास आणि महाराणा प्रताप यांची जोडी होतीच की. तोच राम, तोच हनुमान, तीच बेडर क्षात्रवृत्ती आणि स्वातंत्र्यलालसा, पण अकबराचे धोरण आडवे आले. शिवाजीला औरंगजेब फायदेशीर ठरला.

विरोधकांना नेस्तनाबूद करणाऱ्या साम्राज्यापुढे (स्टीम रोलर) लहानशी सत्ता म्हणजे अवघडच काम असते. त्यासाठी गुप्तता व विश्वासू माणसे आणि पेटलेले कार्यकर्ते आवश्यक असतात. नाटकाला प्रतिनाटक तेवढेच महत्त्वाचे.

हे सर्व रसायन सयाजीरावांच्या बाबतीत छान जुळून आले, म्हणून गुजराथी भाषेमध्ये लोक आजही म्हणतात, 'शिवाजी पछी सयाजी' (शिवाजी नंतर सयाजी).

सयाजीरावांची कारकीर्द १८७५ ते १९३९ म्हणजे प्रदीर्घ, चांगली ६४ वर्षांची. त्याचे चार कालखंड दिसतात.

कालखंड

**१) माधवरावांचा कालखंड (१८७५ ते १८८१)** – सयाजीराव सज्ञान नसल्यामुळे सहा वर्षे खरे राज्य सर टी० माधवराव या देशस्थ ब्राह्मणाने केले. इंग्रजांचा तो विश्वासातला माणूस असल्यामुळे, साहेबाने त्यांना झुकते माप दिले होते. एखाद्या संस्थानामध्ये अंदाधुंदी असेल, तर इंग्रज जाणूनबुजून 'वयाने सज्ञान नसलेला' राजा आणि 'सज्ञान असलेला' दिवाण अशी परिस्थिती कृत्रिमरित्या निर्माण करत आणि त्या काळामध्ये आपल्याला अनुकूल अशा सर्व गोष्टी सुधारणांच्या नावाखाली पदरी पाडून घेत.

**२) आयरीश खासगी शिक्षक इलियट याचा १४ वर्षांचा कालखंड (१८८१ ते १८९५)**– चेल्यावर 'प्रभुत्व तुझे का माझे?' या वादामध्ये गोरा साहेब जिंकला आणि काळ्या साहेबाला मुदतपूर्व निवृत्ती पत्करावी लागली. आयरीश असल्यामुळे १०० टक्के इलियट इंग्रजांना अनुकूल राहणे शक्यच नव्हते. हा तुझा दिवाण इंग्रजांची चमचेगिरी करण्यासाठी, बडोद्याच्या प्रजेच्या हिताविरुद्ध पहा कसा वागत आहे, एवढी बत्ती पुरे होती. नेमका इंग्रजबाबूंनी तोच आरोप इलियटवर ठेवला. ''तू इंग्रजांच्या हिताविरुद्ध काम करत आहेस!'' आणि या गुरूला ब्रिटिश सेवेमध्ये परत (रीव्हर्ट) बोलावून घेतले.

**३) टिळक कालखंड (१८९५ ते १९१६)** – जास्तीत जास्त मनावर ताण आणणारा आणि कसोटीचा दोन दशकांचा काळ. हा संघर्षाचा कालखंड इंग्रजांना फार तापदायक ठरला. इंग्रजबाबूंनी सयाजीरावांवर काही तरी गंभीर आरोप ठेवून त्यांना पदच्युत करण्याचे नक्की केले होते. पहिल्या महायुद्धामुळे ते वाचले. त्यांच्यावरचा पहारा अर्थातच वाढला. दुर्दम्य इच्छाशक्ती, स्वातंत्र्यलालसा आणि चांगल्या गुरूंचे मार्गदर्शन यांच्यामुळे सयाजीरावांनी शत्रूवर मात केली आणि अफाट लोकप्रियता मिळवली.

**४) अज्ञातवासाचा कालखंड (१९१७ ते १९३९)** – या प्रदीर्घ २२ वर्षांच्या कालखंडातील बराचसा काळ सयाजीरावांनी युरोपमध्ये घालवला. नवीन राजकीय नेत्यांच्या जगावेगळ्या धोरणांशी जुळवून घेणे त्यांना अवघड होते. ही देशभक्ती बेगडी आहे, नाटकी आहे, इंग्रजांना अनुकूल आहे, निदान प्रतिकूल तर नाहीच नाही, असे त्यांचे स्पष्ट मत होते; पण स्वजनांविरुद्ध बोलणे पाप ठरले असते, म्हणून त्यांचा भर सामाजिक आणि धार्मिक मुद्द्यांवर जास्त दिसू लागला. त्यांचे अंतरंग कोणी फारसे तपासून बघण्याच्या भानगडीत पडले नाही, कारण ते भारतामध्ये चटकन उपलब्धच नव्हते. मनुभाई मेहता (१९१६-२६) आणि व्ही०

टी० कृष्णम्माचारीयर (१९२६-४४) या दोन दिवाणांच्या शासकीय कौशल्यावर त्यांची भिस्त होती. एव्हाना ते केवळ बडोदे संस्थानचे राजे नव्हते, तर ते अखिल भारतीय राष्ट्रीय पुढारी बनले होते. बडोद्याचे शासन एवढ्यापुरते त्यांचे कार्य सीमित राहिले नव्हते. परकीय मदत मिळवून इंग्रजांना हटवून साऱ्या भारतामध्ये प्रजेचे हित आणि कल्याण पाहणारे समृद्ध आणि समर्थ शासन कसे आणता येईल, यावर त्यांचे सारे लक्ष केंद्रित झाले होते. योग्य ती संधी मिळताच योग्य ती कारवाई करून देशास स्वतंत्र करणे, हा त्यांच्या जीवनाचा एकमेव अर्थ आणि एक कलमी कार्यक्रम झाला होता. त्यांच्या आद्यगुरूंनी त्यांच्याकडून वचन घेतले होते, "हारजीत तो दैवाधीन है। लेकिन परमार वीरों के लिये ये कहाँ जा सकता है, ध्रुव आपने स्थानसे भले ही भ्रष्ट हो जाय, सुमेरू आपनी अचलता छोड दे, लेकिन परमार वीर इस तरहसे भाग जानेवाले नहीं है।"

सयाजीराव बडोद्यापुरते अत्यंत लोकप्रिय आणि फलकेंद्री (Result oriented) राजे ठरले. ते हुकूमशाही मानणारे, अत्यंत स्वाभिमानी, एकलकोंडे, हट्टी; पण प्रचंड बुद्धिमान राजे होते. त्यांचा कायद्याचा अभ्यास चांगला होता. इंग्रजांचा गायकवाडांशी झालेल्या कराराचा त्यांनी नीट अभ्यास केला होता. खंडेराव महाराजांनी इंग्रजांना मदत केली नसती, तर बडोदे संस्थान उत्तर आणि दक्षिण भारताच्या स्वातंत्र्ययुद्धाचा मध्यबिंदू होऊन इंग्रजांच्या विनाशास कारण झाले असते. उगाच नाही इंग्रजांनी बडोदेकरांची खंडणी घेणे बंद केले! त्यामुळे इंग्रजांनी सयाजीरावांना समान (Equal) दर्जा द्यावा, अशी त्यांची अपेक्षा होती. जेव्हा जेव्हा अपेक्षाभंग होई, तेव्हा तेव्हा ते दुखावले जात आणि त्यांचे मन इंग्रजांविरुद्ध बंड करून उठे! इंग्रजी साम्राज्यवादी बाबूंच्या हे फार उशिरा लक्षात आले आणि त्यांनी त्यांची वागणूक बदलली. सुंभ जळला तरी पीळ जात नाही. इंग्रज वरकरणी सयाजीरावांशी नीट वागत असले, तरी सयाजीरावांचे चित्त मूळ ध्येयापासून किंचितही विचलित झाले नाही. 'बरोडा बर्लिन करारा'सारखा टाईमबॉंब इंग्रजी सिंहासनाखाली ठेवून ते शांत चित्ताने मजा पाहत होते. सयाजीराव आणखी पाच-दहा वर्षे जगले असते, तर सध्याचे घराणेशाहीचे नेतृत्व कधीच उदय पावू शकले नसते. त्याच्या जागी अस्सल देशभक्त, राष्ट्रवादी आणि मुत्सद्दी नेत्याचे (Statesman)चे राज्य या देशात प्रस्थापित झाले असते आणि भारत कधीच महासत्ता म्हणून उदयास आली असती.

सयाजीराव प्लेटो, ॲरिस्टॉटल किंवा चाणक्यासारखे हाडाचे विचारवंत नव्हते. त्यांची सारी भिस्त त्यांच्या उत्तम सल्लागारांवर होती. त्यांचा एक-एक सल्लागार म्हणजे हिरा होता. त्यांच्या बळावर त्यांनी बडोद्याचे शासन उत्कृष्ट

रीतीने सांभाळले, सुधारणा घडवून आणल्या, नव्या प्रथा सुरू केल्या, इंग्रजी शब्द हटवून संस्कृतप्रचूर शब्द लोकप्रिय केले आणि प्रजेला सुशिक्षित, सुसंस्कारी आणि सुजाण बनवले. त्यामुळे सर्व संस्थानांमध्ये बडोदा संस्थानाला 'आदर्श संस्थान' असा बहुमानाचा दर्जा त्यांनी प्राप्त करून दिला. १८७५ मध्ये बडोदेकरांवरील करांचा बोजा बारा लक्ष रुपयांनी कमी केला. विकासासाठी दर वर्षी अंदाजपत्रका-मध्ये कर वाढवत जाणाऱ्या सध्याच्या अर्थमंत्र्यांना हे ऐकून बेशुद्ध पडायची वेळ येईल. १८७१ मध्ये बडोद्यामध्ये एक सुद्धा शाळा नव्हती. दोन-तीन शाळा मल्हाररावांनी ब्रह्मानंदांच्या सांगण्यावरून सुरू केल्या. आपल्या राज्यात विकास साधावयाचा असेल, तर येथे प्राथमिक शिक्षण मुलांना मोफत आणि आवश्यक करणे जरूरीचे आहे, याचा स्पष्ट उल्लेख सयाजीरावांनी दिवाण मणीभाई जसभाई देसाई (पटेल) यांना लिहिलेल्या पत्रामध्ये आपणास पाहावयास मिळतो. लोकमान्य टिळकांच्या सामाजिक सुधारणा बडोदे संस्थानामध्ये प्रयोग म्हणून बडोदे राज्यामध्ये वापरण्याचे ठरले होते. त्याप्रमाणे नोव्हेंबर १८९३ मध्ये अमरेली शहर आणि आजूबाजूच्या नऊ खेडेगावांमध्ये सयाजीरावांनी ही योजना राबवली आणि हळूहळू सर्व राज्यांमध्ये १९०६ च्या कायद्याने तिचा अंमल केला. १९४५ मध्ये बडोदे राज्यात २,६१४ शाळांमध्ये तीन लक्ष मुले-मुली शिक्षण घेत होती.

ब्रिटिश इंडियातील बडोदे राज्य शिक्षण क्षेत्रामध्ये किती तरी पुढे होते. मध्यवर्ती विधानसभेमध्ये साऱ्या भारतामध्ये बडोदे राज्याप्रमाणे मोफत आणि आवश्यक प्राथमिक शिक्षण इंग्रज सरकारने सुरू करावे, असा ठराव १६ मार्च १९११ रोजी गोपाळ कृष्ण गोखले यांनी मांडला. सर ससून डेव्हिड यांनी अजून अशी वेळ आली नाही असे म्हणून विरोध केला. ''बडोदे राज्यामध्ये तशी वेळ येते आणि ब्रिटिश इंडियामध्ये येत नाही याचे कारण ससून सांगू शकतील काय? ''असा प्रश्न गोखले यांनी करताच हारकोर्ट बटलर या शिक्षण सदस्यांनी उत्तर दिले, ''बडोदे हुकूमशाही मानते, आपण लोकशाही मानतो'' (नंदा, बी० आर०, गोखले, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी, प्रेस १९९८, पृ० ३८८). खरी गोष्ट, इंग्रज सरकारला शिक्षणाच्या बाबतीत काही करायचे नव्हते; पण गोखले यांनी बडोद्याचे नाव काढताच इंग्रजी बाबू मंडळींच्या नाकाला मिरच्या झोंबल्या. इंग्रजांवर असा नैतिक विजय मिळवणारे सयाजीराव एकुलते एक संस्थानिक होते.

। । ।

# ४



# समाजकारण

## १. सयाजीराव आणि टिळक

### अ – पार्श्वभूमी

अरविंद बडोद्यामध्ये १८९३ मध्ये गायकवाडांच्या सेवेत रुजू झाले. तेव्हापासून रेसिडेंट कर्नल बिडुल्फने ३० वर्षांच्या महाराजांवर राजद्रोहाचा आरोप करण्यास सुरुवात केली. त्यासाठी बापट प्रकरण (१८९२-१९९५) उकरून काढण्यात आले. म्हणून लोकमान्य टिळक यांना बापटांना वाचवण्यासाठी बडोद्यामध्ये मुक्काम ठोकावा लागला. सर्व लेखक तेव्हापासून टिळक आणि सयाजीराव यांचे संबंध सुरू झाले, असे मानतात; पण त्या आधी हे संबंध श्रावणमास दक्षिणेच्या निमित्ताने दृढ झाले होते. टिळकांनी या परीक्षेमध्ये एक प्रबंध लिहून पारितोषिक मिळवले होते.

परीक्षक होते राजारामशास्त्री बोडस आणि बाळशास्त्री आगाशे. त्यानंतर टिळक आणि प्रो० गज्जर यांना राज्यशास्त्र आणि व्यापार यांच्या उच्च शिक्षणासाठी फ्रान्स किंवा जर्मनीमध्ये धाडण्याचा एक संकल्प झाला. पण बापट प्रकरण उद्‌भवले आणि तो संकल्प तसाच राहिला. बडोद्याचे न्यायमूर्ती आठल्ये आणि पुण्याचे टिळक हे दोघे वर्गमित्र. त्यांच्या माध्यमातून पुणे आणि बडोदे यांचे संबंध जास्त बळकट झाले (अ० ज० करंदीकर, क्रांतिकारक टिळक नि त्यांचा काळ, काळ प्रकाशन, १९६९, पृ० २७०-२७१). नर्मदा-विश्वामित्री ॲक्सिसमुळे पुणे-बडोदे संबंध अधिक बळकट होत गेले. पुण्यामध्ये देशप्रेमाचा ओघ विष्णुशास्त्री चिपळूणकरांमुळे सुरू झाला. तो वृद्धिंगत करण्यासाठी शास्त्रीबुवांनी 'न्यू इंग्लिश स्कूल'ची स्थापना केली आणि दुसऱ्या बाजूला टिळक आणि आगरकरांच्या मदतीने 'केसरी' व 'मराठा' ही दोन पत्रे सुरू केली. चित्रशाळा, किताबखाना वगैरे संस्था सुरू करण्यामागे शास्त्रीबुवांचीच प्रेरणा होती. नव्या पिढीला पारतंत्र्य नष्ट करण्याचे तंत्र

आणि मंत्र शास्त्रीबुवा सतत देत होते. त्यामध्ये राजकीय आणि सामाजिक सुधारणांवर भर होता.

सयाजीरावांना 'आमच्या देशाची स्थिती' हा शास्त्रीबुवांचा निबंध तोंडपाठ होता. चिपळूणकरांनी त्यामध्ये लिहिले होते, "आमच्या प्रस्तुतच्या दैन्याचे मुख्य कारण काय हे कोणासही सांगावयास नको. ते परकी अंमल हे होय, हे उघड आहे... आमची अन्नानगता झाली आहे. दुष्काळाचा तडाखा उडाला म्हणजे लाखो लोकांची चांदी उडते आहे. सरकारी देण्याखाती रयतेचा चुराडा होत आहे... ही स्थिती सर्वांच्या डोळ्यांसमोर आहे आणि देशोन्नतीचे धुरंधर वरील विपत्तीच्या प्रतिकारार्थ उद्योग कार्य करत आहेत. म्हणाल तर एक आकाशातील बापास आरोळी देत आहेत, दुसरे आपल्या लेडीकरवी कोणा गौरकाय अधिकाऱ्याचे हस्तपीडन – पूर्व स्वागत करत आहेत. कोणी पार्लमेंटच्या गर्दीत गुंग आहेत, कोणी अर्वाचीन सोमरसात तल्लीन होऊन जातिभेदरूपी महान उपशम होऊन या देशास आराम पडावा म्हणून अर्वाचीन ऋषींचा तांडा जुळवून गवालभाचे अनुष्ठान करत आहेत. कोणी सरकारी अधिकाऱ्यांचे प्रतिदिवशी उंबरठे पुजून त्यांच्यापुढे निरंतर लांगूलचालन करत आहेत! हा सर्व प्रकार आम्हास तर केवळ लज्जास्पद वाटतो."

सयाजीरावांना शास्त्रीबुवा सैद्धान्तिक पार्श्वभूमी पुरवत, तर 'केसरी' आणि 'मराठा' व्यावहारिक व प्रात्यक्षिक. 'केसरी' नुकताच सुरू झाला होता. त्यामध्ये मवाळ वाटणाऱ्या आगरकरांनी आग पाखडली होती, "पाषाण आणि काळ, धातू आणि मृत्तिका यांचे जसे संमेलन होत नाही, त्याप्रमाणे अधिकारी आणि अनाधिकारी, स्वामी आणि सेवक, सकांचन आणि निष्कांचन, स्वातंत्र्य आणि पारतंत्र्य यांची मैत्री जुळत नाही. समानशीलत्व हे अन्योन्य मैत्रीचे आद्य बीज किंवा आदिकारण असते. वरील वाक्यांचे यथार्थ ज्यांच्या लक्षात बरोबर उतरेल, त्यांना युरोपियन आणि नेटिव्ह यांचे परमसख्य कधीच बनायचे नाही, असे जे आम्ही आग्रहाने म्हणतो त्याचा चमत्कार वाटणार नाही... कोणतेही राष्ट्र कितीही सामर्थ्यवान असो, त्याने अशी घमेंड बाळगू नये, अमुक एक देश मी जिंकला आहे, त्याचे स्वामित्व माझ्याकडे निरंतर राहीलच राहील... हिंदुस्थान देशाचे ज्ञान आणि धन प्रतिवर्षी वाढत आहे, हे खरे असले तरी इंग्रज आणि नेटिव्ह यांची मैत्री उत्तरोत्तर वाढत जाणार नाही. इतकेच नाही तर दिवसेंदिवस यांच्यात कलागती लागत जाऊन, परिणामी हातघाईवर काम येऊन ठेपेल व या रीतीने हिंदुस्थानला आपली मुक्तता करून घेता येईल, असे मानल्याखेरीज प्रत्यवाय नाही... किती जरी झाले तरी, हिंदू लोक धनसंपन्न आणि ज्ञानसंपन्न झाले म्हणजे इंग्रज लोक एक दिवशी आपले चंबुगबाळे आटोपून चालते होतील, असे कोणीही मानू नये.

राज्यशास्त्राप्रमाणे व ऐतिहासिक अनुभवाप्रमाणे हिंदुस्थानच्या लोकांची अक्कल आणि ताकद दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत जाऊन शेवटी घरची मंडळी आगंतुकना धुडकावणार.''

सयाजीरावांना वाटे, ब्रह्मेंद्रस्वामी काय किंवा दयानंद स्वामी काय, हेच तत्त्वज्ञान आपणास सांगत असतात. नर्मदा आणि मुळा-मुठा यांच्या समान विचारांचे त्यांना आश्चर्य वाटे! या तिन्ही नद्यांचा विश्वामित्रीशी संबंध जुळवून आणायचाच, असा निश्चय सयाजीरावांनी मनातल्या मनात केला.

सुरुवातीला दादाभाई नवरोजींच्या सांगण्यावरून महाराजांनी टिळक यांना बोलावून घेऊन, त्यांची ओळख करून घेतली. त्या वेळी टिळक मुंबईच्या विधिमंडळाचे सभासद होते. महाराजांनी टिळक यांना ग्रंथलेखन करण्याची विनंती केली आणि त्यासाठी आपण आर्थिक साहाय्य देऊ, असे सूचित केले. टिळक यांनी ''राजकारणामुळे वेळ कमी पडतो,'' असे उत्तर दिले. ''आपण आर्यनीती मीमांसेवर माहिती एकत्र करावी अशी आमची इच्छा आहे, त्यावर आपला ग्रंथ फार उत्तम होईल, असे आम्हाला वाटते,'' असे सयाजीराव त्यावर म्हणाले. पुढे मंडाले येथे असताना टिळकांनी 'गीतारहस्य' लिहले आणि त्याला 'हिंदू फिलॉसॉफी ऑफ लाईफ, एथिक्स् अँड रिलीजिअन' असे उपशीर्षक दिले, त्याचे बीज या संभाषणामध्ये आहे (अ० ज० करंदीकर, क्रांतिकारक टिळक नि त्यांचा काळ, १९६९, पृ० ). महाराजांना टिळकांना जर्मनीला धाडण्याची जबरदस्त इच्छा होती; पण पहिल्या महायुद्धामुळे ती अपुरीच राहिली. या मंडळींचे जर्मनीशी चांगले मेतकूट होते. थोडक्यात अरविंद, सयाजीराव आणि टिळक या तिघांना धर्मशास्त्र, समाजशास्त्र आणि राज्यशास्त्र यांची उत्तम सांगड घालून, आपली स्वातंत्र्यसमराची 'आगेकूच' पुढे न्यायची होती.

## आ – टिळकांच्या दोन मागण्या

(लेखकाचे चुलते म० पां० नेने, निवृत्त न्यायाधीश यांनी सांगितलेल्या आठवणींमधून) ''उघडपणे आपण नेहमी एकमेकांस भेटणे हे उभयतांना हितावह नाही. आपल्या इंग्रजी सासूला ते कदापी पसंत पडणारे नाही. तिचे हेर सतत आपल्या आजूबाजूस फिरतच असतात. त्यांना सत्य कधीच समजत नाही. त्यामुळे ते त्यांची कल्पनाशक्ती वापरतात आणि काल्पनिक अहवाल तयार करून धाडतात. दुर्दैवाने इंग्रज अधिकारी त्यावर विश्वास ठेवून पुढील कार्यवाही सुरू करतात.'' अहमदाबादच्या १९०२ च्या काँग्रेस अधिवेशनाच्या प्रसंगी टिळकांनी महाराजांना सावध केले (Shishirkumar Mitra, 'Biography of Aurobindo').

''अगदी खरे आहे आपले निरीक्षण,'' सयाजीरावांनी त्याला दुजोरा दिला.

''आपल्या दुर्दैवाने या सरकारी अहवालाला पुष्टी देण्यासाठी आमचे मवाळाग्रणी एका पायावर तयार असतात. सरकारच्या मर्जीमध्ये राहण्यासाठी आणि 'रावसाहेब' व 'रावबहादूर' बनण्यासाठी कोण ही धडपड! जेवढ्या ते जास्त चहाड्या करतील, तेवढे ते सरकारला जास्त प्रिय होतील.''

''सुधारणा तर करायच्या, पण या सरकारी पोपटांना विरोध करायचा, हे आपले धोरण नेहमी राहील ना?''

''पण का? ते देशभक्त नाहीत?'' सयाजीरावांचा प्रश्न

''ते देशभक्त जरूर आहेत. स्वातंत्र्यलढ्यासाठी आपल्याला तरुण रक्ताची जरूर पडणार आहे. सामाजिक सुधारणांत आपले तरुण अडकून पडले, तर स्वातंत्र्याचा लढा लढणार कोण? हे सुधारक बोलघेवडे आणि भित्रे आहेत. बोलणे सोपे आहे, प्रत्यक्ष कृती करायची झाल्यास, हे काही तरी कारण काढून पळून जातात.''

''सुधारणांच्या बाबतीतदेखील?''

''होय, सरकारला सुधारणा प्रिय आहेत, म्हणून त्यांना सुधारणा आवडतात. सरकारच्या निकट वर्तुळामध्ये राहण्यासाठी हा सारा अट्टाहास आहे.''

''मला आपले निरीक्षण आवडले,'' सयाजीराव म्हणाले.

''त्यांच्याबरोबर राहिले आणि प्रत्यक्ष काम केले की, त्यांचे मानस समजते, एरवी नाही. लढनेकू तुम और खानेकू हम, असा ह्यांचा खाक्या आहे.''

''आपण कसल्याशा मदतीचे म्हणत होतात?''

''मला स्वतःला आपल्या समाजामध्ये सुधारणा करायला आवडेल; पण मला सनातनी आणि सुधारकांना एकत्र घेऊन पुढे जायचे आहे. मी सुधारणांचे बोलू लागलो की, सनातन्यांचे डोके फिरेल आणि त्यांचे सहकार्य मिळणार नाही. म्हणून एक विनंती अशी की, आपल्या संस्थानामध्ये आपण पुढारीपण घेऊन, या सुधारणा राबवाव्यात. गुजराथी समाज सनातनी आणि स्थितिप्रिय आहे. त्याच्या गळी या सुधारणा उतरल्या तर देश स्वतंत्र होताच त्या आपल्याला साऱ्या देशामध्ये हसत लागू करता येतील. जसा प्रयोगशाळेत एखादा पदार्थ लहान प्रमाणावर यशस्वीपणे तयार करता आला, तरच त्याचे कारखान्यात मोठ्या प्रमाणावर उत्पादन करता येते. त्याप्रमाणे बडोदे संस्थान सुधारणांच्या बाबतीत भावी हिंदुस्थानची प्रयोगशाळा व्हावी.''

"मला मान्य आहे."

"आपले पाहून काही राजेमहाराजे आपली नक्कल करण्यासाठी पुढे सरसावतील." टिळकांचा आशावाद.

"त्याने ब्रिटिश सरकार खुष होणार असेल, तर ते निश्चित आमची नक्कल करतील, प्रजेसाठी नाही."

"साहजिक आहे, कारण प्रजेसाठी काम करणे हे नोकरशहांचे काम आहे, असे त्यांना वाटते. निदान तसे ते बाह्यतः दाखवतात. संस्थानिकांनी ऐय्याशी करावी, चैन आणि मौजमस्ती करावी, म्हणजे नोकरशाहीला रोजच्या शासनामध्ये ढवळाढवळ करता येते, असे इंग्रजांचे धोरण आहे. आणखी एक विनंती आहे."

"सांगा."

"आम्हास परदेशी जाणे परवडण्यासारखे नाही, कोणत्याही अर्थाने."

"उदाहरणार्थ?"

"आम्ही बाहेर राहिलो, तर येथील लोकांच्या अडीअडचणी कोण सोडवील? अर्थात पासपोर्ट, तेथील राहणे-खाणे, स्थानिक भाषाज्ञान आणि संस्कृतीचा फरक वगैरे बऱ्याच रोजच्या अडचणीही आहेत. आता विनंती अशी की, हे परदेश खाते आपण सांभाळावे. आपल्याजवळ वेळ आहे, पैसा आहे आणि मुख्य म्हणजे राष्ट्रवादी दृष्टी आहे. आमच्यापेक्षा आपल्याला अडचणी कमी येतील. सरकारचे अर्थात आपल्यावर लक्ष राहणारच आहे, पण आमच्यापेक्षा कमी."

"पण तेथे जाऊन आम्ही काम काय करणार?"

"कामाला काय तोटा? शत्रूचा शत्रू तो आपला मित्र करायला सहसा कोण राजी नसते. आपले पहिले काम - इंग्रजविरोधी आणि आपल्याला मदत करू शकतील अशा व्यक्ती व असे देश शोधणे. दुसरे - ते किती, कशी आणि केव्हा मदत करू शकतील ते पाहणे. तिसरे - आपल्या राष्ट्रवादी कामामध्ये आपल्याला मदत करू शकतील अशी माणसे शोधून काढून, त्यांना परदेशी कायम वा थोड्या काळासाठी गुंतवून ठेवणे. थोडक्यात या मित्र राष्ट्रांशी आपण सतत आपल्या संपर्क यंत्रणेद्वारा संबंध ठेवले पाहिजेत."

"काम फारसे अवघड नाही."

"सोपेही नाही. कारण बाहेरून आपल्याला दाखवावे लागेल की, आपण तेथे मजा मारायला किंवा तब्येत सुधरवण्यासाठी जात आहात, पण आतून आपले काम अगदी वेगळे असणार आहे."

"ते आले लक्षात. छान साहसाचे काम आहे, मजा येईल. पुष्कळ परदेशी पुढाऱ्यांच्याही नेहमी गाठीभेटी होतील आणि मुख्य म्हणजे चांगल्या तज्ज्ञ

लोकांकडून रोज नित्य नवे शिकायला मिळेल. त्या बाबतीत काही विशेष सूचना?''

''रामदासांचीच सूचना. 'सावधपण सर्व विषयी, सर्व काळ' आपण साळसूदपणे रोजच्या रोज दैनंदिनी लिहावी. सरकारला जे पसंत नाही, ते आत लिहू नये. जे पसंत पडेल तेच खरेखोटे; पण खास लिहावे. ही दैनंदिनी आपल्याला अडीअडचणीत पुरावा म्हणून उपयोगी पडणार आहे. सरकारही खूष व आपणही.'' (टिळक, महाराज आणि अरविंद अहमदाबादेत असताना दिल्लीत कर्झनच्या हत्तीवरील मिरवणुकीत त्यास ठार मारण्याची योजना आखली जात होती.)

## २ – सामाजिक सुधारणा

बारा-तेरा वर्षांच्या सयाजीरावांनी १८७५ मध्ये दत्तक जाऊन राजेपण मिळवले असले, तरी राज्याधिकार त्यांना ६ वर्षांनंतर म्हणजे १८८१ मध्ये प्राप्त झाले. या अर्ध्या तपाच्या काळामध्ये अधिकृत शिक्षकांच्या व्यतिरिक्त त्यांच्या मनावर आर्य समाजातील दूरदृष्टीच्या काही श्रेष्ठ पुढाऱ्यांनी खूपच धार्मिक आणि सामाजिक प्रभाव पाडला. त्यातील काही निवडक नेते पुढीलप्रमाणे –

**अ) स्वामी दयानंद (१८२४-१८८३)** – हे १८४७ मध्ये प्रथम अहमदाबादहून बडोदा येथे आले, नर्मदा नदीच्या तीरी गंगनाथ येथे स्वामी सच्चिदानंद परमहंस, ब्रह्मानंद वगैरे १८५७ च्या योगी आणि साधूसंन्याशांना भेटले आणि तेथे त्यांनी वेदशास्त्रे, योगशास्त्रे वगैरे ज्ञान आत्मसात केले. दोन दशकांनंतर स्वामी दयानंद बडोद्याच्या रेल्वे स्टेशनसमोरील गोविंदराम रोडे यांच्या धर्मशाळेत डिसेंबर १८७५ ते फेब्रुवारी १८७६ या काळामध्ये राहिले होते. तेथील पटांगणात त्यांची तीन भाषणे गाजली. पहिले 'देशोन्नती' वर, दुसरे 'वेदाधिकार' आणि तिसरे 'राजधर्मा'वर. कडाक्याच्या थंडीला न जुमानता श्रोत्यांच्या गर्दीमध्ये दिवाण टी० माधवराव, मणीभाई जसभाई पटेल, रा० ब० गजानन विठ्ठल, रामचंद्र गोपाल देशमुखांसारखे मोठे अधिकारी हजर राहात असत. तिसऱ्या भाषणाच्या वेळी काही पंडितांनी वेदांचे स्वर शूद्रांच्या कानी पडू नयेत म्हणून खूप आरडाओरड केली; पण या बड्या मंडळींसमोर त्यांचे फारसे चालले नाही. यज्ञेश्वरशास्त्री, पं० कृष्णशास्त्री, अप्पयशास्त्री वगैरे बऱ्याच जणांनी स्वामीजींशी शास्त्रार्थ करून त्यांचा पराभव करण्याचा प्रयत्न केला; पण ते फिक्के पडले.

खुद्द दिवाण स्वामीजींवर 'राजधर्मा'वरील भाषणामुळे फारच फिदा होते. इंग्रजधार्जिण्या राजमाता जमनाबाईंनी स्वामीजींची भेट मागितली; पण ती त्यांना मिळू शकली नाही. दिवाणांनी सयाजीराव आणि स्वामीजी यांची खास भेट घडवून आणली. स्वामी दयानंद यांनी महाराजांच्या मनावर चार गोष्टी ठसवल्या – (१)

एकेकाळी जगावर राज्य करणाऱ्या वैदिक संस्कृतीला उतरती कळा १००० नंतर का लागली, त्याची कारणे तज्ज्ञांशी विचारविनिमय करून शोधून काढा. त्या दोषांचे निर्मूलन करण्याच्या प्रयत्नांमध्ये राहा. (२) आपल्याला परमेश्वराने दिलेल्या सत्तेच्या सुवर्णसंधीचा जास्तीत जास्त फायदा उठवा. (३) शिवाजी महाराजांना गोब्राह्मणप्रतिपालक का म्हणतात आणि इंग्रज त्यांचे नाव मिटवण्याच्या का मागे आहेत, याचा नीट विचार करा, म्हणजे आपल्याला काय मिळवायचे आणि काय टाळायचे, याचा आपोआप बोध होईल. शिवाजीला रामदास मिळाले, तसे समर्थ विद्वान मार्गदर्शक मिळवा. (४) ब्राह्मणांचा ऱ्हास अहंकाराने आणि क्षत्रियांचा व्यसनांनी झाला आहे, ते विसरू नका (आचार्य पं० लक्ष्मीदत्तजी दीक्षित, पृ० ६, ७, २१, २३). स्वामी दयानंदांनी सयाजीरावांना जी चेतावणी (वॉर्निंग) दिली, ती महाराज शेवटपर्यंत विसरले नाहीत. ''अस्पृश्योद्धार जर झाला नाही तर हिंदू धर्माला फार मोठी किंमत चुकवावी लागेल आणि ती किंमत सवर्णांच्या रक्ताची असेल. विधर्मी लोक, विधर्मी प्रचारक आणि विदेशियांचा पैसा घेऊन, देशामध्ये फूट पाडणारे आमचेच स्वार्थी देशद्रोही याचा फायदा घेतल्याशिवाय राहणार नाहीत. म्हणून आर्य-समाज या प्रश्नाला आणि शुद्धीकार्याला जास्तीत जास्त महत्त्व देतो. सनातन वैदिक धर्माच्या झेंड्याखाली सर्वांनी एकत्र यावे ही काळाजी गरज आहे. तरच हिंदू समाज वाचेल आणि ताठ मानेने उभा राहू शकेल. एकतेसाठी हे एवढे मत, पंथ आणि संप्रदाय काय कामाचे? त्यांनी एकता कशी वाढेल? त्याने तर उलट, दुहीचा बुजबुजाट होईल.'' भेटीच्या अंती दयानंदांनी सयाजीरावांना शुभाशीर्वाद दिले आणि बजावले, ''एक लक्षात ठेव, केवळ बडोद्याच्या प्रजेसाठी देवाने तुला जन्माला घातले नाही. भविष्यात तू भारताचा सम्राट होणार आहेस हे समजून तुझ्या राज्यात सुधारणा घडवून आण, आर्थिक प्रगती साध आणि साऱ्या जगामध्ये नाव मिळव. हे सोपे नाही. त्यासाठी तुला तू आणि तुझ्या घरचा संसार यांना तिलांजली द्यावी लागणार आहे. तुला राष्ट्राचा संसार चालवायचा आहे, एका घराचा नाही.'' स्वामीजींचे हे शब्द सयाजीरावांनी शेवटपर्यंत ध्यानात ठेवले.

**आ) स्वामी नित्यानंद** (१८६०-१९१४) – दयानंदांनंतर हिंदुस्थानातील प्रत्येक संस्थानिकाला भेटून त्यांचे स्वातंत्र्यसमरासाठी छोटेमोठे योगदान स्वीकारण्याची जबाबदारी नित्यानंदांवर होती. प्रत्येक संस्थानामध्ये दिवाण आणि अन्य मोठ्या पदांवर आपली आर्यसमाजी विद्वान माणसे नेमण्याचा त्यांचा धडाका मोठा प्रशंसनीय होता. सतत फिरतीवर असलेल्या या थोर आर्यसमाजी पुढाऱ्यांचे कार्य फार मोठे होते. तरी सुद्धा त्यांची फार थोडी माहिती खुद्द आर्यसमाजी लोकांना आहे. राजस्थानमध्ये खर्वा संस्थानच्या गोपालसिंहजी खर्वांना नित्यानंदांनी अशीच

देशभक्तीची संथा दिली होती. ते टिळकांचे अभिमानी होते आणि 'गदर'चे राजस्थानमध्ये काम करत. कपडवंज येथे त्यांचे गुजराथमधील केंद्र मणीलाल हा त्यांचा विश्वासू मित्र सांभाळी. नसिराबादच्या छावणीवर लष्करी हल्ला करून अजमेरचा भाग आपल्या प्रभुत्वाखाली आणण्याचा त्यांचा कट फसला. दिल्लीत लॉर्ड हार्डिंगवर बॉंब टाकला, त्या कटामध्ये त्यांचा हात होता. शिकारीच्या नावाखाली त्यांचे सर्व उद्योग जंगलात चालत. मार्गदर्शनासाठी ते सयाजीरावांना भेटत. लोकांना या देशभक्त राजाची काहीच माहिती नाही. बॅ० श्यामजी कृष्ण वर्मा यांना नित्यानंद यांनीच पुढे आणले होते, एवढे सांगितले तरी बस होईल!

**इ) पं० आत्माराम अमृतसरी** (बडोदा १९०७-१९३८) – पं० आत्माराम म्हणजे नित्यानंदांनी महाराजांना दिलेली सर्वोत्कृष्ट देणगी. लोक त्यांना भाड्याने घरही देईनात. महाराजांनी त्यांना एका लष्करी अधिकाऱ्याचा जुना बंगला राहावयास दिला. त्या बंगल्याला 'भूतिया बंगलो' (भुताचा बंगला) असे म्हणत! अस्पृश्यांसाठी काम करणाऱ्यांना आणखी केवढी सोय पाहिजे? त्यांनी बडोदे संस्थानामधील प्रत्येक गावाला भेट देऊन, तेथील परिस्थिती जाणून ३०० अंत्यज शाळा आणि चार आश्रम सुरू केले.

**ई) सुधारक** – लोकमान्य टिळक यांनी महाराजांना बजावून सांगितले होते की, "सुधारक कमी देशभक्त आहेत, असे मी कधीही म्हणणार नाही. त्यांचे धार्मिक आणि सामाजिक सुधारणांचे काम सनातनी लोकांना अप्रिय वाटले, तरी तेवढेच महत्त्वाचे आहे; पण त्यांची सरकारशी सारखी चाललेली लगट आणि अनुनय यामध्ये आपल्यासाठी धोका आहे. त्यामुळे त्यांच्याशी व्यवहार ठेवताना जपून राहा, त्यांच्या जाळ्यांत फसू नका." टिळकांच्या 'केसरी'चे नियमित वाचन आणि बापूसाहेब आठल्ये यांच्यामार्फत टिळकांचे नियमित मिळणारे संदेश यांच्यामुळे सयाजीरावांना महाराष्ट्राच्या आणि त्यातून समस्त हिंदुस्थानच्या प्रचलित राजकारणाची 'खरी' ओळख आपोआप होत होती. रानडे स्वतःला 'प्रॉटिस्टंट हिंदू' म्हणवीत. 'ना हिंदू, ना मुसलमान' असे त्यांचे उद्गार सुप्रसिद्ध आहेत. त्यामुळे न्या० रानडे यांना त्यांनी दिवाणपद सुद्धा देऊ केले होते! गोपाळ कृष्ण गोखले स्वतःस महाराजांचे निकटवर्ती सल्लागार समजत! वाघ आणि वाघाच्या मावश्यांना एकत्र बाळगण्याची, त्यांना मदत करण्याची आणि त्यांचे एकमेकांवरील आरोप-प्रत्यारोप ऐकण्याची आणि कधीकधी त्यांना समजवण्याची साहसी सर्कस हा सम्राट मोठ्या मजेमध्ये चालवत होता.

सरदेसाई आणि इतर धार्मिक गुरू यांच्यामुळे आणि सारा आशिया व युरोप खंड भ्रमंती करून तेथील विद्वानांशी चर्चा विनिमय केल्यामुळे इंग्रजांच्या

साम्राज्यशाहीची आणि त्यांच्या 'फोडा आणि राज्य करा' या धोरणाची भयंकर चीड महाराजांच्या मनामध्ये निर्माण झाली होती. मुस्लिमांच्या आक्रमणांच्या विरोधामध्ये मराठे (ब्राह्मण आणि मराठा) उभे राहिले आणि त्यांचा पराभव करून हिंदूंना त्यांनी संरक्षण दिले. युरोपमध्ये फर्डिनांड आणि त्यांची राणी एलिझाबेथ यांनी ते कार्य केले; पण आशिया खंडामध्ये मुस्लिमांचा घोर पराभव करणारे फक्त आणि फक्त मराठे! हेच इंग्रज आणि परकीय मुस्लिमांना खटकत होते. याच मराठ्यांनी १८५७ मध्ये हिंदू आणि मुसलमान यांना एकत्र आणून इंग्रजांविरुद्ध लढायला लावले होते. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद म्हणूनच त्यांना नको होता कारण त्यामुळे इंग्रजी सत्ता स्थिरावत होती.

उ) **निर्भीड विचार** – पूर्व ती पूर्व आणि पश्चिम ती पश्चिम. तरी देखील अध्यात्म आणि विज्ञान यांच्या संगमाचा सिद्धान्त सयाजीरावांना मान्य होता. पूर्वेचे अध्यात्म कोठे पळून जाणार नव्हते. प्रश्न होता पाश्चिमात्य विज्ञान पूर्वेच्या लोकांना शिकवण्याचा. विज्ञानाशिवाय आर्थिक स्वातंत्र्य नाही आणि आर्थिक उन्नतीशिवाय देशाला स्वातंत्र्य कोठून मिळणार होते? इंग्रज आपणहून दोन्ही स्वातंत्र्ये आपल्याला कधीच देणार नाहीत, याची त्यांना खात्री पटली होती. १९०६ च्या कलकत्त्याच्या औद्योगिक परिषदेत ते म्हणाले की, ''पाश्चिमात्य संस्कृतीमध्ये बरेच दोष आहेत.

शहरामध्ये सारी कामगारांची लोकवस्ती ठासून भरलेली दिसते. ती त्यांच्या भवितव्याच्या दृष्टीने घातक आहे. भांडवलदार आणि कामगार यांच्यामध्ये एक मोठी मानवी दरी आहे. दिवसेंदिवस ती रुंदावतच जाणार आहे. तेथील वातावरण अधाशीपणाने दूषित झाले आहे. याउलट, भारतीयांचा तत्त्वज्ञानी साधेपणा आणि घराविषयी ओढ तेथील लोकांना गोंधळून टाकते'' (सयाजीराव गायकवाड यांची भाषणे, वि० पां० नेने, संपादक खंड १, पृ० ९१, १२३). सयाजीरावांना स्वतंत्रता, समता आणि विश्वबंधुत्व या फ्रेंच क्रांतीच्या तीन सूत्रांनी मोहून टाकले होते. प्रजाजनांनी नेहमी राज्यकर्त्यांच्या ओंजळीने पाणी प्यायची वृत्ती त्यांना आत्मघातकी वाटे. त्यांनी सुखसोयीसाठी स्वावलंबी व्हावे, अशी त्यांची अपेक्षा असे. आपली कार्यक्षमता वाढवण्यासाठी सवलती मागण्याचा त्यांचा हक्क ते मान्य करत. राष्ट्र म्हणजे बहुजनसमाज. राष्ट्रहित म्हणजे मूठभर लोकांचे हित नव्हे. ''जे राष्ट्र गरीबवर्गाचा तिरस्कार करते, त्यांना स्वाभिमान बाळगण्याचा अधिकार मानत नाही, तसेच सामाजिक दर्जा वाढवण्याची संधी नाकारते, ते सरकार वा तो देश आपले घर वाळूच्या पायावर बांधतो'' (Ibid p. 256). आपल्या राज्यात सर्व प्रकारच्या सुधारणा घडवून आणून आपल्या प्रजेला सुखी, संतोषी आणि समृद्ध

करण्याचा सयाजीरावांनी विडा उचलला होता. तोही स्वातंत्र्यप्राप्तीचा एक मार्ग होता.

**ऊ) सुधारणांची यादी**

**भाग १ – शैक्षणिक**

'शिक्षणातून स्वातंत्र्याकडे' अशी सयाजीरावांची दृढ समजूत होती. त्यामुळे बडोदे ही प्रयोगशाळा समजून त्यांनी शिक्षणाचे सर्व प्रकारचे प्रयोग आपल्या राज्यामध्ये करून बघितले. तो काळ वेगळा होता. या प्रयोग करण्यात सयाजीरावांनी किती विरोध सहन केला असेल ते फक्त त्यांना ठाऊक होते. सर्व संस्थानिकांमध्ये ही हिंमत फक्त सयाजीरावांची होती, कारण त्यांना लोकमान्य टिळकांचा पाठिंबा होता. ''तुम्ही इंग्रजांचे मांडलिक असलात, तरी शिक्षणासारख्या चांगल्या कार्यामध्ये तुम्ही स्वतंत्र आहात. पाच लाखांऐवजी पंधरा लाख तुम्ही वापरले, तरी इंग्रजांचे काही चालणार नाही'' (१९४५ मध्ये लॉर्ड वॅव्हेलने बडोदे, म्हैसूर आणि त्रावणकोर संस्थानापुरती ही गोष्ट कबूल केली होती).

१८५६ नवसारी येथे पारशी लोकांची एकुलती एक मद्रसा होती. सर्वत्र हिंदूंच्या पाठशाळा आणि मुसलमानांच्या मद्रसा असत, पण मर्यादित.

१८७८ बडोद्यामध्ये पहिली कन्याशाळा मेहता गल्लीमध्ये सुरू.

१८८२ फिमेल ट्रेनिंग स्कूल

१८८६ मौलाबक्षांच्या मदतीने संगीत शाळेची स्थापना

१८९३ मुसलमान मुलींसाठी शाळा; आवश्यक व मोफत प्राथमिक शिक्षण

१८९४ संग्रहालयाची (म्युझियम) स्थापना

१८९७ आदिवासींसाठी आश्रमशाळा

१९०४ बुरखाधारी स्त्रियांना अक्षरओळख व्हावी म्हणून खास वर्ग

१९०६ सर्व शाळांमध्ये हिंदी भाषा आवश्यक केली

१९०९ बहिरे आणि मुके यांच्यासाठी खास शाळा

१९११ मध्यवर्ती ग्रंथालय (अमेरिकन बोर्डन ग्रंथपाल)

१९१७ स्त्रियांसाठी घरपोच ग्रंथसेवा

१९१९ हिंद विजय जिमखाना (बडोद्याचे ऑलिम्पिक)

१९२८ प्रत्येक खेडेगावामध्ये एक ग्रंथालय

१९३७ भारतीय ऑलिम्पिक संघाशी हिंद विजय जिमखाना संलग्न

**भाग २ – बिगर शैक्षणिक (सामाजिक)**

१. धार्मिक स्वातंत्र्य निर्बंध (१९०१) – धर्म ही प्रत्येक माणसाच्या पसंतीची बाब आहे. त्या बाबतीत कोणावरही इतरांचा दबाव नसावा, कारण तो

शारीरिक जुलमाचा किंवा आर्थिक नुकसान करणारा असू शकतो. म्हणून जुलमाने होणाऱ्या धर्मांतरावर बंदी घालण्यासाठी कायद्याची आवश्यकता.

२. हिंदू विधवा मान्यता कायदा (१९०१) – विधवा स्त्रियांना त्यांच्या इच्छेप्रमाणे सन्मानाने जगता येईल, असे कायदेशीर संरक्षण महाराजांनी दिले.

२. बालविवाह प्रतिबंध कायदा (१९०४)

३. हिंदू विवाह नोंदणी (मॅरेज रजिस्ट्रेशन) कयदा (१९०५)

४. हिंदू पुरोहित परवाना कायदा (१९०५)

५. हिंदू दत्तक नोंदणी (१९१०) – दत्तक विधानाबद्दल व्यवहार्य अशा कायदेशीर सुधारणा महाराजांनी घडवून आणल्या. दत्तक गेलेल्या व्यक्तीला सख्ख्या भावांच्या मालमत्तेमध्ये वाटा देऊ नये, अशी तरतूद त्यांनी केली.

६. हिंदू वारसा नोंदणी कायदा (१९१०)

७. अविभक्त कुटुंब नोंदणी कायदा (१९१०)

८. हिंदू मिळकत नोंदणी कायदा (१९२०)

९. हिंदू विवाह विच्छेद नोंदणी (१९२३) – घटस्फोटाचा कायदा पारित करून सामाजिक क्षेत्रामध्ये सयाजीरावांनी क्रांतिकारक पाऊल टाकले.

१०. पारशी विवाह विच्छेद नोंदणी (१९३३)

११. जातिभेद निवारण विच्छेद नोंदणी (१९३३)

१२. संन्यास दीक्षा नियम नोंदणी कायदा (१९३३) – जैन धर्मामध्ये बालवयामध्ये मुलामुलींना दीक्षा देत. त्यावर महाराजांनी बडोद्यामध्ये बंदी आणली. जैन हुशार, ते मध्य प्रदेशमध्ये जात आणि दीक्षा देत!

। । ।

६



# धर्मकारण

सयाजीराव कोणत्याही क्षत्रिय राजाप्रमाणे हिंदू धर्माभिमानी होते. आधुनिक शिक्षणामुळे हिंदू धर्मामध्ये शिरलेले काही दोष त्यांनी कटाक्षाने दूर ठेवले आणि धर्मामध्ये आधुनिकता आणण्याचा प्रयत्न केला. सारे विश्व पाहिल्यावर हिंदू धर्माचे श्रेष्ठत्व त्यांना चांगले समजले होते, पण इतरांवर धर्म लादण्याच्या ते विरुद्ध होते. इतरांनीही आमच्यावर त्यांचा धर्म लादू नये, अशी त्यांची अपेक्षा होती आणि ते त्याबाबत जागरूक होते. आर्यसमाजी लोकांना आमंत्रण देऊन त्यांनी ख्रिस्ती धर्मप्रचारकांची तोंडे बंद केली होती. धर्म जतन करणारी हिंदूंची मंदिरे, संस्कृती जपणारी संस्कृत भाषा आणि ती देवभाषा जतन करणारे विद्वान ब्राह्मण या सर्वांचे संरक्षण करणे म्हणजेच राजधर्म, असे त्यांना शिकवण्यात आले होते.

**अ) मंदिरे** – हिंदू धर्मावर श्रद्धा असल्यामुळे त्यांना ज्ञान प्राप्त करून घेणे सोपे झाले. आधुनिक ज्ञानाने त्यांना दृष्टी मिळाली. जग पाहिल्यामुळे श्रद्धा आणि तंत्रज्ञान यांच्या जोरावर लोकांच्या राहणीमानात बदल कसा घडवून आणायचा, हे त्यांना कळले. हिंदू धर्माच्या एकात्मतेचे रहस्य त्यांच्या मंदिरात आहे, म्हणून मुसलमानांनी मंदिरे तोडली वा त्यांच्या मशिदी केल्या. श्रद्धेचे, निष्ठेचे आणि भक्तीचे सर्वांत सुंदर-सगुण रूप म्हणजे मूर्तिपूजा. वैदिक संस्कृती यज्ञप्रधान होती; पण जसजसा वैदिक संस्कृतीमध्ये हिंदूंच्या अनुभवांचा विकास होत गेला, तसतशी मंदिरे आणि मूर्तिपूजा यांचाही विकास झाला.

निरनिराळ्या लोकांना एकत्र आणण्यासाठी आणि परमेश्वरासमोर तुम्ही सर्व सारखे आहात, ही जाणीव निर्माण करण्यासाठी मंदिरांसारखे दुसरे माध्यम नाही, असे सयाजीरावांना आढळले. ते कोठे? तर युरोपमध्ये. जेव्हा त्यांनी विशाल ख्रिस्ती प्रार्थनामंदिरे (चर्च) पाहिली. तेव्हा त्यांना एकदम वाटले, अरे, ही तर आपल्या हिंदू-बौद्ध मंदिरांची नक्कल आहे! तेच गंभीर वातावरण, तेच मंत्रघोष करणारे ब्राह्मण, तेच स्वर्गीय संगीत आणि त्याच सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक आणि आर्थिक बाजू! लोकशिक्षणासाठी, लोककल्याणासाठी किंवा लोकजागृती-

साठी मंदिरांसारखे दुसरे साधन नाही. फक्त पुजारी निवडताना त्यांची परीक्षा घेऊन, मगच त्यांना कामावर ठेवावे, असे त्यांना वाटू लागले. पदरी असलेल्या शास्त्री पंडितांशी चर्चा करून, पुजाऱ्यांसाठी त्यांनी एक अभ्यासक्रम तयार केला आणि सर्व सरकारी मंदिरांमध्ये त्या अभ्यास-क्रमाप्रमाणे पुजाऱ्यांच्या परीक्षा घेतल्यानंतरच त्यांना नोकरीवर ठेवले.

जीर्णोद्धार केला की, मंदिरातील देवाबरोबरच त्याचे त्या त्या जातीचे भक्तदेखील खूश होतात, असा त्यांना अनुभव आला. साऱ्या कडवा पाटीदारांची (पटेल) उमियादेवी ही मूळ कुलदेवता. तिच्या उंझा येथील मंदिराचा सुंदर जीर्णोद्धार करताच राज्यातील पटेल मंडळी सयाजीरावांना देव मानू लागली. मंदिराचे महत्त्व पटवण्यासाठी त्यांनी मुद्दाम लोकहितवादींना त्या मंदिराचे उद्‌घाटन करण्यासाठी आमंत्रण दिले. हेतू हा की, सुधारकांनी सुद्धा धर्मश्रद्धा, मूर्तिपूजा वगैरे जुन्या गोष्टींची लोककल्याणाशी कशी सांगड घालावी, याचा वैज्ञानिक विचार करावा. खासगी मंदिरांना मात्र त्यांनी हात लावला नाही. पण तेथे स्वच्छता, पावित्र्य आणि मांगल्य याचे जतन होत आहे ना, याची आपल्या आरोग्य अधिकाऱ्यांमार्फत खबरदारी घेतली.

नानाशास्त्री चिपळूणकरांसारख्या एकदम कर्मठ ब्राह्मणांनी धर्मामध्ये ढवळाढवळ करणाऱ्या राजाविरुद्ध बराच विरोधी आवाज उठवला; पण महाराजांनी त्याची फारशी पर्वा केली नाही. मात्र अशा कर्मठ मंडळींच्या आरोपांमध्ये शास्त्रीयदृष्ट्या काही तथ्य आहे का, याची आपल्या आतील वर्तुळामध्ये चर्चा जरूर केली. परंपरेमध्ये शास्त्रीय (वैज्ञानिक) तथ्य कोणते व कसे आहे याचा शोध महाराजांनी सदैव घेतला आणि परंपरांमध्ये शास्त्रीय तथ्य आढळल्यास त्यांना राजाश्रयही दिला.

गायकवाडांच्या आधीच्या हिंदू राजांनी तंत्रशास्त्राच्या आधारे बडोद्याच्या अवतीभवती नाथपंथियांची मंदिरे बांधली होती. त्यामुळे बडोद्याला एक प्रकारचे राजकीय कवच (Religious immunity) मिळाले आहे, असा त्यांचा विश्वास होता, कारण ही मंदिरे म्हणजे तंत्रशास्त्राची केंद्रे होती. उदाहरणार्थ हरणी येथे मोतनाथ, वाडी येथे रामनाथ, अजबडी स्मशानामध्ये खेकरनाथ, अटलादरा स्मशानाजवळ जागनाथ, पारशी आग्यारीजवळ भीमनाथ, नवलाखीजवळ नीलनाथ, गोरवा स्मशानापाशी गोरक्षनाथ आणि वरतळ खेडेगावी कोटनाथ, अशी ती मंदिरे वा तंत्रज्ञानाची केंद्रे आहेत. गुजराथमध्ये महापूर, दुष्काळ, भूकंप वगैरे अस्मानी संकटे आली; पण प्रत्येक वेळा बडोदे शहर त्यातून सहीसलामत वाचले आहे. हा चमत्कार म्हणायचा का तंत्र वा विज्ञानाचा प्रभाव?

## आ) संस्कृत

सुरुवातीच्या उमेदवारीच्या काळामध्ये राजधर्माचे पाठ घेत असताना सयाजीरावांच्या मनावर निरनिराळया गुरूंनी वेगवेगळ्या पद्धतीने त्यांच्या कोवळ्या मनावर धार्मिक संस्कार केले आणि ते तसेच कायम राहिले. ब्रह्मानंदांनी 'स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा' ही संकल्पना त्यांच्या मनावर ठसवली. दयानंदांनी पारतंत्र्यातील राजधर्म म्हणजे काय आणि तो कसा पाळावा, हे सांगितले. नित्यानंदांनी हिंदू समाजावर जी सारखी आक्रमणे होतात ती धर्मलोप झाल्यामुळे, म्हणून कलियुगामध्ये धर्मपालन कसे करावे, याचे रहस्य सांगितले. रियासतकार सरदेसाई यांनी रामदासांची 'शिवाजी थोर का आहे?' हे विषद करून सांगणारी ओवी त्यांच्या मनामध्ये भिनवली –

**" उदंड पंडित, पुराणिक, कवीश्वर, याज्ञिक, वैदिक ।**
**धुर्त तार्किक , सभानायक तुमचे ठायी ॥**
**या भूमंडळाचे ठायी धर्मरक्षी ऐसा नाही।**
**महाराष्ट्र धर्म राहिला काही तुम्हा कारणे॥"**

सरदेसाई म्हणत, "मुजोर मुसलमानांना शिवाजीने धडा शिकवला, त्यांच्या साम्राज्यवादास सुरुंग लावला, त्यांच्या वारसांनी अटकेपार भगवा झेंडा फडकवला. तुर्कांपेक्षा इंग्रज जास्त वस्ताद आहे. इंग्रजांशी व्यवहार म्हणजे बुद्धिबळाचा डाव खेळण्यासारखे आहे. शेरास सव्वाशेर व्हायला पाहिजे. त्यासाठी नव्या दृष्टिकोनातून पाहिले पाहिजे.

## क) संस्कृत भाषा-संबंधित

**१) संस्कृत भाषा** – इलियट सोडले तर सयाजी महाराजांचे सर्वच शिक्षक संस्कृत भाषेवर प्रभुत्व असलेले होते. त्या काळी संस्कृत ही विद्वानांची भाषा समजली जाई. त्यामुळे तिचे ज्ञान आवश्यक होते. हिंदू संस्कृती आणि धर्म जाणून घ्यायचा असेल, तर संस्कृत जाणणे आवश्यक होते. जगामधील सर्वांत प्राचीन वेदग्रंथ, हे संस्कृत भाषेमध्ये आहेत.

**२) परंपरा** – पेशव्यांकडे संस्कृत जाणणारे विद्वान पंडित खूप असत. ते त्यांना श्रावण महिन्यामध्ये त्यांच्या योग्यतेप्रमाणे चांगली बिदागी देऊन मानसन्मान करत. ते पाहून गायकवाडांनी ती प्रथा सुरू केली. सयाजी महाराजांना आनंदरावांची (१८००-१८१९) फार चीड येई. त्या बहाद्दराने आपल्या खासगी संग्रहातील ५०७

बहुमोल प्राचीन ग्रंथ – विशेषतः ज्योतिषशास्त्रावरील – साहेबाला खूश करण्यासाठी कंपनी सरकारला १८०९ मध्ये देऊन टाकले! आज ते लंडनच्या 'इंडिया ऑफिस लायब्ररी'मध्ये जतन करून ठेवलेले दिसतात. दुसऱ्या सयाजीरावांनी (१८१९-१८४७) श्रावण मास दक्षिण परीक्षा भरवून विद्वानांचा योग्य तो मानसन्मान करण्याचा पायंडा पाडला. तो आजतागायत सुरू आहे. खंडेराव (१८५६-१८७०) महाराजांजवळ महाशंकरशास्त्री नावाचे अखिल भारतीय ख्यातीचे एक पंडित होते. त्यांना शास्त्रार्थामध्ये कोणीही हरवू शकत नसे. त्यांना खंडेरावांनी खास पालखीची सोय केली होती.

३) **सयाजीरावांचे संस्कृत प्रेम** – नेव्हिन या त्यांच्या रीडरला (वाचून दाखवणारा) लिहिलेल्या एका पत्राचा शेवट त्यांनी पुढीलप्रमाणे केला आहे. "हे पत्र मी पुरे करतो. माझे संस्कृत शिक्षक येण्याची वेळ झाली आहे. माझ्या घराण्याला आणि मी ज्या जातीत जन्मलो त्या जातीला एक शाप आहे, तो म्हणजे संस्कृत भाषेचे अज्ञान. मी केलेल्या संस्कृतच्या अभ्यासामुळे धार्मिक बाबतीत डोकावणे मला शक्य झाले." त्यांनी इलियट निवृत्त झाल्यावर त्यांना इंग्लंडमध्ये एक पत्र लिहले. त्या पत्रामध्ये ते लिहितात की, "धार्मिक चालीरीतींमध्ये बरेच घोटाळे आणि अपसमज निर्माण झाले आहेत, ते दूर करावेत, धर्मामध्ये सुधारणा व्हाव्यात, असे मला वाटू लागले आहे. हिंदू धार्मिक विधी दोन प्रकारचे आहेत. उच्च प्रतीचे वेदोक्त आणि कमी समजले जाणारे किंवा भ्रष्ट पुराणोक्त. आमच्याकडे पुराणोक्त विधी केले जातात; पण जुने कागदपत्र दाखवतात की, पूर्वी ते वेदोक्त पद्धतीने केले जात. ते का बदलले गेले, याचा मी शोध घेत आहे. माझ्या पूर्वजांचे संस्कृतचे अज्ञान त्याला कारणीभूत झाले असावे."

सयाजीरावांनी इलियटला लिहिलेल्या पत्रामध्ये पुढे म्हटले आहे, "वेदांचा अधिकार जास्त का बायबलचा का कुराणाचा का अवेस्ताचा या प्रश्नाचे उत्तर देणे अवघड आहे; पण भारतामध्ये वेदांचा अधिकार सर्वांत जास्त मानला जातो यात संशय नाही. हिंदू धर्मगुरू या रूढी आणि चालीरीती यामध्ये एवढे अडकून पडले आहेत की, मूलभूत धार्मिक तत्त्वांकडे दुर्दैवाने त्यांचे दुर्लक्ष होत आहे." ते पुढे ता० क० मध्ये महत्त्वाचे असे म्हणून लिहतात, "ग्रीस आणि रोम यांच्या इतिहासाचा माझा अभ्यास सुरू आहे. तो इतिहास मी मराठी आणि गुजराथी भाषेमध्ये भाषांतर करवून घेत आहे. त्यांच्या 'उदय आणि अस्ता'चा इतिहास येथील प्रत्येक सुशिक्षिताला माहीत असायलाच पाहिजे." सयाजीरावांच्या हे लक्षात आले की, रोमनांनी त्यांचा धर्म सोडला, म्हणून रोमन साम्राज्य नष्ट झाले. मराठ्यांनी त्यांचा धर्म सोडला आणि मराठा साम्राज्य नष्ट झाले. हिंदूंनी त्यांचा धर्म

सोडला आणि ते गुलाम झाले. आपल्या प्रजेला आपण पुन्हा धर्म दिला पाहिजे, तरच ते गुलामी मानसिकतेतून बाहेर येतील व स्वतंत्रपणे विचार करू शकतील.

**४. शास्त्री आणि पंडितांना आश्रय** – सयाजीरावांनी 'बरोडा आर्ट्स कॉलेज' १८८१ मध्ये सुरू केले आणि त्यामध्ये खास संस्कृत विभाग सुरू केला. तेथे प्रो० बी० आर० आर्ते, डॉ० बी० सी० लेले, गो० ह० भट्ट, प्रो० श्री० स० भावे वगैरे इंग्रजी आणि संस्कृत या दोन्ही भाषांवर प्रभुत्व असणारे शिक्षक लाभले होते. महाराजांनी ३ सप्टेंबर १९१५ रोजी धर्मविधी आणि पुराणकथा शिकवण्यासाठी संस्कृत पाठशाळा सुरू केली. पुढे तेथे व्याकरण, साहित्य, ज्योतिष आणि धर्मशास्त्र पारंपरिक पद्धतीने शिकवण्यात येऊ लागले. या संस्थेद्वारा त्यांना 'ऋषी संस्कृती' पुनश्च उभी करावयाची होती. ऋग्वेदातील ऋषी हे केवळ शांत, दांत, तपस्वी आणि आश्रमात राहणारे होते असे नव्हे, तर हे ऋषी युयुत्सू आणि राजकारणाच्या उलाढाली करणारे होते. वसिष्ठ हे उत्तम घोडेस्वार होते. अंगिरसांनी महानीच पर्णींची धान्यकोठारे लुटली होती. विश्वामित्र आणि त्यांच्या कुलातील मंडळी – कुशिक – मोठे लढवय्ये होते. कुत्स हाही वीर होता. त्याने इलिबिशाची तटबंदीची नगरे तोडली-फोडली होती. महाराजांच्या डोळ्यांसमोर असे ऋषी होते.

**५. राजाश्रय मिळालेली काही विद्वान रत्ने–**

**अ) छोटालाल नर्भेराम भट्ट (१८५०-१९३७)** – सयाजीरावांनी त्यांना त्यांच्या ज्ञानाबद्दल 'कलादीप' ही पदवी दिली होती. ५५ संस्कृत ग्रंथांचे त्यांनी गुजराथी भाषेमध्ये भाषांतर केले. त्यापैकी २८ प्रकाशित झाले. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'आत्मवृत्तांतम्', 'ब्रह्मसूत्रनाम् संक्षिप्त वृत्ति', 'गुसांगमाहात्म्यम्' 'वैराग्य-रत्नाकर'.

**आ) म० म० बद्रीनाथ त्र्यंबकेश्वर शास्त्री (१८५२-१९२७)** – ते राजपंडित होते. सयाजीरावांनी त्यांना १९०५ मध्ये तर्कवाचस्पती ही पदवी दिली. १९२२ मध्ये ते 'महामहोपाध्याय' झाले. काशीच्या भारत महामंडल सभेने त्यांना 'विद्यासागर' ही पदवी दिली. द्वारकेच्या शंकराचार्यांनी त्यांना 'चाटुस्तंत्रस्वतंत्र' ही पदवी बहाल केली होती. त्यांचा प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे वायुपुराणाचे गुजराथी भाषांतर.

**इ) अमृतराम नारायण शास्त्री (१८६१-१९३१)** – सयाजीरावांनी त्यांची विद्वत्ता पाहून त्यांना काशी येथे पाठवले. ज्योतिषशास्त्रावर त्यांचे खूप प्रभुत्व होते. लोकमान्य टिळक त्यांना फार मानत असत. मुंबईमध्ये ज्योतिषाचार्यांचे महाअधिवेशन भरले होते तेव्हा त्यांनी त्यांचा प्रबंध 'पंचांग संशोधन निबंध' वाचला आणि तो ऐकून अध्यक्ष असलेल्या द्वारकेच्या शंकराचार्यांनी 'ज्योतिषशास्त्र मार्तंड' ही पदवी बहाल केली. सयाजीरावांनी त्यांना प्रथम धर्माध्यक्ष आणि नंतर

राजपंडित केले. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'उपनयन विधीसार', 'श्राद्धसार', 'राजधर्म'.

**ई) म० म० रामकृष्ण हर्षजी शास्त्री (१८६०-१९३१)** – त्यांचे कुटुंबीय दुष्काळामुळे सौराष्ट्रातून बडोदे येथे आले. बडोद्याच्या सेवेमध्ये ते १८८७ ते १८९८ होते. १९२९ मध्ये त्यांना 'महामहोपाध्याय' ही पदवी मिळाली. नंतर ते अहमदाबाद येथे गेले. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'सयाजी-विजय काव्यम्', 'आजवा तडाग वर्णनम्', 'संधि दर्पणम्' आणि इतर सहा काव्ये.

**उ) राजाराम काशीनाथ टोपरे** – न्याय पाठशाळेचे ते प्राचार्य होते. मीमांसा, व्याकरण, संगीत आणि वेद यावर त्यांचे प्रभुत्व होते. शिक्षणाधिकाऱ्यांनी ब्राह्मणेतरांना 'लघुकौमुदी' शिकवण्याची त्यांना आज्ञा केली, तेव्हा त्यांनी राजीनामा दिला. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'विचारत्रयी', 'एकादशी परामर्ष', 'भैरवस्तामिनिर्णय' आणि 'संन्यासीपादुका मीमांसा'.

**ऊ) शास्त्री रामनाथ भोलानाथ (१८६९-१९३८)** – हे टोपरे शास्त्री यांचे शिष्य. त्यांनी बरेच भागवत सप्ताह केले. सारे भागवत त्यांना मुखोद्गत होते. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे, 'चंद्रिका', 'सिद्धान्तरत्नमंजुषा', 'न्यायभूषण', 'ब्रह्मसूत्र वृत्ति' आणि 'यदुवंशमहाकाव्यम्'.

**ए) मूळशंकर माणिकलाल याज्ञिक (१८८६-१९६५)** – हे नागर पंडित १९१५ ते १९३२ या काळामध्ये संस्कृत पाठशाळेचे प्राचार्य होते. त्यांची तीन नाटके प्रसिद्ध आहेत. 'छत्रपति साम्राज्यम्', 'संयोगिता स्वयंवरम्' आणि 'प्रताप विजयम्'. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'सत्यधर्म प्रकाश', 'विजयलहरी', 'श्री विष्णुपुराणम्', 'हर्ष दिग्विजयम', 'मेवाड प्रतिष्ठा', 'विष्णु पुराणनी वातो' (गु०), 'जिनिलॉजिकल टेबल्स्' ऑफ सोलर अँड ल्युनर डायनॅस्टीज', 'तौलनात्मक धर्मविचार' आणि 'आपनु प्राचीन राजतंत्र'.

**ऐ) लक्ष्मीनाथ बद्रीनाथ शास्त्री (१८९६-१९६४)** – म० म० बी० टी० शास्त्री यांचे सुपुत्र. १९२० मध्ये संस्कृत पाठशाळेमध्ये उपप्राचार्य आणि पुढे प्राचार्य झाले. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'भारतीय सौंदर्यशास्त्र', 'प्राचीन साहित्यमां काळसंबंधी विवेचनात्मक अने वर्णनात्मक ऊल्लेखो'.

**ओ) बद्रीनाथ काशीनाथ शास्त्री (१८९८-१९७६)** – संस्कृत महाविद्यालयामध्ये शुद्ध द्वैताचे १० वर्षे प्राध्यापक होते. त्यांना तीन पदव्या मिळाल्या. पुष्टिमार्गाकडून 'पंडित पंचानन', शंकराचार्यांकडून 'पंडित मार्तंड' आणि श्रावण मास दक्षिण परीक्षेकडून 'शिरोमणी'. त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे, 'रत्नावली', 'राधाविनोद', 'मालिनी' आणि 'मिथ्यावासुदेव' या चार लहान नाटिका;

'अवंतीनाथ' या गुजराथी कादंबरीचे संस्कृत भाषांतर, 'वल्लभ दिग्विजयम्', 'ब्रह्मसूत्रे' (त्रिसूत्री) यांवर भाष्य आणि 'संस्कृत गरबा'.

**औ) विद्याभास्कर मणीशंकर वसंतराम उपाध्याय (१९०५-१९८०)** – विचारवंत आणि अलौकिक बुद्धिमत्ता लाभलेले, हरद्वार येथे ऋषीकुलांत व्याकरण, धर्मशास्त्र, साहित्य, सांख्य, योग, वेदान्त वगैरे शिकले. बडोदा येथे शिक्षकाची नोकरी केली. त्यांनी अनेक प्रसिद्ध ग्रंथ लिहिले आणि वरील शास्त्रांवर बारा काव्यरचना केल्या.

**क) जगन्नाथ श्रीधर पदेशास्त्री (१९१२-८२)** – हे मुंबई विद्यापीठाचे एम० ए० होते. ते अलौकिक बुद्धिमत्ता असलेले 'जिनिअस' म्हणून ओळखले जात. त्यांच्याकडे डॉ० राधाकृष्णन यांच्यासारखे विद्वान त्यांच्या समस्या सोडवून घेण्यासाठी येत असत! त्यांचे काही प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे, 'रुक्मिणी स्वयंवर', 'तांबुल मंजरी', 'विनालक्षणम्' आणि 'भरत नाट्यशास्त्र' (भाग ६वा)

**६) संस्कृत प्रकाशने** – एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकामध्ये संस्कृत साहित्यात बडोद्याची देणगी फार मोठी आहे. संस्कृत ही मृत भाषा आहे, असा ज्या वेळी जास्तीत जास्त प्रचार सुरू होता आणि त्याला इंग्रजांचा राजाश्रय लाभला होता, त्या काळामध्ये संस्कृत ही जिवंत भाषा आहे, असे पटवून देण्यासाठी संस्कृतमध्ये गरबा नृत्य केले जाई.

**७) जुन्या पोथ्यांचे जतन** – इंग्रज आणि जर्मन संशोधक जुन्या संस्कृत पोथ्या विकणारा जी किंमत मागेल, त्या किमतीला विकत घेऊन त्यांच्या देशामध्ये का घेऊन जातात, याचे महाराजांना मोठे कोडे होते. त्यामध्ये धर्मशास्त्राप्रमाणे विज्ञानही दडलेले असते, हे जेव्हा त्यांना समजले, तेव्हा ते या मौल्यवान पोथ्यांच्या मागे लागले. म्हैसूर आणि त्रावणकोरच्या राजांकडे हजारो संस्कृत हस्तलिखितांचा ठेवा पाहिला आणि हे पुण्यकर्म आपण केलेच पाहिजे, असे त्यांच्या मनाने घेतले. त्यांना विठ्ठल मंदिरामध्ये असा पोथ्यांचा ठेवा सापडला. त्यानंतर त्यांनी पंडित अनंत कृष्ण शास्त्री यांच्यावर साऱ्या देशभर प्रवास करून मिळतील तेथून आणि ते मागतील ती किंमत देऊन हस्तलिखिते आणि पोथ्या हस्तगत करण्याची विनंती केली. त्या बहाद्दराने वीस हजार पोथ्या आणि हस्तलिखिते आणून सादर केली. जसजसा हा पोथ्यांचा संग्रह वाढत चालला, तेव्हा त्यांनी १८२३ मध्ये 'कोठी' इमारती शेजारच्या अज्वलनशील (फायरप्रूफ) नोंदणी कार्यालयामध्ये हा संग्रह हालवला. या कामामध्ये त्यांना डॉ० बिनयतोष भट्टाचार्य (१९२४-१९५१) यांची फार मोठी मदत झाली.

८) **ओरिएंटल इन्स्टिट्यूट** – संस्कृत हस्तलिखिते आणि पोथ्या यांचा फार मोठा संग्रह बडोद्याच्या ओरिएंटल इन्स्टिट्यूटमध्ये आहे. जगातील श्रेष्ठ पौर्वात्य संस्थांमध्ये या संस्थेची गणना होते. इंग्रजीचे महत्त्व जसजसे वाढू लागले, तसतसे संस्कृत ग्रंथ आणि हस्तलिखिते यांचे महत्त्व कमी कमी होऊ लागले. शेकडो ब्राह्मण कुटुंबातील गरीब गृहिणींनी ही जुनी हस्तलिखिते अंघोळीसाठी पाणी गरम करण्यासाठी  जळण म्हणून वापरली. पंडित अनंत कृष्ण शास्त्री यांचे संस्कृत भाषेवर अनंत उपकार आहेत. एवढी २०,००० हस्तलिखिते, नाही तर जळून भस्मसात झाली असती. सर स्टॅनले राईस सयाजीरावांच्या ग्रंथप्रेमासंबंधी म्हणतात, ''कौटिल्याचा 'अर्थशास्त्र' हा ग्रंथ म्हैसूर शहराचा गौरव आहे. भासाचे 'साहित्य' हा त्रावणकोर संस्थानाचा गौरव आहे. तसेच सौतरक्षिताचा 'तत्त्वसंग्रह' आणि इतर अनेक बौद्ध धर्मावरील मौलिक ग्रंथ म्हणजे बडोद्याचा गौरव आहे.'' या संस्थेमध्ये प्राचीन वाङ्मयाशी संबंधित अशा अनेक दुर्मीळ वस्तू आहेत. त्यांचे जतन करण्यासाठी सयाजीरावांनी स्वतःची एक मोठी तिजोरी या संस्थेला भेट दिली. अजून तरी हा सारा खजिना वाडेकर आणि वाकणकर यांनी जपून ठेवला आहे. भविष्यकाळात त्याचे काय होईल, ते परमेश्वर जाणे. एकेक वस्तू विकली, तरी युरोप-अमेरिकेमध्ये ती पाच-दहा लाख रुपये हसत मिळवून देईल!

९) **संस्कृती** – महाराजांना अनेक विद्वान आणि पंडित भेटले. त्यांच्याशी महाराजांनी चर्चा केली; पण संस्कृती आणि स्वातंत्र्य यांचा अन्योन्य संबंध राजवाडे यांनी जो समजावून सांगितला, त्याला तोड नव्हती. सार्वभौम, समृद्ध, सुसंस्कृत स्वराज्य परत मिळवायचा मार्ग संस्कृतीच्या सोपानानेच गेल्यास प्राप्त होईल, याची त्यानंतर महाराजांची खात्री पटली. राजवाडे यांनी महाराजांना हिंदू संस्कृतीची चार वैशिष्ट्ये सांगितली:

(१) अखिल मानववंशाशी समबुद्धीने वागणे. (२) स्वतः उच्च स्थितीला पोहचून इतरांना उत्कृष्ट स्थितीस पोचण्याचा मार्ग दाखविणे. (३) शेजारी आलेल्या लोकांचा त्यांचा धर्म, पंथ, वर्ण, वंश अशा निमित्ताने द्रोह न करणे. (४) आश्रयाला आलेल्यांना शेजारधर्माप्रमाणे राहावयास सांगून हळूहळू आपली संस्कृती त्यांच्यामध्ये मुरवणे आणि त्यांना सुसंस्कृत करून, आपल्यामध्ये समाविष्ट करणे. सयाजीरावांच्या धार्मिक मनास अध्यात्माची जोड देण्याचे कार्य अरविंदांनी केले. अरविंदांना १९०८ मध्ये नर्मदेवरील गंगनाथी असलेल्या ब्रह्मानंदांचा आश्रम पाहून 'भवानी मंदिरा'च्या संस्थेची कल्पना सूचली. १९०३ मध्ये बारिंद्रकुमार घोष म्हणत – ''केवळ राजकीय प्रचाराने देशाचा काही लाभ होणार नाही. लोकांना आध्यात्मिक बळावरच संकटांना तोंड द्यायला शिकवले पाहिजे. ''अरविंद घोष हे

देशबांधवांना आर्य बंधू म्हणत. त्यांच्या एका बंगाली पत्राचे नाव होते 'आर्य' आणि इंग्रज पत्राचे 'धर्म'.

१०) संस्कृतीची विकृती

**१. धर्म एक चांगली सामाजिक व्यवस्था** – सयाजीरावांना इलियट नेहमी एक सिद्धान्त सांगत असत - ''कोणतीही व्यवस्था बिघडू शकते.'' त्यासाठी ते युरोपमधील ख्रिस्ती धर्माचे उदाहरण देत. युरोपमध्ये कॅथॉलिक पाद्री सामान्य लोकांकडून स्वर्गामध्ये प्रवेश मिळवण्याच्या आगाऊ आरक्षणासाठी मोठाल्या रकमा उकळत असत. त्यामुळे लोकांचा पाद्र्यांवरील विश्वास उडाला आणि धर्मसंस्थेचा ऱ्हास झाला. त्यातून प्रतिक्रिया म्हणून प्रोटेस्टंट पंथाचा उदय झाला. ख्रिस्ती धर्माप्रमाणे हिंदू धर्मामध्येदेखील वर्णव्यवस्था आणि जातिव्यवस्था या सामाजिक व आर्थिक हितासाठी निर्माण झाल्या. कालांतराने त्यातील लवचीकपणा गेला. मुसलमानांच्या आग्रही आणि आत्यंतिक आक्रमणामुळे त्यामध्ये कडकपणा आला. मोडेन पण वाकणार नाही, ही वृत्ती शुद्ध बीजाच्या स्वाभिमानी लोकांनी स्वीकारली. बाकीच्यांनी 'वाकेन पण मोडणार नाही' असे म्हणून लाचारी आणि लाळघोटेपणा पत्करून स्वदेश आणि स्वधर्म कसाबसा वाचवला. गेल्या हजार वर्षांमध्ये हिंदूंची एकहाती एकसत्ता नसल्यामुळे, त्यामधील दोष आणि विकृती दूर करणे राहून गेले. या विकृतींना दूर केले नाही, तर गेलेले स्वातंत्र्य परत मिळणार नाही. ''हे दोष, या विकृती तुम्हाला सुधारणांच्या रूपाने तुमच्या राज्यामध्ये दूर करावयाच्या आहेत आणि त्या तुम्ही दूर करणार आहात,'' असे आशीर्वाद अनेक मान्यवर आणि विचारवंत यांनी सयाजीरावांना आपल्या वैयक्तिक भेटीमध्ये दिले होते. कारण त्यांच्या दृष्टिपथात त्यांना सयाजीराव सोडून दुसरा कोणीही हिंदू समर्थ राजा दिसत नव्हता. त्यांच्या साऱ्या आशा-अपेक्षा बडोद्याच्या महाराजांमध्ये एकवटल्या होत्या.

**२. कारणे** – विकृतीकरण प्रथम मेंदूमध्ये होते. विचाराचे विकारांमध्ये रूपांतर व्हायला वेळ लागत नाही. माणसाच्या मेंदूचे संतुलन बिघडते, ते चार नशांमुळे. त्यामध्ये प्रमुख तीन इंग्रजी डब्ल्यूज - वाईन (सुरा), वुमन (सुंदरी) आणि वेल्थ (संपत्ती). त्या तिघांना मागे टाकेल अशी एक जबरदस्त नशा काम करते, ती म्हणजे सत्तेची (पॉवर) नशा. त्यामध्ये दंभ आणि नाकर्तेपणा या दोन दुर्गुणांची भर पडते आणि वर्तुळ पूर्ण होते.

**३. विकृतीचे प्रकार** – रियासतकार सरदेसाई यांच्या शिकवणुकीमुळे सयाजीरावांना हिंदुस्थानच्या सांस्कृतिक आणि राजकीय इतिहासामधील हिंदूंच्या विकृती तोंडपाठ झाल्या होत्या. आपल्या भाषणांमध्ये ते नेहमी त्यांचा उल्लेख करत असत. त्यातील काही निवडक उदाहरणे –

**अ. फाटाफूट (जातीयवाद)** – चाफेकर बंधू रँडच्या वधासाठी प्रसिद्ध आहेत. त्यातील दामोदरपंत पन्हाळा येथे सयाजीरावांना भेटले आणि बडोद्याच्या घोडदळामध्ये नोकरी करण्याची आपली इच्छा आहे, असे त्यांना सांगितले. ''पुण्याच्या ब्राह्मणांना आम्ही ठेवीत नाही,'' असे महाराजांनी उत्तर दिले. ''पण त्यांनी असे काय पाप केले आहे?'' चाफेकरांनी महाराजांना विचारले.

महाराज चुकून बोलून गेले, ''त्यांनी पेशवाई बुडविली.''

बाप रे! तेवढी काडी चाफेकरांना पुरेशी होती. चाफेकर एकदम भडकले. ''या दुर्दैवास काय म्हणावे? इंग्रजांनी आपल्यासारख्यांचा पक्का समज करून दिला आहे की, मराठ्यांना बुडवायला हे ब्राह्मण जबाबदार आहेत. दुसऱ्या बाजीरावास कोणीच पाठीशी घालीत नाहीत. पुढेही घालणार नाहीत. त्याने जे केले, ते देशास घातक ठरले. याबद्दल कोणाचाही मतभेद नाही.''

''आम्ही तेच म्हणतो.''

''नाही, आपला रोख फक्त पेशव्यांवर आहे आणि ती मोठी चूक आहे. मला इतकेच विचारायचे आहे की, ज्या वेळेस बाजीरावाने राज्य गमावले, त्या वेळेस मराठे सरदार – शिंदे, होळकर, गायकवाड, साताऱ्याचे आणि कोल्हापूरचे भोसले – हे सर्व मेले होते काय? अथवा जिवंत असून हातांत बांगड्या भरून लुगडे नेसून, मराठमोळ्यांत लपून बसले होते काय? हिंदुस्थानचा बहुतेक सर्व भाग मराठा संस्थानिकांनीच व्यापलेला आहे. असे असून त्या वेळेस आपल्या गर्दनी वाकवून, साहेब लोकाच्या हातांत हात घालून, 'आम्ही तुमचे दोस्त', असे म्हणण्यास त्यांना शरम कशी वाटली नाही? बाजीराव बाहेरख्याली होता, हे खरे असेल तर सर्वांनी गिल्ला करून त्याला कैद करून राज्यावर योग्य मनुष्य का बसवला नाही? आज जी संस्थाने हिंदुस्थानात हयात आहेत, तितकी धन्यास बेईमानी होऊन इंग्रजांस फितूर झाली म्हणून आज दृष्टीस पडतात. उद्या १८५७ सारखा उठाव पुन्हा झाला, तर आपल्याला हक्काचे स्वसंरक्षणासाठी स्थान असावे, म्हणून या संस्थानांना गोऱ्या साहेबाने जिवंत ठेवले आहे. त्यात त्यांचा स्वार्थ दडलेला आहे, हे विसरू नका.'' 'महाराणी व्हिक्टोरिया'चा मोठा पुतळा १८७२ मध्ये उभारण्याचे आपले पूर्वज खंडेराव यांचे काय अडले होते. या चाफेकरांच्या कडक सवालाने महाराज अस्वस्थ झाले, अंतर्मुख झाले. त्यांनी चाफेकरांना पाहिजे ती मदत केली आणि त्यांचा निरोप घेतला (चाफेकरांचे अप्रकाशित आत्मचरित्र (मराठी) पृ० ५१-५३).

यानंतर मात्र सयाजीराव एकदम बदलले. हा बदल घडवून आणण्यासाठी त्यांना मदत केली ती विठ्ठल रामजी शिंदे यांनी. त्याचा छान पुरावा आपल्याला १२ मार्च १९१८ च्या नाशिकच्या उदाजीराव मराठा वसतिगृहाच्या उद्‌घाटनाच्या

भाषणामध्ये दिसून येतो. ते म्हणाले, ''सुधारणा करणे सर्वतोपरी आपल्या हाती नसले तरी निदान काही अंशी तरी आपल्या हाती खास आहे. सुधारणेच्या बाबतीत माझे जे विचार आहेत, त्याचे दिग्दर्शन थोडेसे श्री० सावंत यांनी आताच केले आहे. त्यांनी सांगितल्याप्रमाणे एकी, मतस्वातंत्र्य, ज्ञानलालसा हे गुण आपण मिळवा... तुमची सद्यस्थिती सुधारण्याचा दुसरा मार्ग म्हणजे पूर्वेतिहास वाचून गतवैभव व सद्यस्थिती यांची तुलना करणे, हा होय. आपल्या समाजातील ज्या थोर पुरुषांची कीर्ती आज आपल्या कानांवर येत आहे, त्या पुरुषांचे पूर्वज किती थोर होते, याचा तुम्ही विचार करा आणि त्यांची स्थिती कशी होती व आज आपली स्थिती काय आहे, तेही लक्षात घ्या. हे सांगण्यात माझा हेतू तुम्ही चालू राज्यपद्धतीविषयी काही चुकीची कल्पना करून घ्यावी असा नाही. चालू परिस्थितीचा तुम्ही नीट विचार करावा व तिच्यात तुम्ही सुधारणा करावी, एवढेच मला हवे आहे.''

''मुलांना सुशिक्षित करून सद्वर्तनी बनविले पाहिजे. शिक्षणाचे महत्त्व तुमच्या मनावर चांगले ठसविण्यात आले आहे. ३०-३५ वर्षे झाली असतील, मी माझ्या राज्यांत शिक्षण प्रसाराचा अल्पस्वल्प प्रयत्न सुरू केला आहे. यात आत्मस्तुतीचा मुळीच अंश नसून मला इतकेच दर्शवायचे आहे की, असे प्रयत्न करण्याची बुद्धी होणे, हे आपल्या उज्वल भविष्यकाळाचे एक सुचिन्हच आहे. ही संस्था फक्त मराठा ज्ञातीकरताच नसून, तिचे सदस्य इतर ज्ञातींनाही साहाय्य करण्यास तयार आहेत, असे जे तुम्ही म्हणालात, ते तुम्हाला अत्यंत भूषणावह आहे. हा तुमचा विचार फार उच्च कोटीचा आहे, सर्वांशी स्तुत्य आहे, सर्व राष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीने तो बहुमोल आहे. कारण एक आपल्या ज्ञातीची प्रगती झाली म्हणजे सर्व राष्ट्राची प्रगती झालीच, असे होत नाही. म्हणून आपण आपल्या ज्ञातीबाहेर नजर पोहचवून इतर लोकांनाही शक्य ती मदत केलीच पाहिजे. अशाने तुम्ही त्या लोकांना तुमचे ऋणाईत करून सोडालच, पण विशेष असे की, त्या योगे तुम्हा दोघांची परस्परांविषयीच्या आदराची वृद्धी होत जाईल'' (दत्तो वा० पोतदारांनी सांगितलेली आठवण).

**आ)अहिंसेची विकृती** – बुद्धाचा जन्म उद्यानात झाला. त्याला मरण जंगलात आले. दुःखापासून, संकटापासून मुक्ती म्हणजे बुद्ध. बुद्ध म्हणजे आनंद. बुद्ध म्हणजे संतोष. कृष्णासारखा तो योगी होता. दोघे क्षत्रिय, पण किती वेगळे. बुद्धाने कधी काम करून पैसे मिळवले नाहीत. त्याने भिक्षाधर्म लोकप्रिय केला आणि भारतीयांना आळशी केले. सयाजीरावांना त्याचा फार राग येई. कृष्णाने कर्मयोग शिकवला. बुद्धाने फुकटेपणा, बांडगुळपणा (पॅरासायटिझम) शिकवला. या फुकट्या यतींना पोसण्यामध्ये अशोकाने आपला खजिना रिता केला. फुकट्या लोकांना अर्थशास्त्र

समजत नाही आणि संरक्षणशास्त्राची ते ऐसी तैसी करतात. बुद्धोत्तर भारतामध्ये बौद्धांनी परकीय चिनी लोकांची मदत वैदिकांविरुद्ध घेतली होती. अहिंसेच्या अतिरेकामुळे मानसिक व शारिरीक दुर्बलता आली आणि परकीयांची मदत घेणे आवश्यक ठरू लागले. महंमद कासीमच्या सैन्याला सिंधू नदी पार करता येत नव्हती. मोक्या बसैय्याने तो मार्ग दाखवला आणि कासीमला घरात घेतले. विकृत अहिंसेमुळे भारतीय इतिहासात कोणती उलथापालथ झाली आणि शंकराचार्यांनी भविष्यातील संकटे कशी टाळली, यावर भारतीय दृष्टिकोनातून चिकित्सक नजरेने बघणाऱ्या इतिहासकाराकडून महाराजांना एक ग्रंथ लिहून घेऊन सयाजी साहित्यमालेतर्फे प्रसिद्ध करावयाचा होता; पण ते कार्य गांधीयुगामुळे अपूर्ण राहून गेले (वि० पां० नेने संपादित सयाजीराव गायकवाड यांची भाषणे, पृ० १३४). अजूनही ते काम करण्यासारखे आहे.

**इ) स्वामिनिष्ठेची विकृती** – स्वधर्मी, स्वदेशी आणि स्वसंस्कृतिरक्षक असलेल्या राजाविषयी स्वामिनिष्ठा समजण्यासारखी आहे; पण रजपुतांच्या अकबराविषयी असलेल्या स्वामिनिष्ठेला काय म्हणणार? मराठ्यांच्या बहामनी राजांविषयी असलेल्या स्वामिनिष्ठेला शिवाजी महाराजांनी प्रथम सुरुंग लावला. १८५७ मध्ये शीख, गुरखे आणि संस्थानिक यांनी स्वकीयांशी गद्दारी केली नसती, तर शिवाजी महाराजांचे हिंदू पतपातशाही निर्माण करण्याचे स्वप्न केव्हाच साकार झाले असते. १९१५ मध्ये देखील त्याच इतिहासाची पुनरावृत्ती व्हावी? दैव देते आणि कर्म नेते, दुसरे काय?

**ई) शरणागतास अभय देण्याची विकृती** – या अपसमजापायी रणथंबोरच्या राणाने शत्रू महंमद याला आश्रय दिला आणि संकट ओढवून घेतले. कापिलच्या राजाने बहाउद्दिनला आसरा दिला आणि महंमद सुलतानाची स्वारी ओढवून घेतली. १६७९ मध्ये औरंगजेब चितोडचा राणा राजसिंह याच्या तावडीत सापडला असता त्याने गोहत्या न करण्याचे वचन घेऊन, उदार मनाने औरंगजेबाला सोडून दिले. १८५७ मध्ये तेच घडले.

**उ) दंगे** – जातीय दंगा हा हिंदूंच्या भोळसटपणातून जन्म घेतो, याची सयाजीरावांना खात्री पटली होती. मुसलमान दंगे करतात, हिंदूंची वित्तहानी आणि प्राणहानी होते व भोळसट हिंदू झोपेतून जागे होऊन परतफेड करण्याचा विचार करतात, तोवर इंग्रज सरकार मुसलमानांना पाठीशी घालते, हे लोकमान्य टिळकांचे निरीक्षण त्यांना संपूर्णपणे पटले होते. त्यासाठी हिंदूंना सण आणि उत्सव यांच्यामार्फत झोपू न देणे आणि एकत्र आणणे हा तोडगादेखील त्यांना आवडला होता. पुण्यातील जागरुक पुढाऱ्यांचे म्हणून त्यांना कौतुक वाटे. १८९४ मध्ये

आळंदीच्या पालखीच्या वेळी मुसलमानांनी दंगे केले. म्हणून पुण्यातील पुढारी मंडळींनी असे ठरवले की, यापुढे हिंदूंनी मुसलमानांच्या उत्सवामध्ये सामील होऊ नये. ज्ञानदेवाची पालखी जर दर्गा, मशिदीवरून जाऊ शकत नसेल, तर ताबुतापुढे भोळसट हिंदूंनी का नाचावे? त्यांचे ३३ कोटी देव त्यांना कमी पडतात का? पुण्यामध्ये शेकडा ९० डोले हिंदूंचे असत. ते १८९४ मध्ये २५ वर घसरले. हिंदू वाजंत्र्यांनी ताबुताच्या मिरवणुकीत वाद्ये वाजवण्यास नकार दिला. टिळकांनी या भोळसट हिंदूंना जागरुक करून, एकत्र आणून पुण्यामध्ये गणेशोत्सव दणक्यात सुरू केला. पुण्याचे उदाहरण साऱ्या महाराष्ट्रभर गिरवले गेले. टिळकांनी या स्थित्यंतराचे 'केसरी'तून जोरदार स्वागत केले आणि लिहिले, ''धर्मबुद्धी ज्यांच्या मनाला शिवतदेखील नाही, जडाच्या पलीकडे ज्यांची बुद्धी जाऊच शकत नाही, अशा अभागी व्यक्तींची कीव करण्यापलीकडे आम्हास त्यांच्या संबंधाने काही म्हणावयाचे नाही... असले राष्ट्रीय उत्सव राखणे व नसल्यास नवे उत्सव प्रचारात आणणे, ह्या राष्ट्रीयत्व कायम ठेवण्याचा एक उत्तम मार्ग आहे व आमच्या सुशिक्षित मंडळींनी त्याची अनास्था करू नये.''

बडोद्यामध्ये जातीय भुताची बाधा होऊ नये, म्हणून महाराज फार सावध होते. वंगभंगाची चळवळ सुरू झाली, तेव्हा लॉर्ड कर्झन आणि बंगालचा गव्हर्नर फुल्लर यांनी बंगाली मुसलमानांना फूस देऊन ''फाळणी तुमच्या फायद्याची आहे. फाळणीमुळे पूर्व बंगालच्या मुसलमानांच्या हातात सत्ता मिळणार आहे,'' असे तिखट-मीठ लावून सांगितले. बिचारे भाबडे मुसलमान! त्यांना ते खरेच वाटले. त्यामुळे त्यांचा हिंदूंवर राग. बडोद्यातील मोगलवाडा, पाणी दरवाजा, महंमद तलाव आणि नवापुरा येथील भागात १९०५ मध्ये हिंदू स्त्रियांना जाणे वा फिरणे अशक्य होऊन बसले. लहान मुलांना एकटे दुकटे गाठून मारपीट होऊ लागली. एकदा राजाराम शास्त्री मांडवीतून पायी जात असताना त्यांच्यावर भिरभिरत एक दगड आला आणि त्यांच्या तुळतुळीत डोक्याला मोठी जखम झाली. महाराजांचे भाऊ संपतराव गायकवाड यांच्या कानावर रोज या बातम्या येऊ लागल्या. तसतसा त्यांच्या रागाचा पारा चढू लागला. माणिकराव त्यांना चिडवू लागले, ''मग ब्रिटिशांच्या अमलाखाली असलेला भारत आणि गायकवाडांचे राज्य यामध्ये फरक काय राहिला?''

सयाजीराव महाराज सर्वधर्मप्रेमी खरे. मुसलमानांच्या दर्ग्यांना, उरुसाला मदत, जुम्मा मशीद सरकारी खर्चाने बांधून देण्याची तयारी, ताबुतांच्या स्वारीचे उद्घाटन महाराजांच्या हातून जरूर होत असे; परंतु कुणी जातीय तेढ पसरवू लागल्यास त्याची गय केली जात नसे. याच सुमारास तात्या नेने फकिराच्या

वेषामध्ये खजुरी मशिदीत गेले असता त्यांना विलक्षण माहिती मिळाली. राजाच्या सावकाराची सुंदर सून पळवण्याचा कट रचला जात होता! माणिकरावांमार्फत ती संपतरावांना समजली. संपतराव एकदम खवळले. त्यांनी मीर बाकर अलीला आणि त्यांच्याकडे उतरलेल्या झियाउद्दिन नावाच्या गोधरा येथील पाहुण्याला पोलीस चौकीमध्ये बोलावून घेतले. नमस्कार-चमत्कार झाले.

"आपल्याजवळ पैसे फार खुळखुळताहेत असे ऐकतो", संपतरावांनी हसत हसत म्हटले.

"आमच्याजवळ कोठले पैसे, हुजूर?" बाकरअली गयावया करू लागला.

"आपल्याजवळ नाहीत, पण आपल्या पाहुण्याजवळ खूप पैसे आहेत," जरा दरडावणीच्या सुरात संपतराव म्हणाले, "तुमची सारी कारस्थाने मला समजली आहेत. महंमद तलाव येथे दादा लोकांना बोलावून या तुमच्या पाहुण्याने काय सांगितले, ते ऐकायचे आहे? मैराळांच्या सुनेस पळवण्याचा जो कट रचला आहे त्याविषयी ऐकायचं आहे?"

"साहेब," बाकरअलीच्या तोंडून आवाज निघेना. झियाउद्दिनचे तर पाय लटपटू लागले. संपतरावांना कटाची पूर्ण बातमी समजली, याची साक्ष पटल्यामुळे त्या दोघांनी संपतरावांच्या पायावर लोटांगण घातले आणि म्हणाले, "हुजूर, अल्लाची कसम, फार चुकलो, माफी चाहतो. पुन्हा ही भूल कधी होणार नाही, याचा यकीन देतो."

त्या दोघांना पोलिसी इंगा दाखवल्यावर संपतरावांनी सोडून दिले. ही हकिकत कळल्यावर सर्व बडोदे शहर एकदम शांत झाले. बडोद्यामध्ये जातीय दंगे संस्थानाच्या विलीनीकरणानंतर पुन्हा सुरू झाले (तात्यासाहेब नेने (लेखकाचे आजोबा) यांची आठवण.

**ऊ) अस्पृश्यतेची विकृती** – वेदकाळामध्ये अस्पृश्यता नव्हती. बुद्धोत्तर काळात अहिंसेमुळे सामाजिक संतुलन आणि स्थैर्य नष्ट झाल्यामुळे, असंतुष्टांकडून परकीय आक्रमणांना आमंत्रणे मिळू लागली. त्यातून वर्णव्यवस्थेचा लोप होऊन जातिव्यवस्था जन्माला आली. हेतू हा की, प्रत्येक जातीच्या पुढाऱ्याने आपली जात सांभाळावी आणि हिंदू धर्माचा ऱ्हास थांबवावा. जातिव्यवस्था हे हिंदू धर्माचे विकेंद्रीकरण होते. बौद्ध धर्माचे कालांतराने भारतातून उच्चाटन झाले; पण विकेंद्रीकरण सुरूच राहिले. चारच्या चाळीस, चाळीसच्या चारशे आणि चारशेच्या चार हजार जाती निर्माण झाल्या. 'आमचे गड आम्ही लढवू' अशी संकुचित मनोवृत्ती प्रत्येक जातीच्या पुढाऱ्याची झाली. या जातींमुळे आमचे स्वराज्य गेले, कारण धर्मातील २५ टक्के भागाला आम्ही अस्पृश्य ठरवले. ही विकृती स्वामी

दयानंदांनी सयाजीरावांना समजावली आणि ''काही झाले तरी माझ्या राज्यात मी अस्पृश्यता चालू देणार नाही, तिच्यावर बंदी आणेन आणि अस्पृश्यांना आधुनिक शिक्षण देऊन स्पृश्यांच्या पंक्तीला बसवेन'', असे वचन घेतले. दयानंदांनी बजावले, ''आज जर हे झाले नाही, तर ही सारी अस्पृश्य मंडळी ख्रिस्ती वा इस्लाम धर्मामध्ये जातील.'' नित्यानंदांनी सयाजीरावांना पाहिजे त्यापेक्षा जास्त क्षमतेचा, जास्त सेवाधर्मी आणि त्या विषयाला वाहून घेतलेला असा एक माणूस दिला – आत्मानंद अमृतसरी. सयाजीरावांनी त्यांच्या पुत्राला कोल्हापूरच्या महाराजांकडे राजकुमाराचा सोबती (कंपॅनिअन) म्हणून धाडून दिले. हेतू हा की, तेथे ख्रिस्ती धर्मप्रचारकांनी आपले पाय रोवू नयेत आणि कोल्हापूरमध्ये संस्कृत भाषा जास्त लोकप्रिय व्हावी. दुर्दैवाने हा बडोदेकर मुलगाच तेथे जाऊन बिघडला (आत्मानंदांची नात आर्य कु० प्रतिभा पंडित यांची पित्याविषयीची आठवण).

**ए) वेदोक्त प्रकरण** – वेद हे अपौरूषेय आहेत. वेद हे अनादी, अनित्य आणि अपरिवर्तनीय आहेत. तसेच ते शब्दस्वरूप आहेत. ते आकाशामध्ये जन्मले आणि तपश्चर्या करणाऱ्या ऋषीमुनींना दिसले. वेदांच्या शब्दांचा अनुक्रम जसा आहे, त्याच अनुक्रमाने त्यांचे उच्चारण केले पाहिजे. महर्षी व्यासांनी विस्कळीत वेदांचे वर्गीकरण केले –

१) ऋग्वेद, २) यजुर्वेद, ३) सामवेद आणि ४) अथर्ववेद. ब्राह्मणाला किती वेद येतात त्यावर चतुर्वेदी, त्रिवेदी आणि द्विवेदी ही आडनावे व्यवहारामध्ये आली. ऋग्वेदाच्या ८, यजुर्वेदाच्या ८६, सामवेदाच्या १,००० आणि अथर्ववेदाच्या ९ शाखा झाल्या.

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळी मुसलमानी राजांनी लादलेल्या सामाजिक रूढींच्या बेड्या स्थानिक ब्राह्मणांनी उपस्थित केल्या. परशुरामाने क्षत्रियांना नष्ट केले. त्यामुळे तथाकथित राजेमहाराजे क्षत्रिय नाहीत, ते शूद्र आहेत; असा वाद साताऱ्याच्या प्रतापसिंहांच्या राज्यरोहणाच्या वेळी पुन्हा ब्राह्मणांनी उकरून काढला. दोघांनी क्षत्रियत्व दाखवणाऱ्या वंशावळी निर्माण केल्या आणि ब्राह्मणांची तोंडे बंद केली.

**क्षत्रियांचे म्हणणे काय होते? त्यांचे थोडक्यात मुद्दे खालीलप्रमाणे** – (१) परशुरामाने २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करण्याचा नेटाने प्रयत्न केला तरी सारे क्षत्रिय तो संपवू शकला नाही, जसे हिटलर ज्यूंना. (२) नंद घराण्याचा नाश झाल्यावरही क्षत्रियांचे अस्तित्व होते. (३) आचारानुसार कलियुगात जाती ठरत नाहीत. (४) क्षत्रियांनी शूद्रान्न भक्षण केले, वांगी-गाजरे खाल्ली तरी क्षत्रियत्व कायम राहते. (५) सातारा, तंजावर, नागपूर आणि करवीर येथील राजघराण्यांचे

मूळ एकच असून, त्यांच्याकडे ऋग्वेदानुसार कर्म चालते. (६) दक्षिण देशातील महाराष्ट्र क्षत्रियांची उपनामे आणि भोसले, शिर्के, महाडिक, मोहिते, गुजर, अहिरराव, पालकर, खानविलकर, माने, घाटगे आणि जाधव या क्षत्रिय आणि शूद्र या कुलांची गोत्रे व प्रवर सारखे आहेत. (७) क्षत्रियांची आणि शूद्रांची नावे एकच असली, तरी ती पडण्याच्या कारणांवर इतिहास गप्प आहे.

इलियटचा सहवास, चौकस आणि कुशल बुद्धी, आर्य समाजाचा सयाजीरावांच्या मनावरील प्रभाव, सरदेसाई यांच्यासारखे इतिहासप्रेमी सद्‌गुरू आणि पंडित शिवदत्त शास्त्री यांच्या संशोधनामुळे १८९६ मध्येच सयाजीरावांनी आपल्या क्षत्रियत्वाचे पुरावे गोळा करण्याची व्यवस्था केली होती. सयाजीरावांच्या पूर्वजांनी नाशिक आणि त्र्यंबकेश्वर या तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या होत्या. त्या नोंदी तेथील उपाध्यायांनी योग्य रीतीने करून ठेवल्या होत्या. त्यामुळे कवळाण्याचे आणि बडोद्याचे राजघराणे एकच आहे, असे सिद्ध करता आले. या कामामध्ये नानाशास्त्री चिपळूणकरांनी खूप मेहनत घेतली. आपण क्षत्रिय असल्यामुळे आपले आणि बडोद्यातील इतर मराठे सरदार यांचे सर्व विधी वेदोक्त व्हावेत, असा रास्त आग्रह धरला. त्याला कोणी विरोध करण्याचे धाडसही केले नाही. ३-४ वर्षांनी हाच वाद कोल्हापूर संस्थानामध्ये (१८९९) तेथील महाराजांनी आणि महाराष्ट्रातील पंडितांनी उगाचच चिघळू दिला. त्यामुळे महाराष्ट्राचे वातावरण उगाचच तापले आणि कायमचे दूषित झाले. अजून ते कमी होण्याची चिन्हे दिसत नाहीत.

वेदोक्त आणि पुराणोक्त यातील फरक सयाजीरावांनी तज्ज्ञांकडून नीट समजावून घेतला. दयानंदांनी सांगितल्यानुसार शिवाजी महाराजांचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवला. शिवाजी महाराजांना स्थानिक ब्राह्मणांनी विरोध करताच त्यांनी काशीहून गागाभट्टांना बोलावून घेतले आणि कार्यसिद्धी केली. ती वेळ सयाजीरावांनी आणूनच दिली नाही.

सयाजीराव महाराज मोठे हुशार होते. महाराष्ट्रातला ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद त्यांनी आपल्या राज्यात आयात केला नाही. बडोद्यातील नेने-माने, वि० पां० दांडेकर-पगार वगैरे मंडळींची निःस्वार्थी मैत्री पाहून महाराष्ट्रामधल्या ब्राह्मणेतरांना हेवा वाटायचा. वि० द० घाटे त्याचे स्पष्टीकरण देतात – ''ती जुनी ब्राह्मणांची आणि मराठ्यांची पिढी मला फार आवडते. सोवळेओवळे होते, पाने काटकोनात मांडली जात होती, स्वयंपाकघरात कधी कधी मराठा मित्राला प्रवेशसुद्धा नसे. हे सारे खरे होते; परंतु त्याच्याहीपेक्षा दुसऱ्या काही गोष्टी अधिक खऱ्या होत्या. आणि त्या मूलभूत होत्या, महत्त्वाच्या होत्या. त्या ब्राह्मणांचे शरीर सोवळे असेल, परंतु मन सोवळे नव्हते. प्रेमळ होते, मोकळे होते, स्वागतशील होते, या पिढीत सोवळे नाहीसे

झाले आहे, परंतु पुष्कळ प्रसंगी त्याच्याचबरोबर मनाचा मोकळेपणा आणि उधळेपणा नाहीसा झाला आहे. मने संकोचली आहेत असे मला कधी कधी वाटते'' (घाटे वि० द०, दिवस असे होते, मौज, १९९८, पृ० १५७).

**ऐ) ब्राह्मणांना दानधर्म** – दयानंद आणि नित्यानंद यांनी हिंदू धर्मामध्ये गुण (नैसर्गिक आवड, जीन्स) आणि कर्म (प्रत्यक्ष दृश्य आणि अदृश्य कार्य) यावर आधारलेल्या चातुर्वर्ण्य पद्धतीला आपला विरोध नसल्याचे सयाजीरावांना सांगितले. मात्र, जन्मजात जातिपद्धतीचे ते खंडण करत. कारण त्यामुळे उच्च-नीच भावनांना उगाचच भाव मिळतो, जातीचा दुराभिमान वाढतो, स्पृश्यास्पृश्यता अकारण जन्म घेते आणि तेढ वाढून हिंदू धर्माचा अंती ऱ्हास होतो. इतिहासापासून जे शिकत नाहीत, ती संस्कृती नष्ट होते. सर्वांना एका छत्राखाली आणायचे, तर जातिभेद नष्ट झाला पाहिजे. अभ्यास आणि संशोधन करून इतरांना ज्ञान देणाऱ्या खऱ्या ब्राह्मणांना आर्थिक मदत करून वर आणले पाहिजे, म्हणजे ते समाजामध्ये जागृती निर्माण करून हिंदू समाज सुसंघटित, श्रीमंत आणि सामर्थ्यवान बनवतील. सयाजीरावांनी हा उपदेश शेवटपर्यंत लक्षात ठेवला आणि त्याप्रमाणे आचरण केले.

सरदेसाई यांनी सयाजीरावांच्या मनावर शिवाजी महाराजांच्या चरित्रामधील निरनिराळी उदाहरणे देऊन गोब्राह्मण प्रतिपालन म्हणजे काय, ते त्यांच्या बालमनावर नीट ठसवले होते; मात्र शिवाजी महाराजांनी पद्मदुर्गावरील ब्राह्मण बेईमानी करू लागल्यावर, ताबडतोब त्याला तंबी देणारे पत्र कसे लिहिले, हेही त्यांनी सयाजीरावांना सांगितले. ते पत्र पुढीलप्रमाणे - ''एवढी हरामखोरी तुम्ही कराल.. ही गोष्ट घडायची तरी होय ना कळे की, हबशियांनी काही देऊन आपले चाकर तुम्हाला केले असतील तरी ऐशा चाकरांस... ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो... यावरि बोभाट आलिया उपरी तुमचा मुलाहिजा करणार नाही. गनिमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसे जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल. ताकीद असे'' (दादूमिया, दलितांचे राजकारण, मॅजेस्टिक, १९७४, पृ० १३८).

**क) शिकागो सर्वधर्म विश्वसंमेलन** – जून १९३३ मध्ये इंग्रज सरकारला धक्काच बसला, कारण अमेरिकेमधून सयाजीरावांना आमंत्रण होते आणि ही संधी सयाजीराव महाराज नक्कीच सोडणार नव्हते. तब्बल चाळीस वर्षांनंतर शिकागो येथे डेलावर प्लेसमधील मोठ्या चर्चमध्ये ही 'सर्वधर्मपरिषद' भरली होती. सयाजीराव प्रमुख पाहुणे आणि अध्यक्ष म्हणून माजी अमेरिकन अध्यक्ष हर्बट हूव्हर असा दुर्मीळ योग होता. शिकागो स्टेशनवर २६ ऑगस्ट रोजी महाराजांचे मोठ्या थाटामध्ये स्वागत करण्यात आले आणि त्यांना 'मानवंदना' (गार्ड ऑफ ऑनर) देण्यात आली. युरोप आणि अमेरिकेतील राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक आणि सामाजिक

क्षेत्रामधील हजारो थोर स्त्री-पुरुष तेथे उपस्थित होते. अधिवेशनापूर्वी महाराजांना अमेरिकेतील लोकांसाठी आकाशवाणीवरून एक संदेश देण्याची विनंती केली. महाराजांनी त्याप्रमाणे एक छोटे, पण मार्मिक भाषण अमेरिकी आकाशवाणीवर केले.

हा माणूस आमच्या नाकावर टिच्चून अमेरिकेमध्ये प्रमुख पाहुणा म्हणून जात आहे, याबद्दल इंग्रज अधिकाऱ्यांची एकाच वेळी राग, आश्चर्य आणि कौतुक अशी संमिश्र भावना झाली होती; पण या वेळी आपण काही करू शकत नाही याविषयी असाहाय्यतेची टोचणीदेखील ते अनुभवत होते आणि सर्वांत दुःखदायक भावना ही होती की, जेवढे सयाजीराव जगन्मान्य होतील, तेवढे त्यांना शिक्षा करणे जास्त अवघड होत जाईल; पण सयाजीरावांची लोकप्रियता ते थोपवू शकत नव्हते.

शेवटच्या दिवशी संयुक्त अधिवेशन सयाजीराव यांच्या अध्यक्षतेखाली मॉरिसन हॉटेलमध्ये भरवरण्यात आले होते. या प्रसंगी विविध राष्ट्रांचे प्रतिनिधी आणि प्रेक्षक मिळून २६,००० स्त्री-पुरुष उपस्थित होते. त्यांनी सभागृहामध्ये प्रवेश करताच हा प्रचंड जनसमुदाय उत्स्फूर्तपणे उभा राहिला आणि हिंदू पद्धतीने हात जोडून सयाजीरावांना नमस्कार करून महाराजांचे पुढील शब्दांमध्ये स्वागत केले. – ''गरिबांच्या कल्याणाकरिता झटणाऱ्या राजा, तुला आरोग्य आणि दीर्घायुष्य लाभो. आपल्यामधील परमात्मस्वरूपाला आम्ही आपले हात जोडून आणि मस्तक टेकवून प्रणाम करतो.''

आपल्या अध्यक्षीय भाषणामध्ये महाराज म्हणाले, ''या देशामध्ये आल्यामुळे मला फार आनंद वाटतो आहे. याच शहरामध्ये १८९३ मध्ये सर्वधर्म-परिषद भरली होती. आमच्या देशामधील एक थोर संन्यासी देशभक्त स्वामी विवेकानंद त्या परिषदेस हजर होते. त्या वेळी त्यांनी मानवता धर्माचा नवा संदेश दिला होता. त्यामुळे पाश्चात्त्य देशातील लोकांना इतर धर्मांचा अभ्यास करण्याची स्फूर्ती मिळाली. पहिली सर्वधर्मपरिषद माझ्या देशामध्ये ख्रिस्ताच्या जन्मापूर्वी दोनशे वर्षे आधी सम्राट अशोक याने भरवली होती. सतराव्या शतकामध्ये अकबर बादशहाने अशीच सर्वधर्मपरिषद भरवली होती. अशा प्रकारे आशिया खंडामध्ये सर्वधर्म एकमेकांचा सहानुभूतीने अभ्यास करत होते. मी स्वतः धर्माने हिंदू आहे. हिंदू धर्म सर्व धर्मांमध्ये सहिष्णू आहे. पूर्व आणि पश्चिमेमधील देशांनी एकमेकांची माहिती करून घेतली पाहिजे. कारण, त्याच मार्गाने जगामध्ये शांतता निर्माण होणार आहे आणि नांदणार आहे.''

''आज आपण माझा सन्मान केलात. माझी अशी समजूत आहे की, त्यामुळे आपण माझी मातृभूमी सर्व धर्मांची जननी असलेल्या भारतमातेचाच सन्मान केला आहे. मी आज हिंदू धर्माचा प्रसार करण्यासाठी येथे आलेलो नाही. मी येथे शांतिदूत

म्हणून आलेलो आहे. आज आपण एका गोंधळलेल्या युगामधून जात आहोत. भौतिक शास्त्रांनी जगाचे एकीकरण केले असले, तरी त्यांनी सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि धार्मिकदृष्ट्या त्याचे शतशः तुकडे तुकडे केले आहेत. जगाचे आत्मिक आणि सांस्कृतिक ऐक्य साधण्याचे कार्य धर्माने साध्य करता येईल किंवा नाही, हे आपणास पाहावयाचे आहे. सध्या त्यामध्ये जातिभेदाच्या कल्पना शिरल्या आहेत.''

''समाजसुधारणेच्या दृष्टीने कोणीही श्रेष्ठ नाही वा कोणीही कनिष्ठ नाही. सर्व जण समाजाचे समान घटक आहेत. ही मूळ कल्पना सर्वच धर्मांमध्ये सध्या विसरली गेली आहे. म्हणून तिचे पुनरुज्जीवन करून, सर्व धर्मांना त्यांचे साधे आणि निर्मळ स्वरूप पुन्हा प्राप्त करून दिले पाहिजे. तसे करण्यासाठी इतर धर्मांचे तुलनात्मक ज्ञान फार उपयुक्त आहे. ते ज्ञान होण्यासाठी यासारख्या परिषदा हे उत्तम साधन आहे, म्हणून आपण आपल्या सर्वांचे शत्रू असलेले अज्ञान आणि स्वार्थ यांचा प्रतिकार करण्यासाठी उद्युक्त होऊ या. जगात धर्म अनेक असले तरी धर्मतत्त्व एकच आहे. आपण सर्व जण एकाच सृष्टिकर्त्या परमेश्वराचे सेवक आहोत. म्हणून आपण एकमेकांचे बंधू होऊ, त्या परमेश्वराचा सदैव जयजयकार असो'' (नेने वि० पां० (संपा०) सयाजीराव गायकवाड यांची भाषणे, पृ० २५६).

सयाजीरावांच्या प्रभावी शब्दांनी श्रोते अगदी मंत्रमुग्ध होऊन गेले होते. त्यांचे भाषण संपल्यावर टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला आणि सर्वांनी महाराजांचा जयजयकार केला. जागतिक सर्वधर्मपरिषदेचे अध्यक्षपद हा एक सयाजीरावांच्या शिरपेचातील मानाचा तुरा होय. जगामध्ये महायुद्धाचे भयानक सावट असतानाच जागतिक शांतता आणि मानवताधर्म यावर त्यांनी अस्खलित इंग्रजीमध्ये केलेले भाष्य, हे मराठी माणसांना अभिमानस्पद आहे.

। । ।

६



# शिक्षण

**अ) पार्श्वभूमी** – पेशवाईमध्ये सर्व ब्राह्मणांना लिहितावाचता येत नसे. पाठांतरावरच भर होता. त्या काळी सामान्य व्यवहाराकरता प्रवेशपरीक्षेपर्यंचा अभ्यास आवश्यक वाटत नसे. तोंडी हिशोब आणि जमाखर्च यामध्ये मुलगा पारंगत झाला म्हणजे त्याचे व्यावहारिक शिक्षण पूर्ण झाले, असे समजण्यात येई. याशिवाय अश्वपरीक्षा, रत्नपरीक्षा, पागोटे बांधणे, पत्रावळी आणि द्रोण लावणे अशा काही विद्या त्यास अवगत झाल्या, म्हणजे तर तो व्यवहारपंडितच बने. तेव्हाचे शैक्षणिक साहित्यही त्या विद्येस शोभण्यासारखे साधेच असे. दगडी पाटीऐवजी एका लाकडी फळीवर माती पसरवून अक्षरओळख करून देत असत. म्हणूनच त्यास धुळाक्षरे म्हणत.

त्या काळातील मास्तरांना तात्या पंतोजी असे म्हणत. ते आपल्या शिष्यांप्रमाणे अल्पसंतोषी असत. त्यांना गुरुदक्षिणा पैशाच्या स्वरूपात नाही, तर विद्यार्थ्यांच्या पालकांकडून कधी धान्याच्या रूपाने, नाही तर विद्यार्थ्यांकडून घरकामाच्या रूपाने मिळे. पालक शिंपी असेल, तर तो पंतोजीचा अंगरखा फुकट शिवून देई; सुतार असल्यास त्याच्या घरचे लाकडी काम फुकट होई. गुरू पैशाचा मिंधा नसल्यामुळे त्याला योग्य वाटेल अशी शिक्षा आपल्या शिष्याला करण्यास तो मोकळा असे. धोपटणे, गालगुच्चे घेणे, कानशिलात भडकावणे, चापट्या मारणे, कोलदंडा देणे किंवा घोडी देणे, हे प्रकार सर्रास चालत.

शास्त्री पंडितांच्या ज्ञानाची गोष्ट वेगळी असे. व्याकरण, अलंकार, न्याय, ज्योतिष मीमांसा, इत्यादी शास्त्रांपैकी एक किंवा अनेक शास्त्रांचे सांगोपांग अध्ययन केलेले विद्वान त्या काळी अनेक असत. त्यांचे त्या शास्त्रातील ज्ञान व्यापक आणि गाढ असे; पण बहुतेक पंडितांचे ज्ञान एखाद-दुसऱ्या शास्त्रापुरतेच मर्यादित असल्यामुळे, त्यामध्ये अष्टपैलूपणा नसे. गृहस्थांमध्येही रूपावली, समासचक्र, अमरकोश, रघुवंश, शाकुंतल, कादंबरी इत्यादी ग्रंथांचे अध्ययन करण्याचा प्रघात होता. इतर भाषांचे अज्ञान, चोरांची भीती, जलद प्रवासाच्या वाहनांचा अभाव

यामुळे विद्वान वा पंडित यांची कूपमंडूक, अल्पसंतोषी वृत्ती असे. तत्कालीन जुन्या विद्वानांमध्ये व्यापक आणि चिकित्सक बुद्धीने विचार करण्याची सवय नसे. त्यांना देशस्थितीबद्दल आणि स्वभाषेबद्दल आस्था नसे. त्यांच्याकडून आवडीच्या विषयावर ग्रंथरचना होत नसे. मॅट्रिक पास तरुणाला कारकुनाची सहज नोकरी मिळे; पदवीधरांना तर मोठ्या पगाराची जागा हसत मिळे.

त्या काळी ज्ञानाच्या गाढतेकडे लक्ष पुरवणारी पौर्वात्य शिक्षणपद्धती पश्चिम क्षितिजावर अस्ताला जात होती; तर ज्ञानाचा विस्तार वाढवणारी पाश्चात्य शिक्षण पद्धती पूर्व क्षितिजावर उदय पावत होती. लठ्ठ पगाराची नोकरी आणि इंग्रजांची सत्ता असल्यामुळे पाश्चिमात्य ज्ञानव्यवस्थेला साहजिकच राजमान्यता होती. पौर्वात्य शिक्षणपद्धतीची कुचेष्टा आणि हेटाळणी कळत-नकळत होई. राजसत्तेच्या प्रभावाबरोबरच विज्ञान आणि तंत्रज्ञानाचे कुतूहल पाश्चिमात्य ज्ञानाच्या लोकप्रियतेस जबाबदार होते.

पन्नास वर्षांपूर्वीच्या स्त्रियांना कथापुराण श्रवणाने मिळण्यासारखे ज्ञान बरेच असे. लिहिणे, वाचणे आणि हिशोब एखादीसच येत असे. कारण त्याची जरूरीच भासत नसे. चूल आणि मूल यातून स्त्रिया वरच येत नसत. संयुक्त कुटुंबामध्ये नातेवाईक आणि पाहुणे भरपूर. त्यामुळे फावल्या वेळात गप्पा झोडण्याची आणि माहितीचा प्रसार करण्याची उत्तम सोय असे. बायकांना अक्षरओळख झाल्यास त्या आपल्या ज्ञानाचा उपयोग प्रेमपत्रे पाठविण्याच्या कामी करतील, अशी भीती पुरुषांना वाटत असे. त्यामुळे लेखनामध्ये किंवा वक्तृत्वामध्ये नावाजलेली एकही स्त्री दिसणे दुर्मीळ असे. बायका स्वार्थसाधू आप्तांच्या शिकार बनत. ब्राह्मणांशिवाय इतर वर्णांना ज्ञानार्जन करणे म्हणजे वेळ, पैसा आणि शक्ती यांचा अपव्यय वाटे. हा अपव्यय टाळून त्यांना ब्राह्मणांपेक्षा जास्त पैसा आणि नाव कमावण्याच्या अनेक सोयी व संधी उपलब्ध होत्या. क्षत्रिय आणि व्यापारी ब्राह्मणांपेक्षा जास्त सुखी आणि संपन्न होते. शूद्रांना अलंकार, व्याकरण किंवा अमरकोशाच्या शिक्षणाची डोकेदुखी वाटे! ('५० वर्षांपूर्वीचे आणि आताचे महाराष्ट्र', 'विविधज्ञान विस्तार' मासिकांचा सुवर्ण महोत्सवी विशेषांक, १९२१)

**आ) पुण्यातील नवा पायंडा** – सयाजीराव महाराजांच्या आजूबाजूस पुण्याकडील सुशिक्षित, हुशार आणि चुणचुणीत तरुण मंडळी वावरत असत. पुण्याच्या गोष्टी निघाल्या की, ती मंडळी विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि बळवंतराव टिळक यांच्या स्वार्थत्यागाची भरभरून स्तुती करत. पैसे मिळवण्याचे साधन म्हणून कायद्याचे ज्ञान न वापरता, त्याचा फायदा मिळताच आपल्या पुण्यामधील मित्रांना बोलावून घेत असत. गायकवाड सरकार अशा पाहुण्यांना खिचडीचा शिधा

फुकट देत असल्यामुळे, असे येणे मित्रांना ओझे वाटत नसे. ('उत्तम व्यापार, मध्यम शेती अने कनिष्ठ नोकरी' असे गुर्जर मानसशास्त्र असल्यामुळे नोकरी फक्त मराठी लोकांनी करायची असा नियम झाला.) मुन्सफी किंवा वकिलीचा व्यवसाय न करता शाळामास्तर होणारे टिळक हे त्या काळी सर्वांनाच कुतूहलाचा विषय झाले होते. समाजाची सेवा करण्याचे दोन मार्ग होते. जुन्या पिढीला उपदेश करणे आणि नव्या पिढीला शिक्षण देणे. इंग्रजी शासनामुळे आणि तंत्रज्ञानामुळे जुन्या पिढीला उपदेश करणे म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी घालण्यासारखे होते. संसारामध्ये त्यांचे पाय घट्ट रुतून बसल्यामुळे ते काढून घेऊन नव्या दिशेने धावणे त्यांच्यासाठी अवघड नव्हे, अशक्य होते. एकदा माणूस प्रतिष्ठित झाला म्हणजे त्याला धोरणांमध्ये बदल करणे अवघड पडते. म्हणून धर्मगुरू काय किंवा सामाजिक परिवर्तन करू इच्छिणाऱ्या साऱ्यांची भिस्त तरुण पिढीवर असे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी महाराष्ट्र घडवला. रानडे काय, टिळक काय किंवा गोखले काय, या सर्वांनी राष्ट्रप्रेम, देशभक्ती, समाजसेवा वगैरे गुणांची स्फुर्ती त्यांच्याकडून घेतली, हे निर्विवाद (केळकर न० चिं०, टिळक चरित्र, खंड १, पृ० ११६).

"हल्ली विद्येचा फार प्रसार झाला आहे. अभिरुची वाढली, असे वाटते; पण ती भ्रांती आहे. केवळ सरकारी चाकरीच्या लोभानेच आमचे लोक विद्या शिकतात. त्यांना विद्येचे व्यसनच काय, पण साधारण आवडही नसते. विद्यापीठाचे झगे अंगातून काढताना त्याबरोबरच स्वदेशाभिमान, विद्याभिरुची, दुर्जनतिरस्कार वगैरे सणावाराच्या दिवशी घालावयाची जी मनाची अलंकार भूषणे तीही काढून ठेवतात. स्वतः शिक्षकालाच आपल्या कामाची थोरवी वाटत नाही; मग ती इतरांना कशी वाटावी? उपाय नाही म्हणून शिक्षकाचे काम करावयाचे, ही जी त्यांची समजूत तीच लोकांची.

पूर्वी गुरुंविषयी शिष्याच्या मनात पूज्यबुद्धी असे. हल्ली ती नाही. उभयपक्षी संबंध केवळ स्वार्थाचा. शिकवण्याचे विषयही बांधलेले. धर्म नीती वगैरेंचे वारेदेखील शिक्षणाला लागू नये, अशी सरकारची व्यवस्था; पण ही स्थिती बदलून शिक्षण चालू असताना शिक्षक जर विद्यार्थ्यांच्या मनात विद्येची खरी थोरवी भरून देऊन तिच्या अभ्यासाने होणाऱ्या अनिर्वाच्य सुखाची त्यांना चटक लावून उत्साह उत्पन्न करतील, तर शिक्षण हे ठिसूळ न बनता तरवारीच्या पोलादासारखे कठीण व लखलखीत होऊन, फार दिवस बिऱ्हाड करून ज्या अरिष्टरुपी राक्षसांनी या देशास जेरीस आणले त्यांचे निर्दालन करील, व तेणेकरून सुशिक्षित लोक व त्यांचे कारागीर म्हणजे शिक्षक यांचे दिव्य यश भूमंडळावर मिरवेल" (शिक्षकाचे काम, शालापत्रक, १८७२, जानेवारीचा अंक).

बॉम्बे युनिव्हर्सिटीची १८५७ मध्ये स्थापना झाली, तेव्हा शाळा-पाठशाळांवरील जुन्या पंडितांचा अधिकार संपला. तो अधिकार आता युरोपीयांच्या हाती आला. जुने पंडित आता भाषांतरकार म्हणून नेमले गेले. याला कृष्णशास्त्री चिपळूणकर किंवा केरोपंत छत्रे यांसारखे काही जण अपवाद होते. ते इंग्रजी शिकले. त्यांना ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य, रिपोर्टीयर किंवा प्राध्यापक अशा जागा मिळाल्या. पुण्यामध्ये पूना कॉलेज आणि डेक्कन कॉलेजमध्ये युरोपीय प्राध्यापकांनी गर्दी केली. त्यांनी संस्कृत हद्दपार केले. संस्कृतची जागा इंग्रजीने घेतली. १८५८ मध्ये एडविन अर्नोल्ड यांनी तर लिहिले, ''येथल्या पदवीधरांचे मराठीपेक्षा इंग्रजीवर जास्त प्रभुत्व आहे.'' सारे युरोपीय काही पंडित नव्हते. गोरी कातडी हे त्यांचे पारपत्र होते. कर्कहॅम नावाचा गृहस्थ पुणे हायस्कूलचा प्राचार्य होता; पण तो तीन-तीन दिवस शाळेत यायचाच नाही. कॅंडीसाहेबाने मॅट्रिकच्या मराठी विषयाच्या प्रश्नपत्रिकेमध्ये असा प्रश्न विचारला की, ''पुढील शब्दांचे विवरण करा. – ''डोचके की बोचके, डोके की फोके'' एक गोरा प्राध्यापक एलफिन्स्टन कॉलेजमध्ये गणित शिकवत असे. ते अलजिब्रा उघडून, ओमिट म्हणजे वाचू नका या अर्थी 'ओ' हे अक्षर, रीड म्हणजे वाचा या अर्थी आर हे अक्षर एवढेच विद्यार्थ्यांना सांगत असत.

साहेब फार हुशार, ही समजूत दूर करण्यासाठी अशी धेंडे फार उपयोगी पडत. भारतीय हे इंग्रजांपेक्षा कोणत्याही विषयांमध्ये कमी नाहीत, ही टिळक यांच्यासारख्यांना जाणीव झाली, ती असल्या गोऱ्या वशिलांच्या तट्टांमुळे! ही जाणीव सयाजीरावांकडे पोहचवण्यासाठी टिळकांचे सहाध्यायी बडोदा येथे गायकवाडांच्या सेवेमध्ये भरपूर होते. टिळक बी० ए० होण्यापूर्वी फक्त १७९ विद्यार्थी बी० ए० झाले होते. टिळकांनी एल० एल० बी० पदवी घेतली त्या वेळी एकदम २० विद्यार्थी कायद्याचे पदवीधर झाले. त्यापूर्वी १४ वर्षांमध्ये ५३ विद्यार्थी एल० एल० बी० झाले होते. गुजराथमध्ये शिक्षणाचे प्रमाण खूप कमी आणि त्यातच उत्तम शेती, मध्यम व्यापार आणि कनिष्ठ नोकरी अशी लोकांची समजूत असल्यामुळे, पुण्यामुंबईचे पदवीधर बडोदा संस्थानामध्ये चटकन उच्चाधिकारी होत.

पुरुषांचे शिक्षण जेथे इतके कमी होते, तेथे स्त्रियांचे शिक्षण मागासलेले असल्यास कोणते आश्चर्य? पूना नेटिव्ह जनरल लायब्ररीमध्ये एकदा घडलेला एक संवाद एका 'पिशाच्चाने' 'ज्ञानप्रकाश'मध्ये प्रसिद्ध केला –

जुना शास्त्री – तुम्ही काही दिवसांनी बायकांच्या पाया पडाल.

तरुण शास्त्री – होय, बायको गंधर्व आहे. बायको घराचा आत्मा आहे.

शास्त्री – अर्थ सांगण्याची तुमची शैली फार उत्तम आहे.

तरुण – वाहवा रे पेशवाई शहाणे, 'रामः रामौ' केले म्हणजे अक्कल येत नाही.

शास्त्री – बरं महाराज, येस फेस केल्याने येऊ दे.

एवढा संवाद सांगून 'पिशाच्च' पुढे लिहितो की, ''बायको घराचा आत्मा आहे, तर सूर्य पाणी आहे व समुद्र कौलार आहे. आमच्यावेळी बायको चार पुरुषांच्या दृष्टीस पडेल काय मगदूर आहे अशी स्थिती होती. विलायतेत राणी राज्य करते. तिच्या नवऱ्याला कोणी विचारीत नाही. तसे हिंदुस्थानातही सकाळी उठल्याबरोबर बायकोस बारा साष्टांग नमस्कार घालावे असा नियम होणार आहे'' (केळकर, लोकमान्य टिळकांचे चरित्र, खंड १, पृ० ७८).

जानेवारी १८७१ मध्ये पुण्यामध्ये 'विचारवती स्त्री सभा' सुरू झाली. त्या सभेमध्ये फक्त ८ स्त्री सभासद होते. 'ज्ञानप्रकाश' एवढे सुधारणावादी; पण ९ जानेवारी १८७१ रोजी त्याने उपरोधिक सूर काढला – ''स्त्रियांची सभा आजपर्यंत आमच्या इलाख्यात कोठेही झाली नव्हती व कदाचित सर्व हिंदुस्थानात आजपर्यंत कोठे झाली नसेल. अशी ही गोष्ट लोकांस दाखविण्याचा प्रसंग आमच्या शहराने आणला हे पाहून अत्यानंद होतो ... पण आज अशी सभा भरविणे म्हणजे रांगता येत नाही, त्यास पळावयास लावण्याचा प्रयत्न करण्यासारखा आहे.''

पदव्या मिळण्याचा एक हेतू सरकारी नोकऱ्या मिळवणे हा होता, पण वरिष्ठ नोकऱ्यांची संख्या अद्यापि विशेष वाढली नव्हती. सरकारी महसूल खात्यामध्ये मामलेदारांच्या जागा पुष्कळ, पण १८८० पर्यंत त्यामध्ये पदवीधरांना बिन-पदवीधरांच्या आधी प्रवेश मिळत नव्हता. ''हायर स्टँडर्ड परीक्षा झालेला पदवीधर व बिनपदवीधरांना, सर्वच नसल्या तरी काही विशेष प्रमाणाने, मामलती देण्याचे ठरवून, हे नवीन धोरण १८८० च्या पदवीदान समारंभात जाहीर केले. टेंपलसाहेब हे ब्राह्मणांचा द्वेष करत असले, तरी एकंदरीने शिक्षणाचे चाहते होते व पदवीधरांना इतरांहून सरकारदरबारी अधिक मान मिळाला पाहिजे असा त्यांचा आग्रह होता; पण नुसत्या पुस्तकी विद्येने या देशाच्या लोकांचे भागणार नाही, ही गोष्ट लक्षात घेऊन त्यांनी बी.एस्सी.ची पदवी नवीन स्थापण्याचा तेव्हा उपक्रम केला होता, व तीही गोष्ट या भाषणांत त्यांनी जाहीर केली'' (केळकर, पृ० ७८-७९).

पण सर्वच पदवीधर किंवा सुशिक्षित लोक व्यावहारिक धंद्यांत पडतात किंवा सरकारी नोकरीत गडप होऊन जातात असे नाही, तर शिक्षणाने मनुष्याला विचारांची स्वतंत्र दिशाही सुचणे अगदी स्वाभाविक आहे, हे टेंपलसाहेबांना इंग्लंडच्या अनुभवावरून पूर्णपणे माहीत होते. तसे झाले असता ते कदाचित असंतुष्ट राहतील, सरकारविषयी कदाचित त्यांना अप्रीती वाटू लागेल आणि अशा रीतीने समाजात सरकारावर टीका करणाऱ्या लोकांचा एक वर्ग कायमचा निर्माण

होईल, ही गोष्ट त्यांनी उघडपणे स्वीकार केली. "खुल्या दिलाने तरुण सुशिक्षित लोक बोलले म्हणून तेवढ्यापुरते त्यांना आम्ही राजद्रोही समजणार नाही. सुशिक्षित वर्ग कृतघ्न बनला, तरी त्याचे पाप स्वतः त्याच्या माथी राहील. त्यामुळे शिक्षणदानाचा हात आम्ही आखडून धरणार नाही. असंतोषाची भावना सुशिक्षिताला शोभते किंवा काय, हे ठरविण्याचे काम आम्ही स्वतः त्याच्या विवेकबुद्धीवर सोपवू" (तत्रैव, पृ० ७९-८०).

बळवंतराव टिळक एलएल० बी० होण्यापूर्वी पाचसहा वर्षे शास्त्रीबोवांच्या 'निबंधमाले'चा जन्म झालेला होता. या अवधीत तिने बरीच खळबळ उडवून दिली होती आणि टेंपलसाहेब वरील भाषण करत असताना ॲग्लोइंडियन वर्तमानपत्रांनी रंगवलेले सुशिक्षित तरुण महाराष्ट्रीयांचे भेसूर चित्र त्यांच्या चक्षुंपुढे उभे नव्हते, असे कोण म्हणेल?

**आ) सयाजीरावांचे शिक्षणविषयक धोरण** – ऑगस्ट १८८५ मध्ये बरोडा कॉलेज आणि हायस्कूलच्या बक्षीस समारंभाच्या वेळी केलेल्या भाषणामध्ये आपले शिक्षणविषयक धोरण (मॅग्ना चार्टा) सयाजीरावांनी जाहीर केले. त्यामध्ये पुढील कलमे होती – १) प्रतिवर्षी ३० नवीन शाळा उघडाव्यात. (२) दरवर्षी शाळांच्या इमारतींसाठी रुपये ६०,००० खर्च करण्यात यावेत. (३) प्रत्येक विभागातील मुख्य शाळेला जोडून अभ्यासक्रमामधील पुस्तकांमध्ये उल्लेख असलेल्या वस्तूंचे एक संग्रहालय असावे. (४) स्त्रीशिक्षणाच्या प्रगतीकडे अधिक लक्ष देऊन, शक्यतोवर मुलींच्या शाळांमधून स्त्रीशिक्षिकाची नेमणूक करावी. (५) समाजातील अगदी शेवटच्या स्तरापर्यंत शिक्षणाच्या प्रसाराची तजवीज करणे. (६) विद्यार्थ्यांच्या नैतिक आणि शारीरिक शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरवणे. (७) औद्योगिक शिक्षण देणाऱ्या शाळा सुरू करणे. (८) विद्यार्थ्यांसाठी एक नवीन वाचनमाला तयार करवून घेणे. (९) इंग्रजी भाषेमधून देशी भाषांमध्ये उत्तमोत्तम ग्रंथांची भाषांतरे करवून घेण्याची व्यवस्था करणे. त्या कामासाठी एखाद्या विद्वान पंडिताची नेमणूक करणे. (१०) जेवढी शक्य होतील तेवढी वाचनालये निर्माण करावी.

इ) **गुजराथी**

**१. गुजराथी शिक्षण आणि साहित्य** – बडोदे संस्थानातील शिक्षणतज्ज्ञ डॉ० जे० एम० मेहता लिहितात, "१८९२ मध्ये महाराजांनी मोफत आणि सक्तीचे प्राथमिक शिक्षण सर्वांत मागासलेल्या अमरेली प्रांतामध्ये सुरू केले. १९०६ मध्ये ते सर्व प्रांतांना लागू केले. ब्रिटिश भारतामध्ये गोखले आणि इतर शिक्षणतज्ज्ञांनी खूप आटापिटा करूनही ते शक्य झाले नाही. भारत स्वतंत्र झाल्यावर साऱ्या देशभर त्या धोरणाचा अंमल होऊ शकला; नव्हे ते धोरण भारतीय संविधानाचा एक

आवश्यक भाग होऊन बसले. भले महाराजांची मातृभाषा मराठी असेल; पण बहुसंख्य प्रजेची मातृभाषा गुजराथी असल्यामुळे, गुजराथी भाषा हीच साऱ्या बडोदे संस्थानाची राजभाषा त्यांनी ठरवली.'' गांधीजींचे लंडनमधील डॉक्टर आणि पुढे गुजरात राज्याचे पहिले मुख्यमंत्री डॉ० जीवराज मेहता हे या धोरणाची अंमलबजावणी झाली, त्या पहिल्या बॅचचे विद्यार्थी होत.

ए० के० त्रिवेदी बडोदा कॉलेजमध्ये मानसशास्त्र आणि नीतिशास्त्र यांचे प्राध्यापक होते. महाराजांनी त्यांना पहिल्यांदा राजवाड्यामध्ये बोलावले तेव्हा त्यांनी सांगितले ''प्राध्यापक महाशय, माझे शिक्षक म्हणून येथे बसा. माझ्या महाविद्यालयामधील कर्मचारी सभासद म्हणून नाही.'' त्यांना एकदम हलके वाटले. सारे मनावरचे दडपण निघून गेले. महाराजांना त्रिवेदींनी १० धड्यांमध्ये मानसशास्त्र शिकवले, विशेषतः राजकारणाशी संबधित असलेले. एकदा महाराजांनी त्यांना विचारले की, ''प्राध्यापक महाशय, मी बराचसा गुजराथी साहित्याचा अभ्यास केला आहे. त्यात माझ्या काही अडचणी आहेत, त्या तुम्हाला विचारू का?''

''विचारा ना.''

''सर्वांत चांगला कादंबरीकार कोण?''

''गोवर्धनराम त्रिपाठी. त्यांचे 'सरस्वतीचंद्र' एकदम प्रसिद्ध आहे.''

''पण सौराष्ट्रामधील राजांची त्यात खूप निंदा आहे, हे खरे ना?

''होय, महाराज साहेब'' (Dr. J. M. Mehta, Maharaja Sayajirao centenary Commemmovation volume, p.36).

''आणि सर्वात चांगले गुर्जर कवी?''

''१८५७ नंतरचे प्रसिद्ध कवी म्हणाल, तर २४ वर्षांचे नर्मद आणि ३७ वर्षांचे दलपतराम.''

''पण आजच्या मुलांना ते देश स्वतंत्र करण्यासाठी स्फूर्ती देऊ शकतील का? त्यांच्यासमोर आदर्श उभा करू शकतील का?''

''नाही. नर्मद कवीने १८५७ च्या वीरांना १८६६ मध्ये श्रद्धांजली अर्पण केली आहे.

''राजवंशी ते खरो, खरो खटपटियो न्हानो, गुप्त रहिने कार्या, जीवसट्टांना कामो।

हुं ना मानुं, घणे वेशे देखायो, रणजोद्धो प्रख्यात, तातिया टोपी टेको।

बलिहारी छे ग़ांऊ, झांशीनी राणी तूंने, कयूं पराक्रम वीर, तूंचि छे जस हिंदूने॥''

(ते खरे राजपूत, प्रसिद्ध रणवीर, तात्या त्यांचा सेनानी, त्यांची आरती मी गातो, झांशीची राणी, तू खरी पराक्रमी, तू आमच्या हिंदूंचा ध्वज उंच राखलास!)

हा अपवाद झाला. तो जास्त गाजला इंग्रजभक्त आणि प्रेम-शौर्याचा कवी म्हणून. त्याने देशी राजांना असे समजावले आहे की, "इंग्रज येथे व्यापार करण्यासाठी आले. आपल्याला राज्य करता येत नाही, म्हणून इंग्रज सत्ताधीश झाले. ज्या दिवशी आपण राज्य करावयास लायक होऊ, त्या दिवशी ते आपल्याला सत्ता सोपवून निघून जातील. समजा ते गेले नाहीत, तर इंग्लंड सोडून येथेच स्थिरावतील आणि मोगलांप्रमाणे तन, मन आणि धन देऊन, भारतीय होऊन राहतील."

"हा आशावाद तुम्हाला कितपत पटतो?"

"जराही नाही. मुलांसमोर ही कल्पना मांडणे पाप आहे."

"आणि दलपत?"

"तो तर इंग्रजांचा उघडउघड भाट होता. त्याला 'गुजराथ व्हर्नाक्यूलर सोसायटी' सारख्या मातब्बर संस्थेचा पाठिंबा होता आणि फोर्ब्स साहेबां-सारख्यांचा राजाश्रय होता. समाजसुधारकापेक्षा ते इंग्रजांचे भाट म्हणून जास्त प्रसिद्ध होते. इंग्रजांना ते 'भारताचा तारणहार' समजत. 'बुद्धिप्रकाश' मध्ये इंग्रजी राज्याची भाटगिरी करणारी एक लेखमाला त्यांनी लिहिली. त्यामध्ये त्यांनी लिहिले, "हिंदुस्थानामध्ये महंमदिये आले आणि हिंदू धर्माचा नाश सुरू झाला. इंग्रज गेले, तर आपल्याला पुन्हा महंमदियांच्या राज्यामध्ये जावे लागेल. ते आपल्याला परवडेल का? बंगालच्या सैन्याला कुठली अवदसा आठवली आहे, ते कळत नाही."

"ही तर गुलामी मनोवृत्ती झाली ?"

"तिचाच तर त्यांनी प्रसार केला. तात्या टोपे यांनी पंचमहालमध्ये प्रवेश केला. त्यास विरोध करणारे काव्य त्यांनी रचले – "पेठो पंचमहलमां, तात्यो करीने कोप, अळगो करयो, तात्ये खोई तोप।

भडकाथी भडको मरे, करे वधारी वात। गप्पा चले गोठवी, जों गांडी गुजराथ॥

१ नोव्हेंबर १८५८ रोजी म्हणजे त्यांच्या मृत्यूच्या २२ दिवस आधी त्यांनी एक प्रदीर्घ कविता लिहिली.

"देसमें आनंद भयो, जे जे व्हिक्टोरिया।

ब्रह्म दयाथी आज, अवसर रूडो आवियो।

रहेशे सहुनी लाज, थयुं राज शुभ राणीनुं।

पाडे पुरी आश, राणी ते व्हिक्टोरिया॥" (दिव्यभास्कर (गुज०), १० डिसेंबर २००६, महेफिल, पृ० ४).

(''पूर्वीच्या राजांपेक्षा इंग्रजांनी विद्या, कला आणि व्यापार वाढवला. लूटमारी करणारे चोर आणि दगाखोर कमी झाले. प्रजेच्या हिताची कामे होऊ लागली. शिक्षणाचा दर्जा वाढला. राणीसाहेबांचे राज्य असेच वाढत राहो.'')

''पण तुम्हाला हे कितपत पटते?''

''लोकांना ते कधीच पटणारे नव्हते, ते मला कोठून पटणार?''

''प्रोफेसर, आपल्या राज्यामध्ये आपण मुलांना असे काही शिक्षण दिले पाहिजे की, त्यांचे स्वत्त्व जागृत झाले पाहिजे. स्वधर्म आणि स्वदेश यांच्याविषयी ममत्व वाटले पाहिजे.''

**२. गुजराथी साहित्य परिषद** – बडोदा येथे भरलेल्या गुजराथी साहित्य परिषदेत ते म्हणाले – ''आपल्या भोवती राहणारे लोक आणि त्यांचे जीवन हे आपल्या वाङ्मयाचा उत्कृष्ट विषय होण्यासारखे आहे. म्हणून माझे आपणास सांगणे आहे की, आपल्या भोवतालच्या लोकांच्या जीवनाचे आपण निरीक्षण करावे, त्याचे मनन करावे आणि लोकांचे जीवन सुधारण्याचा मार्ग शोधून काढावा. त्यामध्ये ग्रामीण भागातील लोकांच्या जीवनाचाही विचार करावा. सध्याच्या तरुण पिढीला अत्यंत स्फूर्तिदायक होणारे वाङ्मय म्हणजे यशस्वी माणसांची चरित्रे होत. कित्येक स्त्री-पुरुषांनी आपली आयुष्ये अशा रीतीने सार्थकी लावली आहेत की, त्यामुळे त्यांच्या समाजाचे आणि राष्ट्राचे कल्याण झालेले आहे. पुष्कळ वेळा असे स्त्री-पुरुष वाचकांप्रमाणेच सामान्य लोक असतात. त्यामुळे हे लोक वाचकांना राजाप्रमाणे अथवा श्रीमंत लोकांप्रमाणे दूरचे वाटत नाहीत. म्हणून त्यांच्याप्रमाणे चांगली कृत्ये करून, आपले आयुष्य उन्नत्त करण्याची स्फूर्ती त्यांच्या चरित्रामधून सामान्य वाचकांना होऊ शकते.''

**३. गुजराथी ग्रंथ प्रसिद्धी** – १८९४ मध्ये सयाजीराव एकतीस वर्षांचे होते. त्या वर्षी त्यांनी पुढील गुजराथी ग्रंथ प्रसिद्ध केले – (१) मणीशंकर भट्टकृत इजिप्त, (२) छगनलाल ठाकूरदास मोदीकृत 'राजधर्म', (३) क्रीडामालेमध्ये नऊ पुस्तके, उदाहरणार्थ 'झेलचेंडू' (लॉन टेनिस), 'पाट' (बिझीक), वगैरे (४) रामकृष्ण हर्षजी शास्त्रीकृत 'नीतिवाक्यामृत' आणि (५) प्रो० मणीलाल नभुभाई द्विवेदीकृत सात भाषांतरित पुस्तके, उदाहरणार्थ 'तर्कभाषा', 'भोजप्रबंध', 'शिशू शिक्षण' वगैरे.

### इ) मराठी

**१. मराठी साहित्य** – १८७५ मध्ये सयाजीरावांच्या हातांमध्ये राज्याचे अधिकार येताच त्यांनी आपल्या राज्यामध्ये गुजराथी आणि इंग्रजी यांच्याबरोबर त्यांची मातृभाषा असलेली मराठी, तिचे साहित्यिक आणि साहित्य यांना राजाश्रय

देऊन त्यांची जोपासना करण्याचे नक्की केले. ते स्वतः साहित्यप्रेमी होते आणि त्यांना उपजत दूरदृष्टी लाभली होती. देशीविदेशी साहित्यिक त्यांच्या परिचयाचे असल्यामुळे त्यांच्याभोवती सदैव कवी, लेखक, विवेचक, टीकाकार, तत्त्वज्ञानी, मुत्सद्दी आणि देशभक्त यांचा गराडा असे. त्यांच्या साहित्यप्रेमाविषयी आणि त्यांनी प्रेरित केलेल्या साहित्यकृतींवर एक मोठा ग्रंथ लिहिता येईल. पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे अगदी थोडक्यात महाराजांनी राजाश्रय दिलेले निवडक आणि महत्त्वाचे लेखक आणि त्यांच्या साहित्यकृती खाली देत आहे.

१) **धर्म आणि तत्त्वज्ञान** – (अ) **वासुदेवानंद सरस्वती (१८५४-१९१४)** – नर्मदातीरी गरुडेश्वरी त्यांनी संस्कृत आणि मराठी भाषेमध्ये 'दत्तपुराण', 'गुरुसंहिता', 'द्विसहस्र त्रिशतकीकाव्य', 'दत्तचंपू', 'शिक्षात्रयम्', 'दत्तमाहात्म्य', 'सप्तशती गुरुचरित्रसार', 'माघमाहात्म्य', 'दत्त लीलामृताब्धिसार' इत्यादी दत्त संबंधित भक्तिपूर्ण पद्य आणि गद्य ज्ञानकोश निर्माण केले. (आ) **रंग अवधूत तथा पांडुरंग वि० वळामे (१८९८-१९६८)** – नर्मदेच्या किनाऱ्यावर नारेश्वर या क्षेत्री राहणाऱ्या या ब्रह्मचाऱ्यांनी 'श्रीरंगहृदयम्', 'रंगतरंग', 'श्री गुरुलीलामृत', 'अवधूती आनंद' वगैरे संस्कृत, मराठी, गुजराती आणि हिंदी काव्यरचना अमर केली आहे.

(२) **समाजशास्त्र आणि नीतीशास्त्र** – (अ) दाजी नागेश आपटे – 'सुधारणा आणि प्रगती', 'पार्लमेंट नीतीशास्त्र प्रबोध' वगैरे. (आ) विष्णू पांडुरंग नेने – 'भारतीय शासन पद्धती', 'अर्वाचीन मराठी साहित्य', 'प्रगती पंथे वडोदरा' वगैरे, (इ) रामचंद्र रा० पवार – 'नागरिकांची कर्तव्ये', (ई) चिं० वि० जोशी आणि चिमणराव मालिका', 'इंग्रजी शिष्टाचार' (उ) नानासाहेब शिंदे – 'मराठा समाजातील काही घातक चाली', (ऊ) वि० पां० दांडेकर : 'भारतीय समाजस्थिती', (ए) गो० स० सरदेसाई – 'राजधर्म' (१८९०) (ऐ) बा० पां० वर्तक – 'बालधर्म'. (ओ) गो० वि० देव – 'विदूरनीती' (भाग ४) (क) ग० रे० दंडवते – 'प्रगती', सुलभ शिक्षण' (ख) ना० धो० खांडेकर – 'नीती वाक्यामृत', (ग) वा० म० जोशी – 'नीतीशास्त्र प्रवेश'

(३) **विज्ञान, तंत्रशास्त्र आणि कुशल कला** – (अ) रा० शं० गुसे – 'गजपरीक्षा', (आ) वि० गो० चिपळूणकर – 'हिंदुस्थानातील सर्प', (इ) गो० रा० तांबे – 'आरोग्य आणि आहार', (ई) द० रा० जोगळेकर : 'आरोग्य आणि आहार', (उ) बा० कृ० मोडक – 'पदार्थ विज्ञान', (ऊ) भा० कृ० भाटवडेकर – 'वनस्पतीशास्त्र', (ए) मो० के० दामले – 'सृष्टीशास्त्र'.

**(४) व्यायाम आणि क्रीडा** – (अ) राजरत्न माणिकराव तथा गजानन य० ताम्हणे (१८७८-१९५४) – 'व्यायाम मंदिर', 'शारीरिकशास्त्र', 'मालीश', 'संघ व्यायाम और बोधकपत्र', 'व्यायामशास्त्र अने महाराज', 'प्रताप शस्त्रागार', 'काही ऐतिहासिक शस्त्रे'. (आ) दत्तात्रेय चि० मुजुमदार (१८८२-१९६४) – 'व्यायाम मासिक', 'व्यायाम कोश' (१० खंड) आणि 'एनसायक्लोपिडीया ऑफ इंडियन फिजिकल कल्चर'. (इ) रामराव मा० भांबुरकर – 'दीर्घायु कसे व्हावे?'

**(५) संगीत** – ग० पी० वसईकर – 'सनईवादन पाठमाला'.

**(६) क्रीडा** – रा० स० आठवले यांची 'क्रिकेट', 'बिलियर्ड', 'टेनिस' वगैरे खेळांवरील पुस्तके.

**(७) पाकक्रिया** – ना० रा० कदम –' पाक शिक्षण', 'बंगाली पदार्थ', 'भोजन दर्पण', 'सयाजी पाक रत्नाकर', वगैरे.

**(८) चित्रकला** – ग० भ० वैद्य : 'चित्रविद्या'.

**(९) प्रवास** – लक्ष्मणराव माने – 'काश्मीरचे सौंदर्य' (१९०३); द० चिं० मुजुमदार – 'युरोपचा प्रवास'. जन० नानासाहेब शिंदे – 'माझा युरोपचा प्रवास'.

**(१०) इतिहास, भूगोल आणि चरित्रे** – (अ) का० र० कीर्तीकर – 'रशिया'. कृ० अ० केळुस्कर – 'फ्रान्स'. सा० कृ० धोंडे – 'ग्रीस'. गो० स० सरदेसाई – 'इंग्लंड, ग्रीस आणि हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास'. भा० ना० पंडित – 'बडोदे राज्याचा बाळबोध इतिहास' (१९१५) सी० वा० पेंडसे – 'बडोद्याचा इतिहास' (१९१९) 'संस्कृत साहित्याचा इतिहास'. जन० नानासाहेब शिंदे – 'हिंदुस्थानचा लष्करी इतिहास'. 'मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया'. (आ) वि० वि० परांजपे : 'बडोद्याचे राज्यकर्ते' (१९०६) गो० स० सरदेसाई, 'नानासाहेब पेशवे', 'पुण्यश्लोक सयाजीराव गायकवाड यांचे जीवनचरित्र', 'महाराष्ट्राची मराठी राजवट', 'सयाजीरावांच्या सहवासात'. (इ) वि० स० लिमगावकर – 'नरसिंह मेहता', रा० भा० भांबुरकर – 'समर्थ रामदास', 'भगवान बुद्ध'. सी० बा० पेंडसे – 'छत्रपती शिवाजी महाराज', द० ना० आपटे – 'मीराबाई', ज० र० आजगावकर – 'संतशिरोमणी ज्ञानदेव', 'एकनाथ', 'नामदेव'.

**(११) निबंध, नाटक आणि कादंबऱ्या** – (अ) भगवंतराव पाळेकर – निवडक निबंध (१९१४), डॉ० वि० पा० दांडेकर – न० चिं० केळकरांची सहा नाटके, 'फेरफटका', 'टेकडीवरून' वगैरे, ज्ञानरत्न रा० भा० भांबुरकर – 'पं० जगन्नाथ', 'भामिनी', 'चंद्रिका', 'चंद्रकाताची चटकचांदणी' इत्यादी नाटके, चिं० ना० मुजुमदार – 'सादृश चमत्कार' (नाटक) इत्यादी कादंबऱ्या.

(१२) **काव्य** – (अ) दत्त तथा दत्तात्रय कोंडो घाटे (१८७५-१८९९) – 'विश्वामित्रीच्या काठी', 'लक्ष्मीविलास राजमंदिर मनोरा', (आ) चंद्रशेखर गोऱ्हे (१८७१-१९३७) – 'चंद्रिका', 'किस्मतपूरचा जमीनदार', 'उघड गुपित', 'रंगराव ईर्षे', 'चिंतोपंत उदास', 'गोदागौरव', 'काय हो चमत्कार'. (इ) माधव ज्युलियन तथा माधवराव पटवर्धन (१८९४-१९३९) – 'विरहतरंग', 'सुधारक', 'गज्जांजली', 'स्वप्नरंजन', 'तुटलेले दुवे', 'नकुलालंकार', 'मधुलहरी', 'उमर खय्यामकृत रुबाया', 'छंदोरचना' इत्यादी. (ई) यशवंत तथा य० दि० पेंढरकर (१८९९-१९८५) – 'यशवंती', 'इंदुकला', 'यशोधन', 'भावमंथन', 'जयमंगला', 'बंदीशाला', 'यशोगंधा', 'मोतीबाग' इत्यादी.

(१३) **नियतकालिके** – (अ) गो० बा० जोशी – 'प्रवासाची हकीकत' (१८७५), (आ) कृष्णराव मराठे – 'बडोदा वत्सल' (१८८४), (इ) दामोदर सावळाराम यंदे – 'सयाजी विजय' (१८९३, द्विभाषिक, (पुढे 'लोकसत्ता-जनसत्ता'मध्ये विलीन), (ई) आबासाहेब मुजुमदार – 'व्यायाम' (१९१५), (उ) भगवंत ब० पाळेकर – 'जागृति' (१९१६), (ऊ) शं० मो० रानडे, दि० ब० समर्थ संपादित 'सद्विचार' (१९२२), (ए) ग० र० दंडवते – 'भारत नियतकालिक' (१९१५) व 'महाराष्ट्र नियतकालिक दीपिका' (१९२२), (ऐ) वसंतराव कमान : 'कमान', (ओ) 'विविध कलाविस्तार' (१८८५), 'धनुष्य' (१८८५), 'बालांकूर' (१८९४), 'धंदेशिक्षण', 'कलाशिक्षण', 'रसिक विहार', 'विचारसागर', 'पुढारी', 'फत्तेसिंग गॅझेट', 'चंद्रशेखर' इत्यादी.

२) **महाराष्ट्र साहित्य परिषद** – बडोदा येथे भरलेल्या या सभेचे वर्णन काय करावे? सरदेसाई लिहितात, ''सन १९०९ च्या दसऱ्यास (२४ ऑक्टोबर) महाराष्ट्र साहित्य संमेलनाची बडोद्यास बैठक झाली. ती तीन दिवस इतकी गाजली की, तसा विद्वत्‌विचार क्वचितच कमी अनुभवास येतो. तिचे मुख्य चालक रमेशबाबू असून मी त्यांचा स्थानिक सेक्रेटरी होतो. एवढे यशस्वी संमेलन, इतके थोर पुरुष केवळ राष्ट्रप्रेमाने एकत्र आल्याचे दुसरे उदाहरण मिळणार नाही. डॉ० किर्तीकर व डॉ० भांडारकर हे दोघे अध्यक्ष होते; हरप्रसादशास्त्री, मदनमोहन मालवीय, जदुनाथ सरकार असे नाना प्रांतांचे विद्वत्वर्य तीन दिवस एकत्र जमून महाराज राष्ट्रसंघटना घडवतात. हा स्वातंत्र्ययुद्धातला पहिला डाव, असे त्या वेळी सर्वांना वाटले. संमेलनाचे वेळी लोकमान्य टिळक मंडालेस कैदेची हवा उपभोगीत होते. पण त्यांचे दोन चेले खाडिलकर व केळकर यांनी आपल्या उज्ज्वल वाणीने त्या प्रसंगी टिळकांची जागा उत्कृष्ट भरून काढली. संमेलनातले उद्घाटनाचे भाषण सव्वा तास रमेशचंद्रांनी केले. ते अद्यापि माझ्या कानात ठळकपणे दुमदुमत आहे. 'राष्ट्र म्हणजे

काय, आपण परचक्रात सापडलो आहोत, त्यातून सुटकेचा मार्ग इतिहास काय दाखवितो', हे दत्तांचे उद्गार ऐकून सर्व सभा मंत्रमुग्ध बनली. एक स्त्री काशीबाई कानिटकर त्या दिवशी अर्धा पाऊण तास बोलल्या. त्या भाषणाने सर्वांचे नेत्र ओलेचिंब झालेले लोकानी अनुभवले.'' (सरदेसाई गो० स०, सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात (पृ० २७-२८). मात्र इंग्रजांच्या हेरांनी वर कळवले, ''१८५७ नंतर अर्धशतकानंतर मराठी ब्राह्मणांनी पुन्हा उठावाची तयारी करण्याचा चंग बांधला आहे. काही व्यक्तींवर विशेष नजर ठेवणे जरूर आहे (Ibid p. 28-29).

**३) मराठी वाङ्मय परिषद** – महाराजांनी वाङ्मय म्हणजे काय, ते त्यांच्या श्रोत्यांना सांगितले आणि त्याच्याशी संबंधित चार प्रश्न हाताळले – ''त्याच्या अस्तित्वाची गरज, त्याच्या निर्मितीचा हेतू, वाङ्मयावर कशाचा व कसा परिणाम होतो आणि वाङ्मयाचे सूत्रचालन किंवा नियंत्रण कसे होते. ''आपले सारे प्राचीन वाङ्मय पद्यमय का होते? कारण तेव्हा काही गोष्टी स्मरणात ठेवायची जरूर भासू लागली. गद्य हा नंतरचा अवतार आहे. मुद्रणकलेने गद्यलेखनास वेग आला. त्यामुळे विद्येच्या पुनरुज्जीवनाची चळवळ सुरू झाली. मुद्रणयंत्राने ज्ञानदानाचा मक्ता भिक्षुक वर्गाच्या हातून हिसकावून घेऊन, ज्ञानदानाचे कार्य खैरातीप्रमाणे समाजाच्या सर्व स्तरात वाटले गेले. वाचनसमर्थ झालेली जनता आता स्वतःची वाचनाची भूक शमेपर्यंत कोलाहल करत राहणार आणि ती भूक शमविण्याचे सामर्थ्य फक्त अतःपर धंदेवाइक लेखकांच्याच अंगी राहणार. आजचे वाङ्मय निर्माते धंदेवाईक लेखक बनले आहेत. ते गिऱ्हाईकाला हवा तो माल पुरवतात, नाहीतर त्यांना उपासमारीचे भय भेडसावते. लेखक गर्दीचा गुलाम होतो. ही झाली युरोपची स्थिती. उद्या ती आपल्याकडे येणारच आहे. ह्या परिस्थितीचा परिणाम आपल्या जनहितासाठी कसा करवून घ्यायचा, ते आपल्या विचारवंतांचे काम आहे'' (१८ डिसेंबर १९३२ रोजी म० वा० परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाच्या उद्घाटनाच्या भाषणातून).

दुसऱ्या प्रसंगी त्यांनी तरुणांना पुढीलप्रमाणे उपदेश केला. ''वृत्तपत्रांच्या चर्चाविषयांचा विचारही तुम्ही करत असाल व स्वतःची मते स्वतः बुद्धी चालवून बनवीत असाल, अशी मला आशा आहे. दुसऱ्यांची मते डोळे मिटून तुम्ही स्वीकारू नयेत. तुमचा तुम्ही स्वतंत्रपणे विचार करावा. विशेषतः तुमच्या हित-अहिताचा प्रश्न असेल तेव्हा'' (२८ जानेवारी १९३३ रोजी बडोदा कॉलेजच्या सुवर्ण महोत्सवा-निमित्त केलेल्या भाषणातून).

**४) सहविचारिणी सभा** – दोन महायुद्धांमधील विश्रांतीचा काळ वाङ्मयीन दृष्ट्या निर्मितीचा, स्थैर्याचा आणि संपन्नतेचा होता. बडोद्यामध्ये काव्य, शास्त्र

आणि विनोद यांना बहर आला होता. मराठी मंडळींनी एकत्र येऊन चिं० वि० जोशी यांच्या नेतृत्वाखाली 'सहविचार' नावाचे मासिक सुरू केले होते. ''महाराज आहेतच आपल्या पाठीमागे, आपल्याला ददात कसली आहे?'' असा विचार त्यांनी केला असला पाहिजे. ती गोष्ट बहुधा सयाजीरावांच्या कानी गेली असावी. सयाजीराव भलतेच व्यवहारी होते. सहविचारिणी सभेची मराठी सभासद मंडळी बहुधा नोकरी करणारी होती. त्यांना सयाजीरावांनी एक बहुमोल सूचना केली. ''उपयुक्तता व प्रत्यक्ष मागणी या दोन व्यावहारिक गोष्टींचा निश्चित विचार करूनच तुम्ही आपला वाङ्मय संसार थाटत जावा. समाजातील बहुविध वर्गांचे – व्यापारी व शेतकऱ्यांसकट – लक्ष तुम्ही ज्ञानार्जनाकडे आकर्षून घेतले पाहिजे. कोणत्या मार्गाने? अर्थात त्या वर्गाच्या हितसंबंधांची उद्‌बोधक चर्चा करणारे वाङ्मय त्यांना पुरवून'' (१७ एप्रिल १९०१ च्या सहविचारिणी सभा आणि ग्रंथसंपादक मंडळी यांच्या वार्षिक समारंभानिमित्त केलेल्या भाषणातून).

५) **मराठी ग्रंथ लेखकांना आर्थिक साहाय्य** – कोणतीही कला किंवा साहित्याचे काम आर्थिक मदतीशिवाय पार पडत नसते. महाराजांनी त्यावर भाष्य करताना सांगितले, ''पूर्वीच्या काळी राजेमहाराजे हे विद्येचे प्रमुख आश्रयदाते तसेच साहित्यकृतीचे बडे ग्राहक झाले असतील; पण आज पुष्कळ प्रसंगी याच उच्च कोटीत त्यांना राहता येत नाहीसे झाले आहे. त्यांच्यापैकी पुष्कळांचे शिक्षणच सदोष झालेले असल्यामुळे, साहित्यिक विकासाची आवश्यकता कशी पारखावी हे कळणेच त्यांना मुष्कील झाले आहे. त्यांच्या सध्याच्या शैक्षणिक परिस्थितीत बदल करण्यापूर्वीच त्यांना या बाबतीत सर्रास दोषी ठरविणे अन्यायाचे होईल. तुम्हाला मदत करण्याचे काम मी सर्व प्रकारे यथाशक्ती केलेले आहे; पण इतर राजेरजवाड्यांचाही आश्रय मिळविण्याचा प्रयत्न तुम्ही केला पाहिजे. भावी कार्याची रूपरेषा आखताना या महत्त्वाच्या मुद्द्याचा स्पष्टपणे विचार तुम्ही करून घ्यावाच, असे मला वाटते'' (Ibid).

६) **दुर्मीळ मराठी ग्रंथ प्रसिद्धी** – १८९४ मध्ये सयाजीरावांनी पुढील तेव्हा अशक्य वाटणारे किंवा कोणी मराठी प्रकाशक हात लावणार नाही अशा विषयांवर सयाजी साहित्यमालेतर्फे पुढील मराठी ग्रंथ प्रसिद्ध केले.

अ) **राष्ट्रकथामाला** – पुराणिककृत 'इराण', काथवटेकृत 'कार्थेज', पावगीकृत 'तुर्कस्थान', केळुस्करकृत 'फ्रान्सचा जुना इतिहास', आठवलेकृत 'स्पॅनिश मूर लोक', बेलवलकरकृत 'जर्मनी', सीताराम गायकवाडकृत 'असिरीया', विनायक कोंडदेव ओककृत 'रोम', सर्जन मेजर कीर्तीकरकृत 'रशिया'.

**आ) महाराष्ट्र ग्रंथमाला** – गो० स० सरदेसाईकृत 'राजधर्म', उपाध्येकृत 'विचार रत्नाकर' (बेकनचे निबंध), गो० स० सरदेसाईकृत 'इंग्लंड देशाचा विस्तार', 'मार्क्स ऑरालिस बादशाहची बोधवचने', 'प्राच्य आणि पाश्चिमात्य देशांतील ग्रामसंस्था', लेलेकृत 'रोम व कार्थेज', परांजपेकृत 'गृहिणी शंका निरसन', 'घर व त्याच्या भोवतालची जागा', 'गुन्हे व त्यांची कारणे'.

**इ) पाकशास्त्र** – 'पाश्चिमात्य पाकशास्त्र' भाग १ व २, मराठेकृत 'सूप शास्त्र' ३ भाग - 'मद्रासी शाकाहारी', 'मद्रासी व इंग्रजी मांसाहारी', 'तंजावरी', 'मुसलमानी' भाग १ व २

**ई) क्रीडामाला** – आठवले कृत 'क्रोके', 'क्रिकेट', 'लॉन टेनिस', 'बिझिक', 'मुद्रापरिवर्तन', 'अंधक' (मगिंग), 'उताणा रुपाया' (पिच अँड टॉस).

**उ) भाषांतर** – खांडेकरकृत 'नीतिवाक्यामृत', इस्लामपूरकृत 'काव्य-कल्पकता'. गणेश अनंत लेलेकृत 'रोम व कार्थेज'.

**७) महाराजा सयाजीराव विश्वविद्यालय (युनिव्हर्सिटी)** – १९०० मध्ये बडोदा कॉलेजची रजत जयंती झाली. त्या वेळी केलेल्या भाषणामध्ये सयाजीरावांनी बडोद्यामध्ये एक समृद्ध आणि संपन्न विश्वविद्यालय असावे अशी इच्छा व्यक्त केली. १९११ मध्ये बडोदा कॉलेजचे प्रिन्सिपल क्लार्क, प्रो० विजेरी आणि नंदनाथ दीक्षित यांची समिती नेमून, एक योजना तयार केली. प्रो० शेषाद्री यांनी त्याची सुधारित आवृत्ती तयार केली. त्या वेळी रेसिडेंटच्या पोटात गोळा आला. त्याने अडथळे आणणे सुरू केले. इंग्रजांना सारखी अशी भीती वाटत होती की, हे विश्वविद्यालय म्हणजे राष्ट्रीय शाळेची सुधारित आवृत्ती असेल. तेथे टिळकांसारखा किंवा अरविंदांसारखा उपकुलगुरू असेल आणि या विश्वविद्यालयातून क्रांतिकारक तरुणांची सेना निर्माण होईल. त्यामुळे ती गाडी पुढे हालेना. सारखी साखळी खेचली जाऊ लागली. १९२६ मध्ये महाराजांच्या राज्यारोहणाची सुवर्णजयंती आली. महाराजांनी पुन्हा जुन्या कल्पनेला जिवंत करण्यासाठी प्रो० ध्रुव, कन्हैय्यालाल मुन्शी, डॉ० नायक आणि सत्यव्रत मुखर्जी या पाच तज्ज्ञांची समिती नेमली. त्यांनी पुन्हा एक योजना तयार केली. त्या वेळी पुन्हा एकदा साखळी खेचणे सुरू झाले.

सयाजीराव गेले आणि त्यानंतर प्रतापसिंह गादीवर आले. काळ बदलला होता. इंग्रजांना त्यांची कुवत माहीत होती. त्यामुळे इंग्रजांचे अडथळे आणणे बंद पडले होते. प्रतापसिंहांनीं १९४७ मध्ये पुन्हा एकदा कन्हैय्यालाल मुन्शी यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती (कमिशन) नेमली आणि १९४९ मध्ये बरोडा

युनिव्हर्सिटी ॲक्ट त्यावेळचे दिवाण जीवराज मेहता यांनी पारित केला. ३० एप्रिल १९४९ पासून विश्वविद्यालयाची गाडी वेगाने धावू लागली.

थोडक्यात ब्रिटिश अधिकाऱ्यांचा विरोध विश्वविद्यालयाला नव्हता, तर सयाजीराव महाराजांना होता. महाराजांवर त्यांचा भरवसा नव्हता. महाराजांनी हार्वर्डशी किंवा बर्लिनशी सहकार साधून, साऱ्या आशियामधील हुशार तरुणांना एकत्र आणले असते आणि त्यांना आधुनिक संरक्षणशास्त्र शिकवले असते. म्हणून ब्रिटिश अधिकाऱ्यांनी विचार केला की, नकोच हा विस्तवाशी खेळ! (एके काळी बरोडा युनिव्हर्सिटीचे संभाव्य सभासद १०० टक्के मराठी ब्राह्मण होते. उदाहरणार्थ न० चिं० केळकर. डॉ० जीवराज मेहतांनी ते १०० टक्के गुजराथी केले (दिनकर द० माहुलकर यांची आठवण. त्या वेळी ते 'टाइम्स' वृत्तपत्राचे वार्ताहर होते).

एके काळी पहिल्या दहा क्रमांकामध्ये असणाऱ्या या थोर विश्वविद्यालयास लाचलुचपत, आसवाद आणि नालायक शिक्षकांना राजकीय कारणांमुळे अभय देण्याच्या वृत्तीमुळे आज ग्रहण लागण्याची वेळ आली आहे. ज्या विश्वविद्यालयाचा रजिस्ट्रार आपले घर वातानुकूलित ठेवण्यासाठी वीज चोरी करतो, ज्यांच्या मुलींच्या वसतिगृहामध्ये लैंगिक बाजार भरतो, ज्यांच्या ललितकला विद्याशाखेमध्ये (फाईन आर्टस्) हिंदू देवदेवतांची अश्लील आणि विटंबना करणारी चित्रे प्रदर्शित केली जातात, जेथे वार्षिक परीक्षांचे पेपर फुटतात किंवा विकत मिळतात, जेथील वैद्यकीय महाविद्यालयाच्या अधिष्ठात्याला प्रवेशासाठी लाच घेताना रंगे हाथ पकडले जाते अशा विश्वविद्यालयाचा भारतीय विश्वविद्यालयांच्या यादीमध्ये वरचा क्रमांक कोठून येणार? कलियुगात हे असे व्हायचेच, असे म्हणून सज्जनांसाठी 'उगी उगी राहणे' हा एकमेव मार्ग आहे.

८) **स्त्रीशिक्षण** – देवांच्या चाळीत शांताबाई हेर्लेकर आणि लक्ष्मीबाई चौधरी त्या काळी स्त्री लेखिका म्हणून बडोद्यामध्ये अग्रगण्य होत्या. शांताबाईंच्या घरी दर शनिवारी काव्यशास्त्रविनोदाची मैफल भरत असे. त्या मंडळींचे 'मनोरंजन' नावाचे मासिक निघत असे. त्यामध्ये रे० टिळक, गोविंदाग्रज, बालकवी वगैरे त्या वेळच्या नवकवींच्या कविता छापून येत असत.

। । ।

# ७



# राजकारण

**अ) राजकीय क्रांतीची शोकांतिका** – बाराव्या वर्षी म्हणजे १८७५ मध्ये सयाजीरावांचा राज्याभिषेक झाला. १८८१ मध्ये ते १८ वर्षांचे झाले असताना त्यांना राज्याचे अधिकार मिळाले. १८७६ मध्ये इंग्लंडची राणी हिंदुस्थानची महाराणी झाल्याचे त्यांनी ऐकले. १८७० मध्ये मेकॉलेचे 'भारतीय दंड विधान संहिता' (इंडियन पीनल कोड) आणि १८७२ मध्ये स्थानिक (नेटिव्ह) वर्तमानपत्रांना जाचक असा 'वृत्तपत्र कायदा' (प्रेस ॲक्ट) त्यांच्या कानी आला. १८७८ मध्ये लॉर्ड लिटनने सर्व भारतीयांना निःशस्त्र केले. त्यामुळे दक्षिण हिंदुस्थानातील बेरडांनी बंड केले. त्यांनी इंग्रज अधिकाऱ्यांना खडसावले, ''आज तुम्ही आमच्या तलवारी मागितल्या, उद्या आमच्या बायका मागाल.''

१८७९ मध्ये वासुदेव बळवंत फडके यांना जन्मठेपेची शिक्षा झाली. त्याच वर्षी नानासाहेब रशियामधून मोठी फौज घेऊन भारतावर चाल करून येणार, अशी कंडी उठली होती. त्यामुळे मुंबईतील व्यापारी गर्भगळित झाले होते. इंग्रज सरकारला न्या० रानडे यांचा वासुदेव बळवंतांशी काही तरी संबंध असल्याचा संशय आल्यामुळे त्यांची नाशिकहून धुळ्याला बदली करण्यात आली. लोक कुत्सितपणे म्हणत, ''इंग्रज हिंदी न्यायाधीशाला न्याय देऊ शकत नाहीत, तर सामान्य माणसाचे काय?'' या काळामध्ये टिळकांची लोकप्रियता वाढत होती. १८८१ मध्ये त्यांनी 'केसरी' सुरू केला. त्या आधी 'न्यू इंग्लिश स्कूल' काढले. १८८२ मध्ये त्यांना आणि आगरकरांना चार महिने कैदेत डांबले होते. भारतामध्ये ती पहिली राजकीय कारणासाठी तुरुंगवासाची सजा होती. १८८५ मध्ये त्यांनी 'फर्गसन कॉलेज सुरू केले. १८९६ मध्ये मोठा दुष्काळ पडला आणि १८९७ मध्ये मुंबई-पुण्यामध्ये प्लेगची साथ सुरू झाली. त्याच वर्षी रँडसाहेबाचा खून चापेकर बंधूंनी केला. गद्दारीसाठी १८९९ मध्ये द्रविड यांना त्यांनी ठार केले. एवढ्या हिंसाचाराच्या पार्श्वभूमीवर इंग्रज राजा आणि त्याचे अधिकारी आपले कोडकौतुक करून घेतच होते. १८९४ मध्ये बिहारमध्ये मोठा दुष्काळ पडला; पण प्रिन्स ऑफ वेल्स भारतात

आला म्हणून त्याचा स्वागतसोहळा, जंगी मेजवान्या आणि दिल्ली दरबार सुरूच राहिला. १८८१ मध्ये 'कारखाना कायदा' (फॅक्टरी ॲक्ट) लागू झाला. कारण, मुंबईच्या शेठियांनी बाल कामगारांना वेठीस धरून त्यांना अख्खा दिवस काम करायला लावून एवढे उत्पादन सुरू केले की, इंग्लंडचे कारखाने बंद व्हायची वेळ आली! १८८३ मध्ये इलबर्ट ठराव (बिल) पारित झाला. १८८५ मध्ये वाचाळ काँग्रेस सभासदांना वायफळ ठराव आणि अर्ज करण्यासाठी एक व्यासपीठ प्राप्त झाले. १८८९ मध्ये पुन्हा प्रिन्स ऑफ वेल्स भारतात आले.

आणखी दहा वर्षांनी लॉर्ड कर्झन भारतामध्ये 'व्हाइसरॉय' म्हणून आला. त्याने २० जुलै १९०५ मध्ये बंगालच्या फाळणीची योजना जाहीर केली. पूर्व बंगालच्या ३ कोटी १० लाख लोकसंख्येमध्ये १ कोटी ८० लाख मुसलमान होते. मुसलमानांचा आपोआप पाठिंबा कर्झनला मिळणारच होता. साऱ्या बंगालने ७ ऑगस्ट १९०५ रोजी 'सुतकदिन' पाळला. लोकक्षोभ अनावर झाला होता. लोकांना कर्झनची भेदनीती समजावून द्यायची आवश्यकता होती. आयती चालून आलेली ही संधी लोकमान्य टिळक थोडीच सोडणार होते? १५ ऑगस्ट १९०५ रोजी केसरीमध्ये 'आणीबाणीची वेळ' हा लेख लिहून टिळकांनी रणशिंग फुंकले. "इंग्रजी राज्य चालले आहे तितक्या सक्तीने हिंदुस्थानवर यावत्‌चंद्रदिवाकरौ राहील हा सिद्धान्तच ऐतिहासिकदृष्ट्या खोटा आहे... इतिहासामध्ये असे एकही उदाहरण नाही की, जेथे एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राच्या गळ्याभोवती घातलेली पारतंत्र्याची दोरी, यत्किंचितही सैल न करता, हजारो वर्षे तशीच कायम ठेवावी... शब्द नकोत, कृती हवी ... नाक धरल्याखेरीज तोंड उघडत नाही." हा विलक्षण स्फोटक लेख कलकत्ता, पाटणा, बनारस, अलाहाबाद, मद्रास वगैरे सर्व प्रमुख शहरांतील वृत्तपत्रांनी भाषांतर करून छापला! वंगभंगाच्या निमित्ताने लाल-बाल-पाल यांची त्रिमुखी दत्तमूर्ती भारताचे नेतृत्व करू लागली.

बंकिमचंद्रांच्या 'आनंदमठ' मधील 'वंदे मातरम' गीत राष्ट्रगीत ठरले. ते गायले तर राजद्रोहाखाली अटक होईल, असा हुकूम निघाला. त्या निमित्ताने टिळकांनी विदेशी वस्तूंवर बहिष्कार पुकारला. 'काळ'कर्ते शि० म० परांजपे, न० चिं० केळकर, सावरकर टिळकांच्या नेतृत्वाखाली एकत्र आले आणि दसऱ्याच्या दिवशी लकडी पुलाखाली विदेशी कपड्यांची जंगी होळी पुणेकरांनी साजरी केली. तशीच होळी नाशिक येथे झाली. फर्ग्युसन कॉलेजच्या प्राचार्यांनी – रँग्लर र० पु० परांजपे – सावरकरांवर वसतीगृह सोडून जाण्यास फर्मावले आणि त्यांना दहा रुपये दंड ठोठावला. विद्यार्थ्यांनी पैसे गोळा करून दंड भरला. परीक्षा जवळ आली असताना फर्ग्युसन कॉलेजने सावरकरांवर असा सूड घ्यावा, हे टिळकांना कसे पसंत पडणार?

१७ आणि २४ ऑक्टोबर १९०५ रोजी टिळकांनी 'हे आमचे गुरूच नव्हेत' असे दोन तेजस्वी लेख लिहिले.

जसे पुणे पेटले, तसेच कलकत्ता शहरही इंग्रजांविरुद्ध द्वेषाने पेटून उठले.

बेचाळीस वर्षांचे सयाजीरावदेखील पेटून उठले, कारण अरविंद घोष नावाचा जिवंत बाँबच त्यांच्या पदरी होता! १९०६ मध्ये टिळकांनी अरविंदांना ''कलकत्ता तुमची वाट पाहात आहे, बडोदे सोडा'', असा निरोप पाठवला. अरविंदांनी सयाजीरावांची राजधानी सोडली आणि कर्झनच्या राजधानीत पाय ठेवला. तिकडे टिळकांनी सावरकरांना लंडनच्या श्यामजी कृष्ण वर्मांकडे धाडले. टिळक देशभर इंग्रज विरोधी आग पसरवत होते. त्यात भर पडणार होती त्यांच्या हनुमानाने – सावरकरांनी त्याच्या शेपटीने लावलेल्या इंग्रजांच्या लंकेतल्या आगीची. सावरकरांच्या वानरसैनिकांनी ती आग साऱ्या युरोपभर आणि अमेरिकेत पसरवली. आता ही मंडळी इंग्लंडविरुद्ध होणाऱ्या पहिल्या महायुद्धाची शांतपणे वाट पाहात होती.

अपेक्षेप्रमाणे पहिले महायुद्ध सुरू झाले. जर्मनीने एमडेन बोट धाडून मद्रास (चेन्नई) शहरावर तोफा डागल्या. त्यामुळे पेट्रोलच्या बऱ्याच टाक्या जळून खाक झाल्या. एमडेन सावरकरांना अंदमानहून सोडण्यासाठी आली होती; पण तो प्रयत्न सफल झाला नाही. लाला हरदयाळांनी हजारो हिंदू आणि शिखांना गदर (बंड) करण्यासाठी अमेरिकेमध्ये प्रशिक्षण दिले होते. त्यासाठी जर्मनीने बरीच मदत देऊ केली होती. पण ती शस्त्रे ऐन वेळी पोचू शकली नाहीत. फेब्रुवारी १९१५ मध्ये ३,१२५ हिंदू शीख 'गदर'चा संदेश घेऊन, उत्तर भारतामध्ये फिरत होते. मीरत, जबलपूर, अंबाला आणि फिरोजपूर येथील लष्करी छावणीपर्यंत (मिलिटरी कँटोनमेंट) या गदरचा संदेश पोहचला होता.

भारतीय क्रांतिकारकांचे पुढारी रासबिहारी बोस होते. बंगालमध्ये मोठ्या प्रमाणावर तरुण क्रांतिकारकांना पकडण्यात आले होते. त्यांना काळ्यापाण्याची शिक्षा निश्चित होती. रासबिहारींच्या चमूमध्ये सचिन पिंगळे, कर्तारसिंग, भाई परमानंद, कापिले, दामोदर स्वरूप वगैरे क्रांतिकारक होते. पिंगळे यांनी भोळेपणाने मुळासिंगवर विश्वास ठेवला आणि सारी माहिती सांगितली. अमृतसरला १८५७ सारखा स्वातंत्र्ययुद्धाचा उठाव होणार होता. सारे फितवलेले सैन्य सुसज्ज होते. २१ फेब्रुवारी १९१५ ही तारीख नक्की करण्यात आली होती. त्या दिवशी भारतात कमीत कमी गोरे सैनिक हजर होते. बाकी सर्व सैनिक महायुद्धासाठी देशाबाहेर धाडले गेले होते. विजय निश्चित होता. मुळासिंग आणि बुटासिंग हे पोलीस खबरे होते. रासबिहारींनी हुकूम दिला, ''त्या दोघांना ठार करा, ते घात करतील.'' क्षमा शूरस्य

भूषणम्। रासबिहारींचा हुकूम कोणी पाळलाच नाही. कटाची बातमी इंग्रजांना कळली. त्यांनी लष्कराला सज्ज राहण्यास सांगितले. त्यांच्याजवळ लष्करातील फुटलेल्या म्होरक्यांच्या नावाची यादी होती. जेथे सरकारी कोषागार होते तेथे गोरे सैनिक गस्त घालू लागले. दिल्ली, अंबाला, मीरत, फिरोजपूर आणि लाहोर या शहरांमध्ये गोऱ्या सैनिकांनी लष्करी कवायत सुरू केली आणि काळ्या सैनिकांची शस्त्रे काढून घेतली. त्यामुळे लढणाऱ्या सैनिकांचे नीतिधैर्यच नाहीसे झाले. अमेरिकेहून आलेले गदरचे लोकसुद्धा थंडावले. अरेरे, १८५७ची पुनरावृत्ती सुरू व्हायच्या आधीच संपून गेली.

'गदर'मधील पुढाऱ्यांना पकडून तुरुंगात टाकण्यात आले. डॉ० मथुरासिंग अफगाणिस्थानमध्ये सटकले.

पहिले महायुद्ध सुरू झाल्यावर राजा महेंद्र प्रताप मार्साय मार्गाने बर्लिनला पोहचले आणि तेथून काबूलला पोहचले. १९१५मध्ये त्यांनी परदेशात (Indian Government in Exile) काबूलमध्येच भारतीय सरकारची स्थापना केली. त्यांना रशियाचा पाठिंबा होता. ७ मे १९१९ रोजी महेंद्र प्रताप आणि लेनीन यांची भेट झाली. पुढे ते जपानला गेले आणि रासबिहारी बोस यांची त्यांनी भेट घेतली. दोन वर्षे जपानमध्ये राहून १९२५मध्ये ते सानफ्रान्सिस्को येथे परतले (लोकसत्ता रविवार, ६ मे १९७९).

पिंगळे पंजाबच्या बाहेर सटकले; पण त्यांना विश्वासघातामुळे तुरुंगवास पदरी पडला. भाई परमानंददेखील पकडले गेले. लष्करी न्यायालयाने २४ जणांना फाशीची शिक्षा फर्मावली; पण सजा न मिळालेले क्रांतिकारक खुषीने नाचू लागले! ज्यांना काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावली होती, त्यांचा आग्रह होता, "आम्हाला फाशी द्या, आमचा पुनर्जन्म होईल आणि आम्ही पुन्हा इंग्रजांविरुद्ध लढू!" पिंगळ्यांना सर्वात शेवटी फाशी दिले. पिंगळे म्हणाले, "मला तुम्ही सर्वात पहिले फाशी द्यायला पाहिजे होते, कारण स्वर्गामध्ये मला या सर्वांच्या स्वागत समारंभाची तयारी करता आली असती!" (तत्रैव).

सयाजीरावांना फार वाईट वाटले. १८५७ची पहिल्या स्वातंत्र्ययुद्धाची संधी हुकली आणि आता १९१५ची विजयाची आयती चालून आलेली दुसरी संधी आमच्या बेजबाबदार नेत्यांमुळे हातातून निसटली! आता पुन्हा महायुद्ध केव्हा होणार? अशी तयारी करण्याची संधी पुन्हा केव्हा मिळणार?

अमृतसरचा कट यशस्वी झाला असता, तर युनायटेड स्टेट्स ऑफ इंडियाचे पहिले अध्यक्ष सयाजीराव गायकवाड झाले असते आणि लोकमान्य टिळकांना पहिल्या पंतप्रधानपदाचा मान मिळाला असता. अखंड भारताला स्वराज्य आणि

सुराज्य दोन्ही लाभले असते (नेने, म० पां०, निवृत्त न्यायाधीश, यांनी सांगितलेल्या आठवणीतून).

**ब) बापट प्रकरण** – रंगो बापूजींपासून टिळकांपर्यंत आणि तात्या टोपे यांच्यापासून तात्याराव सावरकरांपर्यंत सर्वांनी सयाजीरावांना एकच मुद्दा पुनःपुन्हा पटवला. आमचे स्वातंत्र्य का गेले? आम्ही धर्माचे पालन केले नाही म्हणून. म्हणजे काय? आमच्यातले काही परकीयांनी विकत घेतले म्हणून. त्याला अनेक कारणे आहेत. गरिबीपासून जाती-पातीपर्यंत, अज्ञानापासून अहंकारापर्यंत. सत्तेचे विकेंद्रीकरण, त्यामुळे फाटाफूट आणि त्यातून विनाश.

सयाजीरावांना हा मुद्दा चांगला पटला होता. त्यामुळे त्यांनी आपले धोरण आखले होते. आधी शिक्षण, त्यातून जागृती आणि त्यातून एकात्म एकसंध समाज. त्यांचे काम सोपे झाले – आता फक्त एकात्मतेस तडा कोठे पडतो आणि कोण पाडतो, त्याची उपाययोजना करणे. त्यासाठी प्रेरित झालेले जागृत देशभक्त महत्त्वाच्या स्थानी नेमणे आणि त्यांच्यावर कोणी वाईट प्रभाव पाडत नाही ना त्याची काळजी घेणे.

गुर्जर समाज संपत्ती निर्माण करणारा समाज आहे. त्याला संपत्तीसमोर इतर सर्व गोष्टी तुच्छ वाटतात. येथे म्हणच आहे, 'नाणावगरनो नाथिओ, अने नाणे नाथालाल'. मान फक्त नाण्याला. 'उत्तम शेती आणि मध्यम व्यापार', असे मानणाऱ्यांना संस्कृती आणि राष्ट्रवाद कसा शिकवावा, ही महाराजांसमोर मोठी समस्या होती. जमीन सकस. पिकांचे उत्पन्न भरपूर. कष्ट करायची भरपूर तयारी; पण त्या खेडेगावात राज्य आपले नाही, राज्य तलाठ्याचे, कारण त्याच्या हाती सर्व कागदपत्रांचा ताबा. गुजराथी म्हणच आहे 'मुलकी खातु मेलु, कलेक्टर ककडाट करे', 'मामलतदार मुंझाय, कारकून बेचारो शूं करे', 'तलाटी करे ते थाय' (महसूल खाते महाभयंकर, कलेक्टर भले कोकलू दे, मामलेदार भले ओरडू दे, कारकून भले रडू दे, सरतेशेवटी तलाठी म्हणेल तेच होणार).

कायद्याचे राज्य म्हणजे काय? कागदपत्रांचे राज्य. कागदावर जे लिहिले असेल ते अंतिम. त्याच्याच आधाराने न्यायाधीश निर्णय देणार. तलाठ्याच्या हाती अमर्याद सत्ता. अगदी 'ध' चा 'मा' करण्यापर्यंत. खेडेगावातील भ्रष्टाचाराचे मूळ या तलाठ्याच्या कचेरीमध्ये आणि खेडुताच्या अज्ञानामध्ये असते.

साक्षरतेचा अभाव, गरिबी आणि दुष्काळासारखी नैसर्गिक वा मानवी आपत्ती हे महाभयंकर रसायन आहे. कोणीही त्यामध्ये विरघळतो. गोऱ्या साहेबाने ते नेमके ओळखले होते. त्यांमुळे गोऱ्या रेसिडेंटच्या कोळ्याच्या जाळ्यात पटापट अज्ञानी, अंध सावजे सापडत. बडोद्याला बिड्डल्फ नावाचा एक गोरा महत्त्वाकांक्षी रेसिडेंट

लाभला होता. "फेअर जसा मल्हाररावांना पदच्युत करण्यात सफल झाला तसा मी या छोट्या बच्चास पदच्युत करेन," अशी त्याची प्रतिज्ञा होती. पुण्याच्या क्रांतिकारक मंडळींची आणि सयाजीरावांची गुप्तपणे भेट होते व त्यातून कटकारस्थान शिजते आणि पुण्याला मदत दिली जाते, अशी खबर बिडुल्फला त्याच्या हेरांनी दिली. बच्चा असला तरी शेर आहे, पराक्रमी आहे आणि तो आपल्याला पुरून उरेल, अशी बिडुल्फला कल्पना नव्हती. बापट प्रकरण त्यातून जन्मले. सयाजीराव खंबीर गडी म्हणूनच त्यातून वाचले, नाही तर त्यांची गच्छंतीच केली असती या सर्वशक्तिमान बिडुल्फसाहेबाने.

आधीच्या गायकवाडांनी औरस, अनौरस आणि लाडक्या मंडळींना फुकट जमिनी वाटल्या होत्या. त्यामुळे राज्याची आवक कमी झाली होती; पण आपापसांतील तंटेबखेडे वाढले होते. या मालकांवर कर आकारून राज्याची आवक वाढवण्याचे महाराजांनी ठरवले. त्यांना त्यासाठी योग्य हिंदी माणूस मिळत नव्हता. म्हणून एके काळचे आपले शिक्षक इलियट सर यांनाच त्यांनी विनंती केली, "गोऱ्या साहेबांचे लोक ऐकतात. यातील बरेच लोक माझ्या आडनावाचे आहेत. ते कोणाचेच ऐकत नाहीत. त्यांचा हा प्रश्न आपण हाताळावा." त्यांनी ते आव्हान स्वीकारले. त्यांचा दुय्यम अधिकारी म्हणजे बापट. हा बापट टिळकांच्या 'केसरी'मध्ये बडोद्याच्या शासनावर टोपण नावाने लेख लिहीत असे. निर्व्यसनी, शुद्ध चारित्र्याचा, स्वच्छ पण स्पष्टवक्तेपणाचा दुर्गुण असणारा. त्याचे आणि इलियटसाहेबांचे चांगले जमायचे, कारण दोघेही समान आवडीनिवडीचे होते.

कोणत्याही भांडणाची सुरुवात कोणते तरी खुसपट काढून करायची असते. इंग्रज सरकारला राजा-महाराजांनी युरोपला जाऊन तेथील चांगल्या गोष्टी म्हणजे सुधारणा, आपल्या राज्यामध्ये लागू कराव्यात असे वाटे. बिडुल्फने उलटेच खुसपट काढले. महाराज सारखे युरोपातच असतात. त्यांनी बडोद्यामध्ये राहावे आणि प्रजेचे हित सांभाळावे. १८९२-९३ मध्ये आठ महिने, त्यातील १८९२ मध्ये सहा महिने आणि १८९५ पर्यंतच्या काळात सलग चौदा महिने सयाजीराव बडोद्याच्या बाहेर होते. कदाचित हेरांनी लोकमान्य टिळकांना सयाजीराव खूप मानतात, त्यांचा 'केसरी' नियमितपणे वाचतात वगैरे गोष्टी बिडुल्फसाहेबाला सांगितल्या असाव्यात! सयाजीरावांना कोठलेच व्यसन नाही, तर मग सयाजीराव युरोपात काय करतात, हाही त्याला प्रश्न पडला असावा!

बापट मोठे हुशार आणि चोख अधिकारी होते. त्यांनी इलियटसाहेबाला साऱ्या फुकट्या सरदारांच्या जमिनींचे कागदपत्र दाखवले. त्यावर कर आकारणी कशी करता येईल, त्यामुळे महसूल कसा वाढेल आणि राज्याचा कसा फायदा होईल ते

पटवले. हुशार अधिकाऱ्यांची बदली करवून घ्यायची असेल तर हा लाचखोर आहे, गरिबांना नाडतो वगैरे आरोप वर्तमानपत्रांमधून छापवून आणून त्या अधिकाऱ्याची बदनामी करायची. तसे या चिडलेल्या जमीनदारांनी केले. तशा तक्रारी दिवाणाकडे पाठवल्यासुद्धा. मणीभाई जसभाई पटेल नावाचे दिवाण पूर्वी या रेसिडेंटकडे कामाला होते. जुन्या मालकाच्या (बॉस) विरुद्ध – तेही गोऱ्या – हा पटेल कसे काय जाणार होता? दुर्दैवाने, बापट आणि मणीभाईंचा काही कारणावरून खटका उडाला. त्यामुळे रेसिडेंट आणि मणीभाई दिवाण यांनी बापटांविरुद्ध खुसपटे काढायला सुरुवात केली. तेवढ्यात इलियटसाहेब रजेवर गेले आणि त्यांच्या जागी मेकोनिकी नावाचा एक गोरा साहेब नेमला गेला. बिडुल्फ, मणीभाई आणि मेकोनिकी एकत्र आले आणि लाच खाल्ल्याच्या आरोपावरून बापट यांना अचानक निलंबित केले. एवढेच नाही तर बापटांच्या मागे गुप्त पोलिसांचा ससेमिरा लावून दिला.

बापटांना त्यांचे भवितव्य दिसू लागले. इलियट आणि महाराज दोघेही युरोपमध्ये. येथे तर आपले शत्रूच शत्रू. हे तिघे आपली चटणी करणार, याविषयी त्यांची खात्री झाली. एका मित्राला स्टेशनवर निरोप द्यायला जात आहोत, असे नाटक करून गाडी सुरू होताच बापट चालत्या गाडीमध्ये पटकन शिरले. त्यांच्या पाठीवर असणाऱ्या सीआयडींना कळेना, आता काय करावे? पंछी तो उड गया! बापट पुण्याला गेले, टिळकांना भेटले आणि त्यांनी बडोद्याला एका युरोपीय डॉक्टरांचे वैद्यकीय प्रमाणपत्र पाठवून दिले. मणीभाई आणि बिडुल्फ हात चोळत बसले. कारण, प्रमाणपत्राबरोबर पत्रामध्ये बापटांनी लिहिले होते, "मनःस्वास्थ्य ठीक नसल्यामुळे येऊ शकत नाही. या संदर्भात आपण माझे वकील बाळ गंगाधर टिळक यांच्याशी पत्रव्यवहार करावा" (करंदीकर, अ० ज०, क्रांतिकारक टिळक, पृ० २८८-८९).

अपेक्षेप्रमाणे टिळकांचे नाव वाचताच बिडुल्फ आणि मेकोनिकी चपापले. याचा अर्थ बडोद्याच्या शासकीय लढाईचे रूपांतर राजकीय महायुद्धात होणार! महाराजांना बापटांविषयी खात्री होती. बिडुल्फ मणीभाईंच्या मदतीने गुजराथी आणि मराठी लोकांमध्ये भांडण लावून देत आहे, असे त्यांना मिळालेल्या पत्रातून समजले होते. पळून गेलेल्या बापटांविरुद्ध या त्रिकुटाने बापट यांच्या अनुपस्थितीत एक चौकशी समिती बसवली. सरकारतर्फे नामांकित वकिलांची फौज होती. तिचे नेतृत्व फिरोजशहा मेहता यांनी स्वीकारले; पण हा दावा (केस) रेसिडेंटने खोडसाळपणे उभा केला आहे, बापट निमित्त आहेत, खरे लक्ष्य सयाजीराव महाराज आहेत, हे ध्यानात आल्यावर त्यांनी वकीलपत्र मागे घेतले. सारी महत्त्वाची कामे बाजूला ठेवून

बडोद्याला येऊन टिळकांना राहावे लागले. टिळकांचे बडोद्यामध्ये चार महिने फुकट वाया गेले. त्यांनी साक्षीदारांच्या उलटतपासणीमध्ये ते कसे बनावट आहेत, ते दाखवले. त्यामुळे सरकारी बाजू लंगडी पडली.

महाराजांनी मणीभाई दिवाणांना कळवले, रेसिडेंटची राज्याच्या अंतर्गत शासनामध्ये ढवळाढवळ खपवून घेऊ नका. मणीभाई इंग्रजधार्जिणे होते, त्यांना स्वाभिमान नव्हता. ते चूप बसले.

बापट लाच खातात, असे सिद्ध होईना. गुजराथी आणि मराठी लोकांमध्ये वाद निर्माण करणाऱ्या मणीभाईंना सयाजीरावांनी निवृत्त व्हायला भाग पाडले. त्याआधी मणीभाईंना बापट यांना बडोदे राज्याची चांगली सेवा केल्याबद्दल प्रशस्तिपत्रक देण्याची महाराजांनी विनंती केली. १८९५ मध्ये बापट सेवामुक्त झाले. त्यांचे दरमहा १५० रुपयांचे निवृत्तीवेतन सुरूच राहिले होते. गुप्तपणे महाराजांनी त्यांना एक मोठी रक्कम बक्षीस म्हणून देऊ केली. न० चिं० केळकरांनी टिळक चरित्रामध्ये लिहिले, "अकटोविकटो प्रयत्नांती, कर्नल बिड्डुल्फच्या जाळ्यातून इलियट आणि सयाजीराव हे मोठे मासे निसटलेच! जाळ्यात कसाबसा अडकला, दोन पक्षांना मारण्यासाठी हाती घेतलेला दगडरूपी छोटा मासा! बापट!" पण तोही सटकला.

**क) सावरकर आणि सयाजीराव**

सावरकर आणि बडोदे यांचे अतूट नाते होते. नाशिकला सावरकरांच्या पोरांना घोडेस्वारी शिकवण्यासाठी माझ्या आजोबांनीच इब्राहीममियास धाडले होते. ते (तात्या नेने) सयाजीरावांचे पी० ए० होते. गंमत ही की, त्याची राहण्याची आणि जेवणाची सोय सावरकरांच्या घरामध्येच केली होती आणि तरीही सावरकर जातीयवादी! लंडनमध्ये सयाजीरावांचा मुक्काम असेल, तेव्हा सावरकर आणि सयाजीराव यांच्या गुप्त बैठकी ठरलेल्या. श्यामजी कृष्ण वर्मा आणि सयाजीराव या दोघांची इंग्रजी शिक्षणामुळे भारतीय विद्यार्थ्यांवर चांगले संस्कार होतात आणि ते इंग्लंडचे भारतावर मोठे उपकार आहेत, अशी दृढ समजूत होती. सावरकरांनी 'इंडिया ऑफिस'च्या ग्रंथालयामध्ये बसून मॅक्समुल्लर आणि मेकॉले यांचे खरे हेतू काय होते, ते शोधून काढले आणि या दोघा श्रेष्ठींना दाखवले. तेव्हापासून या दोघांच्याही वागण्यामध्ये बराच फरक घडून आला. १८५७चे पहिले भारतीय स्वातंत्र्ययुद्ध या आपल्या ग्रंथामध्ये सावरकरांनी मॅक्समुल्लर आणि मेकॉले यांच्या खऱ्या हेतूंची माहिती देऊन, इंग्रजांचे कपट प्रथमच जगासमोर मांडले!

'इंडिया हाऊस'मध्ये राहणे अशक्य झाल्यावर श्यामजी कृष्ण वर्मा यांनी आपले वास्तव्य पॅरिसला हालवले. बॅ० राणा, श्यामजी कृष्ण वर्मा आणि मादाम कामा पॅरिसला राहात आणि क्रांतिकारकांचा जणू कारखाना (इंडस्ट्री) चालवत. तेथे

जगभरचे क्रांतिकारक गोळा होत. त्यामुळे आशिया खंडातील क्रांतिकारकांचे आपोआपच जाळे (नेटवर्किंग) पॅरिसमध्ये निर्माण झाले होते. मार्सीय येथे सावरकरांनी सागरामध्ये उडी टाकून ते बंदरात शिरले. राणा आणि मादाम कामा यांना मोटारीने तेथे यायला उशीर झाला; नाही तर इतिहास वेगळाच झाला असता.

दादाभाई नौरोजींना खूप आर्थिक मदत आणि मतदारांना नेण्यासाठी घोडागाड्या पुरवून सयाजीरावांनी त्यांना इंग्लंडच्या संसदेच्या निवडणुकीमध्ये जिंकून आणले. इंग्लंडच्या लोकसभेमध्ये भारतीयांच्या तक्रारी आणि आक्रोश समर्थपणे मांडता आला पाहिजे, खुद्द इंग्लंडमध्ये भारतीयांच्या बाजूने लोकमत झुकले पाहिजे आणि त्यासाठी भारताची बाजू इंग्लंडमधील लोकसभेत समर्थपणे आणि परिणामकारकरित्या मांडतील, असे किमान पाच भारतीय लेबर पक्षाचे खासदार म्हणून (एम० पी०) निवडून आणले पाहिजेत, असा टिळक आणि सयाजीराव यांचा विचार होता. त्यासाठी १९१८ मध्ये टिळकांनी लेबर पार्टीला मोठी देणगी देऊ केली होती. या निवडणुकांमध्ये दोन-तीन कम्युनिस्ट भारतीय तरुण खासदार असतील, तर त्यांच्या निवडणुकीचा खर्च रशिया करण्यास तयार झाला होता. उद्या श्यामजी कृष्ण वर्मांसारखी आपल्यावर वेळ आली, तर फ्रान्समध्ये राहणे सोपे जावे म्हणून सयाजीराव उतारवयात फ्रेंच भाषा शिकत होते. इंग्रजांचा फ्रेंच सरकारवर दबाव फार वाढला आणि इंग्रजी हेरांचा सुळसुळाट पॅरिसमध्ये भारतीय तरुणांवर पाळत ठेवण्यासाठी वाढला; तेव्हा श्यामजींना आपला मुक्काम तटस्थ समजल्या जाणाऱ्या स्वित्झर्लंडला हालवावा लागला! या श्रेष्ठींच्या मनामध्ये परदेशी स्थापन केलेले भारतीय सरकार (Govt. in Exile) तेथे स्थापण्याचा विचार घोळत होता. स्वित्झर्लंडमध्ये लष्करी शिक्षणाची सोय कितपत होईल याची चाचपणी स्वतः महाराज तेथे जाऊन करत होते. आपल्या बडोद्याच्या सैन्याचा प्रमुख स्विस जनरल असावा, अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली होती; पण इंग्रज सरकारने त्यांची विनंती धुडकावून लावली.

बडोद्यामधील ९९ टक्के सुशिक्षित मराठी लोकसंख्या हिंदू महासभावादी होती. त्याचे उत्तम उदाहरण म्हणजे बडोद्याचे (व नंतर मुंबईचे) ज० द० जोगळेकर, नाना शिंदे आणि विनोद. या दांडिया बाजार या विभागामध्ये मराठी मुलींना सतावणाऱ्या पठाण तरुणाचे पुढे काय झाले, याचे रहस्य अजूनही अज्ञात आहे. नागपूरहून संघाची तरुण प्रचारक मंडळी बडोद्याच्या 'कलाभवन'मध्ये तांत्रिक शिक्षण घेण्यासाठी येत. त्या काळी हिंदू महासभा आणि राष्ट्रीय स्वयंसेवक संघामध्ये वाद नव्हता, निदान बडोद्यापुरता तरी. संघाचे शहरप्रमुख नानासाहेब आपटे हिंदू महासभेच्या बडोदा शाखेचे मुख्य होते. नानासाहेब आपटे यांचे आणि

काँग्रेसवाल्यांचे जवळचे संबंध होते. काँग्रेसवाल्यांच्या मुलांना (उदाहरणार्थ डॉ० मोदी) संघ वर्ज्य नव्हता. वि० पां० नेने सयाजीरावांचे वैयक्तिक सचिव असल्यामुळे, त्यांच्यामार्फत दोन्ही संस्थांची कामे हसत केली जात असत. संघाच्या कोजागिरी पौर्णिमेचा उत्सव गोकरू मैदानावर साजरा होई. खुद्द सयाजीरावांची सूनच त्या वेळी संघाच्या स्वयंसेवकांना बदामाचे दूध देत असे! असले लाड आणि कोडकौतुक फक्त बडोदे संस्थानच करू जाणे!

**ड) गांधीजी आणि सयाजीराव**

आपण टिळकांसमोर टिकू शकत नाही, हे पाहिल्यावर गोखले यांनी आपल्या शिष्याला, गांधीजींना पुढे ढकलले आणि मवाळ-जहाल या युद्धामध्ये ते विजयी झाले. १९०१ पासून गोखले-गांधी मैत्री सुरू झाली. १९०१ मध्ये कलकत्ता काँग्रेसमध्ये गोखले यांनी गांधीजींच्या अभिनंदनाचा ठराव विषय नियामक समितीमध्ये (सबजेक्ट कमिटी) मंजूर करवून घेतला. १९०९ च्या लाहोर काँग्रेसमध्ये त्यांनी गांधीजींचे ट्रान्सवालमधील कार्य अमर आहे, असे गोडवे गायले. गोखले यांनी रॉयल कमिशनचे सभासद असताना, ऑक्टोबर १९१२ मध्ये दक्षिण आफ्रिकेचा २६ दिवसांचा दौरा केला. तेव्हा त्यांनी गांधीजींनी भारतात येऊन आपली जागा घ्यावी आणि भारतामध्ये सध्या जे आतंकवाद्यांचे हिंसेचे तांडव सुरू आहे, त्यापासून देशास वाचवावे, अशी विनंती गांधीजींना केली.

गांधीजी दक्षिण आफ्रिकेत असताना सयाजीरावांनी गांधीजींच्या कार्याला भरपूर आर्थिक मदत केली होती. मदत करणाऱ्यांमध्ये ते एकटे नव्हते. त्यांच्याबरोबर मोठे उद्योगपती, इतर राजे, फार काय इंग्रज बाबूलोक आणि खुद्द व्हाइसरॉयदेखील होते. "मी चांदी आणि सोन्याच्या नदीमध्ये पोहत आहे." असे वर्णन खुद्द गांधीजींनीच लिहून ठेवले आहे. स्वतः गोखले यांनी गांधीजींना वचन दिले होते, "तुमच्या कार्यासाठी तुम्हाला पाहिजे तेव्हढे महिने दरमहा ७५,००० पाऊंडांची सोय होईल." (For as many months as you want). गोखले यांनी आपल्या सर्व मवाळ मित्रांना गांधीजींना मदत करण्याची विनंती केली होती. दक्षिणेमध्ये श्रीनिवास शास्त्री यांनी खळखळ करताच गोखले यांनी त्यांना रागारागाने झापले. "दरमहा ३,००० पाऊंड जमवणे फार अवघड काम आहे, असे तुम्ही म्हणू कसे शकता?" (Dadoomiyan 100 years of Muslim Appeasement, 1995, p.240). व्हाईसरॉय हार्डिंग यांनी गोखले यांना गांधीजींना मदत करण्याचे वचन दिले होते!

त्याचा अनुभव गांधीजी जेव्हा मुंबईस उतरले, तेव्हा त्यांना आला. त्यांना अपोलो बंदरामध्ये उतरण्याची व्यवस्था केली गेली. तेथे फक्त व्हाईसरॉय आणि

गव्हर्नर्सना उतरवतात. आल्या आल्या जहांगीर पेटीट मॅन्शनमध्ये त्यांचा सत्कार करण्यात आला. फिरोजशहा मेहता अध्यक्षपदी होते. लाला लजपतराय, जिना, सरोजिनी नायडू वगैरे मोठ्या पुढाऱ्यांनी भाषणे केली. साऱ्या कार्यक्रमामध्ये गोखले यांचे 'वर्चस्व' दिसत होते. दुसऱ्या दिवशी पुण्यामध्ये 'सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटी'ने त्यांचा सत्कार केला. तेथे सर विठ्ठलदास ठाकरसी, सर दोराबजी टाटा, सर इब्राहिम रहिमतुल्ला आणि सर जमशेटजी जीजीभॉय यांच्यासारखे पूंजीपती हजर होते. इंग्रज सरकारने १९१५ च्या मानकऱ्यांची यादी जाहीर केली. त्यामध्ये पहिल्या दर्जाचे 'कैसर-इ-हिंद' सुवर्णपदक गांधीजींना दिल्याची जाहिरात केली गेली. सयाजीरावांना हा सारा सोहळा 'राजमान्य' वाटला. तेथे लोक गैरहजर होते. त्यांनी तसे गोखले यांना बोलूनही दाखवले. गोखले म्हणाले, "थोडासा वृत्तपत्रीय प्रचार, थोडा नाटकीपणा आणि बराचसा पैसा खर्च केला की, लोकही येतील." सयाजीराव म्हणाले, "मला ते खरे वाटत नाही." काळाने सयाजीरावांना खोटे ठरवले होते.

गोखले आणि मेहता हे दोन मवाळाग्रणी १९१५ मध्ये वारले. १९१८ मध्ये काँग्रेसमध्ये मवाळांची गळती सुरू झाली. पुढील वर्षी काँग्रेसमध्ये फक्त तरुण जहाल मंडळी उरली होती. पहिल्या महायुद्धानंतरच्या काळामध्ये हे होणे नैसर्गिक होते. ब्रिटिश बाबूलोकांसमोर फक्त एकच उपाय होता. टिळकांचा पराभव करण्यासाठी गांधीजी, मुसलमान आणि इंग्रज यांची युती घडवून आणून टिळकांचे राष्ट्रवादी राजकारण संपुष्टात आणणे.

कुटील नीती वापरणाऱ्या बाबूंसमोर ते करण्यासाठी तीनच हत्यारे उपलब्ध होती. वृत्तपत्रे (मीडिया), खूप पैसा (मनी) आणि मुसलमान गुंडांना चिथावणी देऊन दंगे निर्माण करणे. लोकमान्य टिळक इंग्लंडला गेले होते. त्यामुळे १९१८ चे अधिवेशन मवाळांच्या हाती गेले. त्या आधी १९१७ मध्ये गांधीजींचा चंपारण्यातला विजय आणि १९१८ चा खेडा जिल्ह्यामधील सत्याग्रहाचा दणका, यांनी गांधीजी यांना आहे त्या पेक्षा (larger than life) मोठे बनवले होते. मद्रासहून आपण रौलट कायद्याविरुद्ध अहिंसेने लढणार, असे गांधीजींनी जाहीर करून साऱ्या देशाचे लक्ष आपल्याकडे आकर्षून घेतले होते. त्यासाठी ६ एप्रिल हा 'हरताळाचा दिवस' मुक्रर करण्यात आला. आधीची तारीख ३० मार्च ठरली होती. त्यामुळे लोकांनी ३० मार्च रोजीच कडक हरताळ पाळला. दिल्लीमध्ये हिंसाचार झाला, म्हणून गांधीजींना अटक करण्यात आली. ती बातमी ऐकल्यावर हिंसाचार वाढला. काही गोऱ्या लोकांचे खून पडले, म्हणून गांधीजींना मुक्त करण्यात आले. त्यांनी आवाहन करताच शांतता प्रस्थापित झाली. १३ एप्रिलला अमृतसर येथे

जालियनवाला बागेमध्ये जनरल डायरने ३७१ शीख आणि हिंदू जागच्या जागी ठार केले आणि १२०० लोकांना जखमी केले.

संगतीवरून माणूस पारखता येतो. अरविंद घोष, बॅ० केशवराव देशपांडे, खाशेराव जाधव यांच्यासारख्या जाज्वल्य क्रांतिकारकांच्या संगतीत सयाजीराव वावरत होते. लंडनला आणि पॅरिसमध्ये सावरकर, श्यामजी कृष्ण वर्मा, मादाम कामा, चट्टोपाध्याय ही मंडळी त्यांच्या आजूबाजूला वावरत. त्यामुळे गंगनाथ विद्यालय आणि माणिकराव ही क्रांतिकारकांची केंद्रे झाली. गणेश उत्सवात बडोदा येथे उघड उघड इंग्रजद्रोही भाषणे होत. वासुदेव पुरुषोत्तम साठे यांनी 'चाबूक' पत्रामधून उघड उघड इंग्रजद्रोही लेख लिहिले आणि देशभक्ती जागृत करणारी २१ नाटके लिहिली.

१९०८ मध्ये सावरकरांचे साथी शंकर वाघ यांना शिवाजीराव या राजपुत्राचे संरक्षक नेमले. इंग्रजांनी त्याला विरोध केला, तेव्हा राजपुत्राच्या सेवेतून काढून आपल्या सेवेत नेमले. संत निहालसिंगांशी संबंध ठेवण्यास इंग्रजांनी नकार दिला होता. सयाजीरावांनी सांगितले, तो माझे चरित्र लिहितो आहे. कॅनडामध्ये व्हंकूव्हरला तारकानाथ दास यांनी त्यांचा सत्कार केला. १९११ च्या दिल्ली दरबारामध्ये पाठ फिरवून त्यांनी बादशहाचा अपमान केला. काश्मीरपासून त्रावणकोरपर्यंत कोणत्याही संस्थानिकाला यातली एक देखील गोष्ट करणे अशक्य वाटले असते. सयाजीरावांना या सर्व गोष्टी करण्याची हिंमत कोठून आली, ते परमेश्वरच जाणे. त्या हिमतीचे गांधीजींना मनातल्या मनात कौतुक वाटणे साहजिक होते. जसे सुभाषबाबूंच्या बाबतीत घडले. अर्थात वैयक्तिक अहंकार शेवटी कौतुकावर मात करतोच.

सयाजीरावांमधला 'क्रांतिकारक' वरील साऱ्या हिंसक घटनांची नोंद घेऊन त्यांची छाननी करत होता. गोखले १९१५ मध्येच मरण पावले होते. टिळक मंडालेहून सुटून पुन्हा पुण्यामध्ये परत आले होते. इंग्रजांना देशाबाहेर काढण्याची हीच सुवर्णसंधी आहे, असे सयाजीरावांना वाटत होते. टिळकांना आणि सावरकरांना अटक केल्यामुळे महाराष्ट्रातील क्रांतिकार्य थंडावले आहे, असा आभास इंग्रज सरकारने निर्माण केला होता. सयाजीरावांना गोखले यांचे शब्द आठवत होते. "मूठभर क्रांतिकारक या सर्वशक्तीमान ब्रिटिश साम्राज्याला (मायटी ब्रिटिश एंपायरला) काहीही इजा करू शकणार नाहीत. विरोधकांना नेस्तनाबूद करणाऱ्या साम्राज्यापुढे (साम्राज्याच्या स्टीम रोलरखाली) फुकट आपले तरुण चिरडले जातील!" 'हा नरमेधयज्ञ थांबवण्यासाठी गोखले यांनी दक्षिण आफ्रिकेतून 'गांधी' नावाचे एक पर्जन्यास्त्र पैदा केले आहे आणि या क्रांतीयज्ञातील ज्वाळा या

पर्जन्यास्त्राच्या साहाय्याने इंग्रज विझवून टाकतील, कदाचित ते पाहण्यास आपण नसू', असेही गोखले यांनी सयाजीरावांना सांगितले होते.

गांधीजी यांचा साबरमती आश्रम (१९१५), लखनौ करार (१९१६), ॲनी बेझंट आणि लोकमान्य टिळक यांच्या दोन वेगवेगळ्या होमरूल लीगच्या चुली (१९१६), गांधींचा चंपारण्यामधील विजय (१९१७), मॉंटेग्यू चेम्सफोर्डच्या सुधारणांचा खर्डा (१९१८), त्यामुळे निर्माण झालेल्या आशा, त्या चक्काचूर करणारा जालियनवाला बागेमधील नरमेध यज्ञ (१९१९), गांधीजींची खिलाफतची आफत (१९२०) व मोपला लोकांचे हिंदूविरोधी तांडव (१९२१), गांधीजींची सत्याग्रहाची पहिली चळवळ व चौरीचोराचे निमित्त करून चळवळ मागे घेणे (१९२२), स्वराज्य पक्षाचे गांधीजींच्या बहिष्कारास आव्हान (१९२३), गांधीजींना विरोध करून त्यांचे निवडणुकीमध्ये भाग घेणे (१९२३), गांधीजी बेळगाव कॉंग्रेस अधिवेशनाचे अध्यक्ष होणे (१९२४), राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची स्थापना (१९२५), सी० आर० दास व सुरेंद्रनाथ बॅनर्जींचा मृत्यू (१९२५), व्हाइसरॉयची आगगाडी उडवून देण्याचा कट व संबंधित काकोरीचा खटला (१९२६), अरविंदांची पॉंडिचरीमध्ये आश्रमाची स्थापना (१९२६), सायमन कमिशन (१९२७) आणि त्याला कॉंग्रेसने केलेला विरोध, काकोरी खटल्यातील आरोपींना फाशी (१९२७), मद्रास (चेन्नई) कॉंग्रेस अधिवेशनात नेहरूंचे संपूर्ण स्वराज्याचा ठराव पारित करणे (१९२७), लालाजींचा सायमन कमिशनला विरोध करत असताना झालेल्या लाठीमारामुळे मृत्यू (१९२८) आणि बारडोलीचा सरदार पटेलांचा सत्याग्रह (१९२८) या साऱ्या घटना एवढ्या भराभर घडल्या की, सयाजीरावांना भारतीय राजकारणामध्ये नेमके काय घडत आहे, याचा बोध होत नव्हता. महाराष्ट्रातली क्रांतीची आग भले थंडावली असेल; पण ती आग नव्हे वणवा साऱ्या देशभर पसरला होता. गोखले यांनी गांधीजींना भारतात ज्या कारणासाठी आणले होते, ते यशस्वी झाले नाही. गांधीजींचे अहिंसात्मक लढे अयशस्वी ठरत होते. उलट साऱ्या भारतभर क्रांतीचा उद्घोष सुरू होता. सयाजीरावांना सावरकरांची हिंसक क्रांती खरी का गांधीजींचे अहिंसक क्रांतीचे नाटक खरे, हे कळत नव्हते. नाटकामध्ये त्यांना रस नव्हता.

गोलमेज परिषदेच्या वेळी सयाजीराव आणि गांधीजी यांचा संबंध आला. सायमन कमिशनच्या अहवालाच्या प्रकटीकरणानंतर ही परिषद भरली होती. सयाजीरावांना हे इंग्रजांचे नाटक आहे; त्यांना भारतीयांना सार्वभौमत्व (डोमिनिअन स्टेटस) वगैरे काही द्यावयाचे नाही, हे माहीत होते. तरी ते १२ नोव्हेंबर १९३० रोजी इंग्लंडच्या संसदेमधील वरिष्ठ सभागृहामध्ये (हाऊस ऑफ

लॉर्ड्सच्या) हजर राहिले. बरीच भाषणबाजी झाल्यावर सर्वांना सेंट जेम्स पॅलेसमध्ये नेण्यात आले. प्रत्येक जण वेगवेगळे मत मांडत होता. त्यामुळे ही परिषद यशस्वी होणार नाही, हे ठरलेले होते. त्या निमित्ताने २५ सप्टेंबर १९३१ रोजी गांधीजी सयाजीरावांच्या हॉटेलमध्ये आले आणि दोघांनी तासभर चर्चा केली. ती चर्चा कशावर झाली, हे कोणालाच माहीत नाही; पण गांधीजी त्यांना विरोधी पक्षातला माणूस मानत नव्हते, एवढेच त्यांच्या भेटीवरून कळले. तब्येतीचे निमित्त करून सयाजीरावांनी पुढील गोलमेज परिषदेच्या बैठका टाळल्या.

महात्मा गांधी यांनी मिठाच्या सत्याग्रहाची कल्पना बडोदे राज्यातून घेतली होती. ईस्ट इंडिया कंपनीने मिठाची मक्तेदारी आपल्याकडे घ्यायचे ठरवले आणि किनाऱ्यावर राहणाऱ्या कोळ्यांनी समुद्राच्या पाण्यातून मीठ निर्माण करायचे नाही, असा कायदा पारित केला. बडोदे राज्यावर कंपनीचा हा जुलूम होता. त्याने विरोध केला. ओखामंडळाचा समुद्र तुमच्या हद्दीत येतो. आम्ही त्यांना त्यांच्यापुरते मीठ तयार करण्याची परवानगी देऊ; पण ते मीठ त्यांनी इतरांना विकायचे नाही. माधवराव दिवाण असताना त्यांनी त्या कायद्याला मंजुरी दिली. बडोद्याच्या वीस लाख प्रजेला ब्रिटिशांच्या अंमलाखाली असलेल्या भारतामधील मीठ विकत घ्यावे लागायचे. ओखामंडळाच्या मिठापेक्षा ते दसपट महाग असायचे. मीठ आयात केले की, त्यावर शुल्क भरावे लागे. शुल्क भरूनदेखील ओखामंडळाचे मीठ विकत घेता येत नसे. १९३० मध्ये महात्मा गांधीजींना बडोद्यामधील कोणा प्रजाजनाने ही दशा सांगितली असली पाहिजे. म्हणून त्यांनी दांडी यात्रा काढून शुल्क आणि कर न भरता मीठ बनवले आणि स्वतःस अटक करवून घेतली.

गांधीजी १९३० मध्ये साबरमती आश्रमामधून निघून दांडी गावापर्यंत चालत गेले. या रस्त्यावर अधूनमधून बडोदे राज्याचा भाग होता. त्यामुळे राज्याच्या अधिकाऱ्यांना भीती वाटे. सरकार मुद्दाम एखादा दंगा निर्माण करून सयाजीरावांचे नाव त्यामध्ये गोवेल. सुरत जिल्ह्याचा जिल्हाधिकारी ग्रॅहम यांनी नाडकर्णी नावाच्या बडोद्यातील अधिकाऱ्याला असे सुचवले की, बडोदे संस्थानच्या हद्दीमध्ये गांधी आले की, तुम्ही त्यांना अटक करा, आम्ही तुम्हाला 'रावबहादूर' ही पदवी देऊ. नाडकर्णी यांनी ग्रॅहमसाहेबांचे काहीही ऐकून घेतले नाही.

महाराजांच्या नातवाचे प्रतापसिंहाचे १९२८-२९ च्या हिवाळ्यामध्ये लग्न होते. त्या निमित्ताने व्हाईसरॉय लॉर्ड इर्विन बडोदा येथे भेट देणार होते. अशा वेळी इंग्रज मुद्दाम काही दंगा घडवून आणू शकत होते. लाहोर आणि अहमदाबाद येथे व्हाईसरॉयवर बाँब टाकण्यात आले होते. अशा वेळी गांधीजींचा सत्याग्रह म्हणजे आणखी एका संकटाला आमंत्रण होते. सुदैवाने दांडी यात्रा व्यवस्थित पार पडली.

सयाजीरावांना सत्य आणि अहिंसेचे राजकारण कधीच पटले नाही. ते त्यांच्या 'मर्दमराठा' मानसिकतेच्या विरुद्ध होते; पण हे राजकारणाचे नाटक त्यांनी स्वीकारले, कारण दुसरा पर्याय नव्हता. स्थानिक गुर्जर प्रजेला त्यांना दुखवणे परवडण्यासारखे नव्हते. सर्व सूत्रे गुर्जर धनिकांच्या हाती होती. भोळी प्रजा निमूटपणे त्यांच्यामागे खेचली जात होती. स्वस्थ बसून उगाचच तमाशा पाहणे, एवढेच ते करू शकत होते.

**ई) सरदार पटेल आणि सयाजीराव**

सावरकरांना काळ्या पाण्याची सजा झाली तेव्हा सयाजीरावांना फार दुःख झाले; पण ते त्यांना व्यक्त करणे अशक्य होते. १९२४ मध्ये सावरकरांची सुटका झाली. राजकीय चळवळीमध्ये भाग घ्यायचा नाही, असा त्यांच्यावर निर्बंध होता. रत्नागिरीमध्ये त्या वेळी दोन राजकीय कैदी राहात असत. एक ब्रह्मदेशाचा राजा थिबा आणि दुसरे सावरकर.

हिंदूमहासभेचे जमनादास मेहता नेहमी बडोद्यामध्ये येत. त्यांच्यामार्फत सयाजीराव सावरकरांशी संपर्क साधत असत. कूपर मंत्रीमंडळामध्ये जमनादास मेहता हे अर्थमंत्री होते. ते पद स्वीकारताना त्यांची एकच अट होती, सावरकरांची सुटका. १९३७ नंतर सावरकर नियमितपणे वर्षातून एक-दोनदा बडोदा येथे येत. त्यांच्या भाषणांचा लाभ बडोद्याच्या मराठी समाजाने भरपूर घेतला आहे. आमच्या घरी सावरकर आणि न० चिं० केळकर जेवायला आले होते, त्याची स्पष्ट आठवण मला आहे. वि० पां० नेने (माझे वडील) यांच्यामार्फत सयाजीरावांकडून सावरकरांना गुप्तरीतीने आर्थिक मदत दिली जाई.

हिंदू महासभा आणि हिंदू संस्थानिक यांचे चांगले मेतकूट जमे. हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांना नेपाळ आणि गुरखे (गोरक्षक) यांचा विलक्षण अभिमान वाटे. जगामधील एकमेव 'हिंदूराष्ट्र', 'हिंदुत्वाचे अभिमानी', 'हिंदू धर्माचे रक्षक' वगैरे शेलकी विशेषणे नेपाळ नरेशांसाठी ते योजत असत. शिवराव यांनी 'इंडिया १९३५ ते १९४७' या ग्रंथामध्ये लिहिले आहे, "१९३०-४० या काळामध्ये बऱ्याच संस्थानिकांनी मुस्लीम लीगला उघडपणे मदत केली. नरेंद्र मंडळाचे प्रमुख नवानगरचे जामसाहेब मला म्हणाले...

"काँग्रेसने आमच्यासाठी काय केले? आम्हाला सत्ताभ्रष्ट करण्यासाठी चळवळी केल्या. जिनांना आमचे अस्तित्व पसंत आहे. नेहरूंना राजेरजवाडे म्हटले की, त्यांचा तोल जातो आणि केव्हा आम्ही त्यांना खलास करू असे होते." राजकोटच्या वीरावाला या दिवाणाने गांधीजींना कसा धडा शिकवला, ते जगजाहीर आहे. सुभाषबाबूंनी गांधीजींचा सपशेल पराभव केला, म्हणून ते राजकोटला तेथील

महाराजांविरुद्ध उपोषणासाठी बसले. सरदार पटेल तेथे धावून गेले नसते, तर राजकोट येथे गांधीजी उपोषण करत असतानाच मृत्युमुखी पडले असते. हिंदू महासभेने ''काँग्रेस फक्त हिंदू राजांविरुद्ध हिंसक चळवळी करते, हैदराबाद किंवा भोपाळमध्ये तसे करावयास घाबरते'', असा सरळ आरोपच केला होता (दाते, शं० रा०, हिंदु सभेच्या कार्याचा इतिहास, काळ प्रकाशन, १९७५, पृ० १२७-२८).

सयाजीराव यांनी बडोदे राज्यामध्ये पटेल शेतकऱ्यांना चांगले वश करून ठेवले होते. अलेंबिकचे अमीन, ग्रंथप्रसार चळवळीचे पटेल आणि इतर अनेक समाजसुधारक, तसेच राजकीय चळवळीमधील पटेल हे सर्व महाराजांचे वैयक्तिक मित्र होते; पण सयाजीराव आणि हिंदू महासभा यांच्या मैत्रीमुळे सरदार वल्लभभाई पटेल यांनी आपल्या लोकप्रियतेचा उपयोग करून, बडोदे राज्यामध्ये गुजराथी-मराठी हा वाद सुरू केला आणि 'फोडा आणि राज्य करा' या बाबतीत काँग्रेस ही ब्रिटिशांचीच वारस आहे, हे सिद्ध केले. १९३४ पासून 'बडोदा प्रजामंडळा'वर सरदार पटेल आपला प्रभाव वाढवू पाहात होते. मगनभाई पटेल हा त्यांचा खास हस्तक होता. १९२७मध्ये बडोद्यामध्ये ज्या वेळी महापूर आला त्या वेळी पूरग्रस्तांना छपरासाठी फुकट लोखंडी पत्रे वाटण्याचे काम या मगनभाईंना दिले होते. ते न वाटता त्यांनी ते परस्पर विकून टाकले. चौकशी होऊन, गरिबांना ठकवण्यासाठी मगनभाईंना तुरुंगामध्ये जावे लागले. तुरुंगातून सुटल्यावर दोन वर्षे त्यांना सयाजीगंजच्या पोलीस चौकीमध्ये रोज हजेरी द्यावी लागे. त्यामुळे त्यांचा सयाजीमहाराजांवर राग होताच.

मगनभाईंच्या नेतृत्वाखाली प्रजामंडळाने शेतकऱ्यांवरील ३५ टक्के कर कमी करावा, अशी मागणी केली. सरदार पटेल यांनी एका भाषणात ''हा कर कमी झाला नाही तर मी बडोद्यामध्ये चळवळ सुरू करेन'', अशी धमकी दिली. त्याच सुमाराला राजकोटमधील गांधीजींचे उपास प्रकरण झाले आणि सरदार थोडेसे नरम पडले! सयाजीरावांना पटेल समाजाचे शत्रुत्व परवडण्यासारखे नव्हते. पटेल समाजाचे खेडा आणि बारडोली सत्याग्रहापासून वल्लभभाई पटेल अनभिषिक्त राजे होते. महाराजांनी दिवाणांना सांगून एका रात्रीत २० लाख रुपयांचे कर माफ केले. प्रजामंडळ (बडोद्याची लेजि० असेंब्ली) वाढवले आणि त्यामध्ये आणखी काही पटेलांना स्थान दिले. बडोद्यामध्ये सत्याग्रह करून महाराजांविरुद्ध लोकांना चिथवण्याची सरदारांची सारी स्वप्ने एका क्षणात वाऱ्यावर विरून गेली. सरदार खूप संतापले होते; पण त्यांना काहीच बोलता येईना. करमाफीचे सारे श्रेय सयाजीरावांनी आपल्याकडे घेतले होते!

## फ) सयाजीराव आणि हिटलर

टिळक आणि सावरकरांमुळे सयाजीरावांची खात्री पटली होती की, इंग्रज साम्राज्यशाहीचा मद फक्त स्वातंत्र्याची जर्मनीच उतरवू शकेल. पहिल्या महायुद्धातील समोरून चालून आलेली संधी अमृतसरमधील काही शिखांच्या फितुरीमुळे हुकली. टिळक युग संपले आणि गांधीजी युग सुरू झाले. पुन्हा जर्मनी उठून उभा राहील आणि इंग्रजी साम्राज्यशाहीला आव्हान देईल, तोपर्यंत हात चोळत स्वस्थ बसून राहण्यापलीकडे सयाजीराव इतर काही करू शकत नव्हते. म्हणून शक्य तेवढा जास्त काळ युरोपमध्ये राहून जर्मनीचा अस्तास गेलेला सूर्य परत कसा, केव्हा आणि कितपत उगवतो आणि मध्यान्हीचा सूर्य म्हणून केव्हा तळपतो याचा अभ्यास सयाजीराव करू लागले. त्यांना हिटलरच्या रूपामध्ये ते सूर्यदर्शन झाले. भारतीय क्रांतिकारकांप्रमाणे हिटलरवर जाहीर भाषणे करण्यावर बंदी होती. त्यास हद्दपार केले होते. १९३२ मध्ये त्याला जर्मन नागरिकत्व दिले गेले.

हिटलर उत्कृष्ट संघटक होता. ३० जून १९३४ रोजी एस एस ब्राऊन शर्ट्स आणि गेस्टापो (गुप्त हेर) यांच्या जोरावर त्याने सत्ता काबीज केली. त्याचा मुख्य भर होता वैज्ञानिक संशोधनावर. ३० जानेवारी १९३३ मध्ये प्रे० हिंडेनबर्ग यांनी हिटलरला जर्मनीचा चान्सेलर केले. ते साहजिक होते, कारण जर्मनीमध्ये तो सर्वांत जास्त लोकप्रिय पुढारी होता. सयाजीरावांना सत्तेवर नव्याने आलेल्या पुढाऱ्याने काय करावे त्याचे धडे जर्मनीमध्ये शिकावयास मिळाले. हिटलरने मोठ्या धडाक्याने मोठमोठे आणि महत्त्वाकांक्षी प्रकल्प हाती घेतले. उदाहरणार्थ जर्मन ऑटोबान (महामार्ग) (१९३३-३४), लोकांसाठी मोटारगाडी (फोक्स वॅगन) (१९३८), बर्लीन ऑलिम्पिक (१९३६), वार्षिक न्युरेंबर्ग रॅलीज वगैरे. या प्रकल्पांनी हिटलरला लोकप्रियता दिली व फ्यूरर केले.

महाराजांच्या दूरदृष्टीला स्पष्ट दिसू लागले की, दुसरे महायुद्ध हे विज्ञान आणि तंत्रज्ञानाचे युद्ध होणार आहे. त्यामध्ये कोट्यवधी माणसांचा नरमेध यज्ञ होणार आहे आणि त्यामध्ये इंग्लंडच्या साम्राज्यशाहीचा बळी दिला जाणार आहे. त्यासाठी ऑलिम्पिक खेळांची संधी साधून हिटलरबरोबर बरोडा-बर्लीन पॅक्टवर १९३६ मध्ये महाराजांनी सही केली. (पहा परिशिष्ट) तो काळ महाराजांच्या सात्त्विक समाधानाचा शिखर काळ होता. पहिल्या महायुद्धात हुकलेली संधी आता आपण निश्चित मिळवणार याचा त्यांना आत्मविश्वास होता. याच काळामध्ये त्यांचा हीरक महोत्सव साजरा झाला आणि कीर्तीस्तंभ आणि कीर्तीमंदिर यांची त्यांची

उभारणी केली. बडोद्याच्या बाहेर हरणी येथे १९३७मध्ये विमानतळ उभारला. याच काळामध्ये त्यांनी वि० पां० नेने यांना महाराजांनी हिटलरचे चरित्र लिहिण्याची विनंती केली. त्यांचा बडोदा बर्लीन पॅक्टशी जवळचा संबंध होता, म्हणून ते काम त्यांनी आपल्या धाकट्या बंधूंवर म० पां० नेने यांच्यावर सोपवले. मराठी भाषेतील हिटलरवरील ते पहिले चरित्र!

महाराजांची सर्वांत प्रदीर्घ युरोपमधील सहल १९३८ची ठरली. त्यांनी हिटलरची भूमीची वाढती भूक अनुभवली. हिटलरने जर्मन राईसला ऑस्ट्रिया जोडला. त्यानंतरची उडी म्हणजे ३१ ऑगस्ट रोजी पोलंडवर केलेली स्वारी. अरेरे, त्या वेळी सयाजीराव हयात नव्हते. ६ फेब्रुवारी रोजी मुंबईमध्ये त्यांचे निधन झाले आणि ७ फेब्रुवारी रोजी कीर्ती मंदिरामध्ये त्यांचा अग्निसंस्कार झाला.

सयाजीराव आणखी एक दशक जगले असते, तर त्यांना त्यांचा प्रिय भारत देश स्वतंत्र झालेला पाहता आला असता. क्रांतिकारकांना का कोणास ठाऊक, या दुसऱ्या महायुद्धामध्ये हिटलर इंग्रजांना नक्की पराभव करणार अशी स्वप्ने पडत होती. १९३४ मध्ये ते अमेरिकेस गेले होते. तेथे त्यांनी अमेरिकेस स्वित्झर्लंडप्रमाणे स्वतंत्र राहायचे आहे, शेती आणि उद्योगांमध्ये पहिला क्रमांक पटकावायचा आहे आणि युरोपातील साम्राज्यशाही मारामाऱ्यांमध्ये अमेरिकेस जराही रस नाही, अशी त्या देशाविषयी कल्पना झाली होती. कारण हरदयाळांना इंग्रजी सत्तेच्या दबावाखाली त्यांनी अटक करणे सहज शक्य होते. त्यांनी तसे न करता मेक्सिकोला पळून जाण्यास मदत केली.

दुसऱ्या महायुद्धामध्ये इंग्रज सत्ता साफ कोलमडेल, अमेरिका तटस्थ राहील आणि जर्मनीचा विजय होईल अशी त्यांना आशा वाटत होती. सावरकरांनी सुभाषबाबूंना जर्मनीला पळून जाण्यास सांगितले होते. त्याप्रमाणे २८ मार्च १९४१ रोजी सुभाषचंद्र बर्लीनला थडकले. त्यांच्या तैनातीला बडोद्याचे एक तरुण गणपुले होते. जाण्याआधी जून १९४० मध्ये सुभाषबाबुंनी निरादबाबू चौधरी यांना भविष्यवाणी सांगितली होती, ''इंग्लंड पराभव कबूल करेल आणि १६ जुलैपर्यंत जर्मनीला शरण येईल'' (हग टॉय, द स्प्रिंगिंग टायगर, पृ० ६०).

निरादबाबूंना ते त्या वेळी पटले होते, कारण १० जूनला मुसोलिनीने युद्धामध्ये प्रवेश केला होता आणि १३ जूनला पॅरिस पडले होते. सयाजीराव जिवंत असते, तर हिंदू संस्थानिकांनी त्यांच्या नेतृत्वाखाली इंग्रजांविरुद्ध उठाव केला असता. त्यांचे पाहून ब्रिटिश इंडियातील हिंदू जनता गांधी-नेहरूंना न जुमानता त्याच मार्गाने गेली असती! जगाचे सारे चित्रच बदलून गेले असते!

अरेरे, ६ फेब्रुवारी १९३९ रोजी काळाने सयाजीरावांना ओढून नेले, सावरकर, सुभाषबाबू यांच्या पडद्यामागील हालचालींवर इतिहास आज तरी चूप आहे.

भारत देश सोडून जाण्यापूर्वी असे म्हणतात की, इंग्रजांनी बरेच महत्त्वाचे, स्फूर्तिदायक आणि सत्य कागदपत्रे (डॉक्युमेंट्स) जाळून टाकली. ते काम बरोबर आठवडाभर चालले होते.

। । ।





# प्रशासन

**१. मनुष्यबळ व्यवस्थापन** – सयाजीराव वारंवार युरोपला जात. तेथून ते बरीच पत्रे आपल्या सहकाऱ्यांना आणि अधिकाऱ्यांना लिहीत असत. दिवाण व्ही० टी० कृष्णमाचार्यांना तर आठवड्याला एक तरी पत्र असायचेच. त्यामध्ये भारतीयांविषयी तक्रारी असत. विशेषतः युरोपीय लोकांच्या तुलनेत भारतीय कोठे कमी पडतात आणि त्यासाठी काय केले पाहिजे, असा मन बेचैन करणारा प्रश्न असे. अशा काही पत्रांमधील बेचैन करणारा काही मजकूर पुढीलप्रमाणे – "आपल्या लोकांना सर्वसामान्य बुद्धी (कॉमनसेन्स) कमीच ... त्यामुळे बारीक बारीक हुकूम द्यावे लागतात. अधिकारीसुद्धा या हुकुमातील शब्दांना पकडून बसतात, त्या मागे काय आशय (स्पिरीट) आहे, ते बघतच नाहीत."

"भारतीय मंडळी जबाबदारी घ्यायला केव्हा शिकतील? त्यांना हुकुमाची ताबेदारी करणे पसंत असते."

"विकास साधायचा असेल, तर सामान्य माणसाला प्रशिक्षण द्यावे लागेल आणि त्याचा स्तर उंचवावा लागेल."

"चांगले सरकार म्हणजे काय? देशभक्ती, न्यायबुद्धी आणि सर्वांना योग्य (फेअर) ती वागणूक देणाऱ्या अधिकाऱ्यांचा संघ निर्माण करणे."

"एके काळी सुवर्णभूमी असलेल्या भारत देशाची अशी अवनती का झाली?" हा प्रश्न त्यांना फार सतावी.

युरोपला जाऊन त्यांच्या तुलनेमध्ये आपली माणसे खूप कमी पडतात, असा त्यांचा ग्रह झाला होता. बडोदे राज्याचे शासन चालवणे म्हणजे चांगल्या अधिकाऱ्यांचा एक चमू तयार करून, निरनिराळी कामे त्यांना वाटून देणे. चांगले अधिकारी अधिक चांगले कसे तयार होतील? त्यांना जास्त चांगले प्रशिक्षण कसे आणि कोठे द्यावे? या विचारामध्ये ते सतत व्यग्र असत. कोण अधिकारी भ्रष्ट आहे? आणि कोण लाचलुचपत करणारा आहे? ते शोधून काढण्यासाठी त्यांनी निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या युक्त्यांचा उपयोग केला.

दुष्काळग्रस्त विभागाची पाहणी करत असताना, ते तंबूमध्ये राहात. एकदा त्यांना प्यायला थंडगार पाणी मिळाले नाही, म्हणून ते खूप चिडले. तेव्हा खाशेराव जाधव चिडून त्यांना म्हणाले, ''इथे दुष्काळात हजारो माणसे मरत आहेत. एक दिवस थंड पाणी मिळाले नाही, तर काय आभाळ कोसळणार आहे का?''

महाराज खाशेरावांना म्हणाले, ''हा व्यवस्थापनाचा प्रश्न आहे. थंडगार पाण्याचा नाही. जो अधिकारी महाराजांना नित्य लागणाऱ्या गोष्टींविषयी एवढा बेदरकार राहू शकतो, तो सामान्य खेडुतांची दुष्काळग्रस्त कामे किती सचोटीने करत असेल?''

राजकारण असो, धर्मकारण असो अथवा समाजकारण असो, सर्व क्षेत्रांमध्ये मनुष्यबळ व्यवस्थापन व्यवस्थित जमायला पाहिजे. कर्तव्य करत असताना हा माझा नातेवाईक आहे, हा माझा जातवाला आहे, त्यामुळे त्याला कमी शिक्षा द्या! असे करून चालणार नाही. राजा झाल्यापासून ते मनुष्यबळ व्यवस्थापनाचे काम सतत करत आले. माणूस महत्त्वाचा केव्हा ठरतो, त्याला चारित्र्य असेल तर.

महाराजांच्या मते, मुसलमानांच्या आमगनानंतर भारतीयांची, विशेषतः उत्तर भारतीयांची मने गुलामी वृत्तीची झाली. त्यामुळे धर्माचे बंधन सैल झाले. त्यामुळे माणसाचे स्खलन झाले आणि भारताचा ऱ्हास झाला. शिवाजी महाराजांमुळे महाराष्ट्रामध्ये ही प्रक्रिया थांबली आणि दीडशे वर्षे महाराष्ट्रामध्ये पुन्हा धर्माचे आगमन झाले. इंग्रज व्यापाराच्या मिषाने साऱ्या भारतभर घुसू लागले. आमच्या राजकारणामध्ये त्यांची लुडबुड सुरू झाली. त्यामुळे पुन्हा धर्माचे स्खलन झाले आणि आम्ही परतंत्र झालो. शिवाजीनंतर पुन्हा धर्माचे आगमन बडोदे राज्यामध्ये करावयाचे, लोकांच्या चारित्र्याची उंची वाढवायची आणि ती हळूहळू साऱ्या भारतभर चांगल्या व्यवस्थेद्वारे लागू करायची, असे धोरण सयाजीराव महाराजांनी आखले. आज शिवाजीप्रमाणे आपले चार जिल्ह्यांचे राज्य असले, तरी आपला प्रभाव उद्या साऱ्या भारतभर पसरणार आहेच, अशी त्यांची श्रद्धा होती. मीन्स (म्ह० मशिन्स) यांची जरूर भासते. खूप पैसा असला किंवा खूप तंत्रज्ञान प्रगत असले तरी संस्कृतीचा जो मूळ पाया 'चांगला माणूस' तो मजबूत नसेल, तर आपली व्यवस्थापनेची टोलेजंग इमारत कोसळायला किती वेळ लागणार?

गुलामी मानसिकतेमुळे राष्ट्राचे नुकसान कसे होते ते एकदा त्यांनी इतिहासकार राजवाडे यांच्याकडून समजावून घेतले होते आणि ते त्यांना फार आवडले होते. तेव्हापासून त्यांनी केवळ शहरी संस्कृतीवर भर न देता ग्रामीण विभागाकडे लक्ष द्यायला सुरुवात केली. खेडेगावामध्ये भारताची पाऊण लोकवस्ती राहाते. खेडेगावामधील माणसाची बौद्धिक, शारीरिक आणि धार्मिक पातळी वाढवली तर

आपला स्वातंत्र्याचा लढा आपण जिंकला असे म्हणता येईल, असे त्यांना वाटे. युरोपीय लोकांची नक्कल करून फक्त नागरी संस्कृतीचाच विकास करायचा, हे त्यांना पटत नव्हते. खेडी समृद्ध आणि सुपीक झाली, तरच भारताचे नंदनवन होईल, असे त्यांचे स्पष्ट मत होते.

**२. कार्य संस्कृतीचे मानसशास्त्र** – सयाजीराव उत्कृष्ट प्रशासक होते. याचे कारण त्यांचे व्यवस्थापनशास्त्राचे ज्ञान निरनिराळ्या गुरूंकडून आले होते. दत्ताप्रमाणे त्यांना अनेक गुरू होते. तरीही अनुभव हा सर्वोत्तम शिक्षक आहे, असे ते मानत असत. प्रत्येक गुरूने किंवा अनुभवाने त्यांच्या मनावर काही ना काही चांगले गुण ठसवण्याचा प्रयत्न केला. या सर्वांचा एकत्रित परिणाम ते कार्यासक्त होण्यामध्ये (वर्कोहॉलिक) झाला. त्यांचे अधिकारी तक्रार करत, "हा राजा स्वस्थ बसत नाही आणि दुसऱ्याला स्वस्थ बसून देत नाही. कठोर परिश्रम हा त्यांचा धर्मच होऊन बसला आहे." 'प्रयोगशीलता आणि उद्यमशीलता' हे त्यांचे परवलीचे शब्द बनले होते.

पं० आत्मारामांचे सयाजीरावांवर अनेक उपकार होते. त्यांनी सयाजीरावांना योगवासिष्ठ शिकवले आणि एक वेगळीच दिशा दाखविली, एक सकारात्मक द्रष्टेपण बहाल केले. महाराजांनी त्यांना 'राज्यरत्न' ही पदवी बहाल केली होती. त्यामुळे कोणतीही वाईट परिस्थिती आली, तरी ते बावचळून किंवा गोंधळून जात नसत. आत्माराम सांगत, "वसिष्ठ फार थोर ऋषी होऊन गेले. गोंधळलेल्या मानवी मनाला ताळ्यावर आणण्याचे काम प्रत्यक्ष ब्रह्मदेवाने त्यांना सांगितले होते. कोणी "मी मरतो आहे" असे म्हणत असेल, तर ते त्याला सांगत, "अं हं, तुझा पुनर्जन्म होत आहे" (सुशीला आत्मारामजी पंडित, म्हेंकती मानवता (गुज०) पृ० ८०).

भगवद्गीतेने भारतीयांना 'कर्मयोग' शिकवला. श्रीमतभागवताने भारतीयांना 'भक्तियोग' शिकवला. योगवसिष्ठाने भारतीयांना 'ज्ञानयोग' शिकवला. वसिष्ठांचा ज्ञानयोग सर्वसंग परित्यजून माणसाला अरण्यामध्ये जायला सांगत नाही. तो ज्ञानी जगामध्ये मुक्तपणे वावरायला आणि सहजतेने व मोठ्या मजेत आपली कर्तव्ये पार पाडायला सांगतो. जगामधील दुःखाचा वसिष्ठ तिरस्कार करत नाहीत; तसेच जगामधील सुखांचा त्याग करावयास सांगत नाहीत. हे ज्ञान सयाजी महाराजांना स्वतःच्या जीवनामध्ये आपल्या डोळ्यांसमोर एकामागून एक आपली मुले गेली तेव्हा फार उपयोगी पडले. दुसरा कोणी सामान्य माणूस असता, तर तो पार खचून गेला असता.

महाराज कामामध्ये इतके गढून जात असत की, मृत्यू बाहेर येऊन थांबला तरी त्यांनी त्याला सांगितले असते, "थोडा वेळ थांब, एवढे काम संपले की आलोच."

कामामध्ये त्यांना वेळेचे भान राहात नसे, म्हणून पलीकडे बसलेला ए० डी० सी० कामाची वेळ संपल्याची सूचना घंटा वाजवून देत असे. तरी त्यांचे काम सुरूच असे. दोन-तीन वेळा सूचना दिल्यावर महाराजांचे काम थांबत असे. शेवटी ते अधिकाऱ्यांना सांगत असत की, ''अरे, मला जास्त काम देऊ नका. माझ्या झोपेवर त्याचा विपरीत परिणाम होतो'' (गुराखी जेव्हा राजा होतो, पृ० १७४). कामाचा त्यांच्यामागे प्रचंड व्याप असूनही, ते कधी कंटाळलेले दिसत नसत. बडोद्यामध्ये महाराज खानदेशातून नवीनच आल्याने, आरंभापासून त्यांचे मन बडोद्यामधील व्यवहारापासून अलिप्त होते. येथे त्यांचे खास आणि जवळचे असे कोणी नातेवाईक नव्हते. असलेच तर ते शत्रू होते. त्यामुळे त्यांचा स्वभाव चौकस आणि साशंक होत गेला.

कोणत्याही व्यक्तीविषयी अथवा प्रश्नाविषयी बरे वाईट मत एकदम तयार न करता, नाना प्रकारची माहिती मिळवून आणि निरनिराळ्या जाणत्या इसमांशी त्यासंबंधी चर्चा करून, नंतर ते आपला कार्यक्रम निश्चित करू लागले. कोणालाही शब्दाने अथवा कृतीने न दुखवता, कुटुंबामधील आणि राजकारभारातील प्रमुख मंडळींचे मन सांभाळून त्यांचे हृद्‌गत हळूहळू समजावून घ्यावयाचे, असा प्रघात त्यांनी ठेवला. सुरुवातीच्या काळामध्ये उचापती करणाऱ्या लोकांकडून त्यांना इतरांविरुद्ध चहाड्या सांगण्यात येत; परंतु त्यांच्याकडून पुरावा मागितला जाताच त्यांची तोंडे बंद होत असत. अनेक वेळा असे झाल्यावर येथे आपली डाळ शिजणार नाही, अशी त्या लोकाची खात्री झाली. अवतीभवती असलेले आप्त स्वकीय, नोकरचाकर वगैरे माणसांबरोबर कारणापुरता व्यवहार ठेवून, आपल्या मनाचा थांग कोणास लागू द्यावयाचा नाही, असा मार्ग त्यांनी आरंभला (आपटे, दा० ना०, तिसऱ्या सयाजीरावांचे चरित्र, भाग १, पृ० ३११).

**३. प्रशिक्षण** – सयाजीराव हे साडेसहा वर्षे उत्तम प्रकारे प्रशिक्षित केलेले शासनकर्ते होते. त्यांच्या राजवटीच्या सुरुवातीला टी० तंजावरकर माधवरावांनी बरीचशी दक्षिण भारतातून आणलेली माणसे मेहनती, विश्वासू आणि चोख होती. त्यांच्यावर आरोपही केला गेला होता की, ते आपल्या गाववाल्यांना नोकऱ्या देत सुटले आहेत; पण सांघिक भावनेशिवाय चांगली कामे होत नाहीत. कालांतराने ती माणसे निवृत्त झाली किंवा दुसरीकडे मोठ्या पगारावर नोकरी करू लागली. महाराजांच्या हाती शासन आले, तेव्हा त्यांनी नीरक्षीरविवेक बुद्धी वापरून एकापेक्षा एक उत्कृष्ट माणसे नोकरीवर ठेवली. त्याचा जिवंत पुरावा म्हणजे त्यांनी पसंत केलेले दिवाण. त्यामुळेच बडोदे शहराला बागबगिच्यांचे आणि प्रभावी व्यक्तिमत्त्व असलेल्या व्यक्तींचे शहर (सिटी ऑफ पार्क्स अँड पर्सनॅलिटिज) असे म्हटले जाई.

**४. बुद्धिबळाचा खेळ** – सयाजीरावांचे सारे जीवन म्हणजे एक व्रत होते. शिवाजीप्रमाणे हा व्रती राजा भारतामध्ये स्वातंत्र्यपूर्व काळामध्ये होऊन गेला. त्यांच्या बालपणाच्या शिक्षकानी त्यांच्या व्रतस्थ जीवनाचा सारांश पुढील शब्दांमध्ये सांगितला आहे. "सन १८८१ अखेर सयाजीरावांस अधिकारप्राप्ती झाली, तेव्हापासून सन १९३९ रोजी त्यांचे देहावसान झाले, तोपर्यंत ५७ वर्षे राष्ट्रधर्म बाळगण्याचा आणि पुण्याच्या सार्वजनिक सभेकडून मिळालेला महाराष्ट्रबाणा जागृत ठेवण्याचा त्यांनी उद्योग केला. या दोन विरोधी भावनांचा मेळ घालणे, ही गोष्ट अशक्यप्राय होती. ती घडवून आणण्यातच त्यांचे जीवन खर्च पडले. मराठी बाणा म्हटला की, आपले करारनाम्यांनी वगैरे ठरविलेले कायदेशीर हक्क सांभाळणे, प्रजाजनांचे कल्याण आत्यंतिक उपायांनी करून दाखवणे, या गोष्टी इंग्रज राजनिष्ठेच्या कक्षेत कधीच बसणाऱ्या नव्हत्या. ही राजनिष्ठाही प्रत्येक इंग्रज अधिकाऱ्यांच्या लहरीवर अवलंबून होती. व्हाइसरॉय, मुंबईचे गव्हर्नर्स सोडले तरी गुजराथेत अधिकारावर असणारे इंग्रज अधिकारी, कमिशनर्स, कलेक्टर्स, पोलीस अंमलदार यांच्याशी सयाजीरावांचा नेहमी संबंध येणारा असून, त्यामध्ये अनेक राजकीय बाबतीत एकवाक्यता म्हणून नसे" (सरदेसाई, गो० स० सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात, १९५६, पृ० २२-२३).

"इंग्रज अंमलदारांची वृत्ती संस्थानिकास निर्माल्यवत बनवण्याची आणि हुकूमशाही चालविण्याची ही तऱ्हा कोणत्याही मानी सत्ताधीशाला मानवणारी नव्हती. महाराजांचे राज्य गुजराथेत. तेही सर्व एकजात सलग नव्हे. पालनपूर, द्वारका, बिलिमोरा एवढ्या त्रिकोणांत गायकवाडी मुलूख आणि इंग्रजांचे जिल्हे अहमदाबाद, खेडा, सुरत इत्यादीची सर्वत्र खिचडी बनलेली असल्यामुळे, पोलीस बंदोबस्त, गुन्हे, जकात अशा बाबतीत अमाप तक्रारी सारख्या सुरू असत. महाराज सज्ञान होण्यापूर्वीच मीठ, नाणी, टपाल असे राज्याचे एक एक हक्क इंग्रजांनी गिळंकृत केलेले महाराजांना ऐकू येत. त्याची चर्चा लोकांमध्ये सारखी चालल्याने महाराज अगोदरच अंतःकरणामध्ये जळू लागले आणि वेळ येताच त्याचा वचपा घेण्याची त्यांची वृत्ती बनत गेली. पण वाचाळपणा न करता गोडीगुलाबीने, हसत खेळत आणि निर्भीडपणे प्रत्यक्ष कृती करण्यामागे गोरा इलियटसाहेब त्यांचा पाठीराखा बनला. त्यापुढे रेसिडेंटची मात्रा चालेना. पुढे सेडन दिवाण असताना रेसिडेंट कॉबही असाच फिका पडला" (तत्रैव).

**५. काटकसर** – बकिंगहॅम पॅलेसपेक्षा तिप्पट आणि अमेरिकेच्या व्हाईट हाऊसच्या पाचपट मोठा लक्ष्मीविलास राजमहाल सयाजीरावांनी बांधला, त्याच्यामागे राजकीय कारण होते. ती स्पर्धा व्हाईसरीगल लॉजबरोबर होती.

भारताच्या भावी राष्ट्रपतींचे निवास्थान तितके वैभवी आणि शानदार नको का? ती पैशांची उधळपट्टी नव्हती, तर ते स्वदेश आणि स्वधर्माचे बोधचिन्ह होते.

वैयक्तिक पातळीवर ते भलतेच काटकसरी होते. सत्ता हाती आल्यावर त्यांनी लक्ष्मीविलास राजमहालामधील ६०० नोकरांची संख्या ३०० वर आणली. ते म्हणाले, "मला इतके नोकर नकोत, पण मला लोकांना बेकार ठेवणे आवडत नाही." म्हणून त्यांनी एक विश्वस्त निधी तयार केला आणि त्या निधीमधून कामावरून काढून टाकलेल्यांची काळजी घेतली. सुरुवातीला त्यांनी हे पाहिले की, प्रत्येक मोटार गाडीमागे एक मोटार यंत्रज्ञ, त्याला एक साहाय्यक आणि एक चालक होता. काही कारणामुळे प्रत्येक फियाट गाडीमागे इटालियन दोन-तीन चालक असायचे. वीस गाड्यांच्या ताफ्यावरचा हा वायफळ खर्च महाराजांनी आटोक्यात आणला आणि आपली शान कायम ठेवत बराच पैसा वाचवला (आपटे दा० ना०, तिसऱ्या सयाजीरावांचे चरित्र, भाग १, पृ० ३१२).

त्या काळचे नोकरचाकर आणि पुजाऱ्यांसारखे बरेचसे लोक व्यसनाधीन असत. मंत्रतंत्र, शकुन-अपशकुन आणि अनुष्ठाने इत्यादींचा प्रभाव पुष्कळ होता आणि त्यावर अतोनात खर्च होई. अशा वेळी हे प्रकार त्या लोकांची समजूत घालून कमी करण्याचा मार्ग त्यांनी स्वीकारला. जमनाबाईसाहेबांना विडा खाण्याची सवय असे, त्यासाठी म्हणून रोज दोन शेर चुना मागवण्यात येई. असे अवास्तव खर्च एकदम कमी करणे कठीण होते. ते त्यांनी क्रमाक्रमाने कमी करत आणले (तत्रैव). त्यामुळे नानाशास्त्री चिपळूणकर यांच्यासारख्यांना वाटे, हा राजा धर्म बुडवण्यास निघाला आहे, आपली निवड चुकीची ठरली! (पहा परिशिष्ट क्र० १, पृ० २००).

**६. योग्य माणसे हेरून ती नेमण्याचे कसब** – प्रत्येक माणसाचा, मग तो हिंदुस्थानी असो का गोरा युरोपीय, एक उपजत सद्‌गुण आणि एक स्वभावदोष प्रत्येकामध्ये असतो. तो बदलणे अवघड असते, असे महाराजांना अनुभवाने शिकवले होते. एखादा अतिचौकस, एखादा अतिचिकित्सक, एखादा अती भोळोबा, एखादा चहाडखोर, एखादा गबाळा असे मानवी स्वभावाचे वेगवेगळे नमुने जणू आपल्या सोशिकपणाची परीक्षा घ्यावयास परमेश्वराने धाडले आहेत, असे त्यांना वाटे. प्रत्येकामधील चांगला गुण पाहायचा, त्याचा भल्यासाठी वापर करायचा, दोष शक्य तेवढा पचवायचा आणि तो आपल्या राज्यासाठी कसा छान उपयोगी पडत आहे, असे सांगून त्याचा उत्साह वाढवायचा. ही 'सयाजी-नीती' त्यांच्या राज्याच्या उत्कर्षासाठी उपयोगी पडली.

कोण चांगला आणि कोण वाईट आहे, हे त्यांच्या अनुभवाप्रमाणे स्थल-काल-परिस्थितीनुसार ठरत असते. माणसाला स्थल, काल आणि परिस्थितीचे अचूक

ज्ञान प्राप्त करून घेण्याची सवय, स्वतःला लावून घ्यावी लागते. तरच अनुभवाप्रमाणे कोण पाण्यामध्ये केव्हा बसेल, कधी दगा देईल, कधी कामचुकारपणा करेल आणि कोणाची दानत केव्हा बिघडेल, या सर्वांची माणसाला आधी कल्पना येऊ शकते आणि त्यानुसार तो पूर्वतयारी करू शकतो. महाराजांनी त्यासाठी आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येकाचे मन 'वाचण्याची' सवय स्वतःला लावली होती. त्यांचे सचिव वि० पां० नेने सांगत, ''महाराज खूषीत असले, तर ते आम्हाला अमुक माणूस कसा वागेल त्याविषयी आधीपासून सांगत आणि नेमका तो तसाच त्या काळामध्ये वागे!'' कधी कधी सांगत, ''हा पुण्याचा आहे. तो खूप स्वाभिमानी असेल. तो आपल्याकडे मागणार नाही, तेव्हा त्याची गरज किती आहे ते शोधून काढून त्याला योग्य ती मदत पोहचविण्याची व्यवस्था करा. यशवंत कवी, कोशकार केतकर, पांगारकर वगैरेंच्या बाबतीत हे अगदी खरे ठरलेले मी अनुभवले आहे. युरोपीयांच्या बाबतीतले त्यांचे अंदाज कधी खोटे ठरत नसत'' (नेने, मनोरमाबाई, (लेखकाच्या मातोश्री) यांची आठवण).

'समान आचारविचारांची माणसे एकत्र येतात' या इंग्रजी भाषेतील म्हणीप्रमाणे महाराज आयरीश, स्विस, जर्मन, फ्रेंच अशा तज्ज्ञांना कोठून कोठून शोधून काढून आपल्या पदरी ठेवत असत. गोऱ्या साहेबांना नोकरीमध्ये ठेवले की, रेसिडेंट खुष असे. गोऱ्या साहेबाला मराठी आणि गुजराथी भाषा येत नसल्यामुळे, त्याच्यासमोर महाराजांना इतरांशी मोकळेपणाने बोलणे सोपे जाई. महाराजांनी शेतकी खात्याचा प्रमुख म्हणून कार्यालयामध्ये कामाला सुरुवात केली की, ते अजिबात उठत नसत. आदर्श बागायती शेती (मॉडेल फार्म) घेतलेल्या प्रत्येक वस्तूची किंमत मोजल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. तोच आदर्श इतरांनाही साहजिकच ठेवावा लागे! हिंदी स्वातंत्र्याच्या ध्येयाशी ते एकरूप होते. काँग्रेसविरुद्ध कारस्थाने करणाऱ्यांना ते थारा देत नसत. अली बंधूंपैकी महंमदाला त्यांनी एका वर्षामध्ये काढला!

त्यांच्या हाताखाली काम करणारे गोवंडे लिहतात, ''१९३६ मध्ये माझ्या हाताखाली एक जागा खाली झाली. पुष्कळ अर्ज आले. त्यांची यादी बनवून एका सिंधी मुसलमानाच्या समोर साहेबांनी फुली मारून, ते सर्व अर्ज साहेबांनी माझ्याकडे निवडीकरता धाडले. ॲलनसाहेबांनी ती फुली का मारली, कदाचित माझी परीक्षा घेण्यासाठी तर नसेल ना, असा माझ्या मनात संशयदेखील आला.'' त्या मुसलमान उमेदवाराने त्याच्या परिचयपत्रामध्ये लिहिले होते ''आमचे सर्व कुटुंब सरकारला वफादार आहे. आमच्या कुटुंबांत अमुकअमुक माणसे पोलीस आणि हेर खात्यात आहेत. त्यांनी काँग्रेस पक्षाची सर्व पाळेमुळे खणून काढून व

मुख्य कार्यकर्त्यांना शोधून काढून कडक शिक्षा करविल्या आहेत. आम्ही सर्व इंग्रज सरकारच्या सेवेत तत्पर आहोत. तरी मला नोकरी द्यावी. बरोबर प्रमाणपत्रे जोडली आहेत.'' ॲलनसाहेब गरम होऊन म्हणाले, ''या माणसाचा तू बिलकूल विचार करू नकोस. आपल्याच देशबांधवांचे गळे कापणारी ही लाजिरवाणी माणसे आपल्या खात्यामध्ये उपयोगाची नाहीत. आपले शेतकी खाते सेवावृत्तीचे (मिशनरी) आहे.'' मी विचारले, ''या बाबतीत आणखी काही पत्रव्यवहार झाला तर काय करायचे?'' त्यावर साहेब म्हणाले, ''असे झाले तर आपण त्यांना लिहायचे, सरकारची असली बहुमौलिक सेवा करण्याबद्दल कदर करण्याची शक्ती आमच्या खात्यामध्ये नाही. त्याकरता त्याने राजकीय विभागाकडे जावे. तेथे त्याला पारितोषिक म्हणून छान नोकरी मिळेल. अशा कामाला देण्यासाठी त्यांच्याकडे पुष्कळ पैसा असतो'' (गोवंडे, डॉ० गो० कृ०, स्मृतिविहार, पृ० १४१-४२).

बडोद्यामध्ये इंग्रज सरकारने बरेच भारतीय आणि युरोपीय लोकांना गुप्तचर म्हणून ठिकठिकाणी नेमले होते. त्यामधील कोण किती धोकादायक आहे, हे सामान्यांना समजणे अशक्य होते. याशिवाय महाराजांनी काही गोऱ्यांना आपल्या राज्यामध्ये नोकरीला ठेवले होते. महाराजांची ती विश्वासू माणसे होती. तरी त्यांच्या मनामध्ये सारखे येई, 'कातड्यापेक्षा आतड्याची ओढ अधिक असते.' इंग्रज सरकार 'फोडा आणि राज्य करा' या कलेमध्ये निष्णात होते. म्हणून मोठ्या हुशारीने त्यांनी निरनिराळ्या राष्ट्रांमधील माणसांची निवड केली होती. त्यांच्या त्यांच्यामध्ये थोडा फार दुरावा असणे, मानसशास्त्रीयदृष्ट्या अगदी स्वाभाविक होते. इराणी, दुराणी, तुर्क, मोगल या सर्वांमध्ये तेढ, हेवेदावे आणि चुरस होती, याला इतिहास साक्षी आहे. इंग्रज आणि फ्रेंचांचे देखील कधीच पटले नाही. हे मानसशास्त्र ध्यानात ठेवून, महाराजांनी बडोदे हे निरनिराळ्या गोऱ्या तज्ज्ञांचे जणू एक प्राणी संग्रहालय (झू) बनवले होते. प्रत्येकाला वेगळा पिंजरा, वेगळा खुराक आणि सुखसोयी. काही निवडक तज्ज्ञांची यादी पुढीलप्रमाणे – १. स्टेट ब्रास बँड – फाहे आणि मेजर आर० वुड (इंग्रज), २. लायब्ररी सायन्स – डब्ल्यू० ए० बोर्डन (येल युनि० अमेरिका), ३. रेल्वे इंजिनियर अँडरसन (स्कॉटलँड), ४. एक्साईज कमिशनर – आर० सी० व्हिटनेक (हार्वर्ड, यु० एस०), ५. शिल्पकला तज्ज्ञ – ए० फेलिसी (इटालियन), ६. आर्ट क्रिटीक – एन० एच० स्विलमन (द टाईम्स, लंडन), ७. बँक ऑफ बरोडा – सी० ई० रँडल (इंग्रज) वगैरे.

७. सर्व्हे

**अ) मानसशास्त्र** – सयाजीरावांच्या डोक्यामध्ये इलियट साहेबाने पक्के भिनवले होते, ''माहिती मिळवा, कामाचे नियोजन करा आणि त्याप्रमाणे त्याची

अंमलबजावणी करा.'' (गॅदर इंटलिजंट इन्फर्मेशन, प्लॅन आउट द वर्क अँड वर्क आउट द प्लॅन). माहिती पाहिजे, पण ती उपयुक्त असावी. वेळ, पैसा आणि शक्ती वाचवणारी व कल्पकतापूर्ण असावी. त्यासाठी योग्य माणूस हवा. त्याला खुष ठेवण्यासाठी कितीही पैसा ओतला, तरी तो कमीच असतो. कारण असा माणूस मिळणे तुमच्या भाग्यामध्ये लागते. महाराज अशा माणसांच्या शोधामध्ये नेहमी असायचे; पण त्यांची बहुतेक वेळा फसगतच व्हायची. त्या वेळी त्यांना प्रकर्षाने त्यांच्या 'इलियट सरांची' आठवण व्हायची.

**आ) नानावटी** – या साऱ्या गडबडीमध्ये महाराजांना एक एकदम योग्य अधिकारी मिळाला होता. त्यांचे नाव मणीलाल नानावटी. महाराजांनी त्यांना न्यायखात्यामध्ये उमेदवार (प्रोबेशनर) म्हणून घेतले होते. त्यांच्यामधील गुण पाहून महाराजांनी त्यांना 'जैन धर्मातील जातिव्यवस्था' या विषयावरील माहिती गोळा करण्यासाठी सांगितले. नानावटींनी या अवघड विषयावरील दुर्मीळ माहिती गोळा करून त्याचा अहवाल सहा महिन्यांमध्ये महाराजांच्या हाती सोपवला. महाराजांना तो एवढा पसंत पडला की, त्यांनी त्याचे पुस्तक छापून प्रसिद्ध केले. महाराजांना आश्चर्य वाटले, नानावटी काही जैन नाहीत, ते ब्राह्मण आहेत. तरी देखील त्यांनी एवढी सखोल माहिती कशी बरे गोळा केली असेल? काही महिन्यांनंतर महाराजांनी त्यांना दुसरा तत्संबंधित विषय दिला. 'जैन धर्मातील मूर्तिपूजा.' श्वेतांबर जैनांच्या मूर्तिपूजेवर नानावटींचा हा प्रबंध सहा महिन्यांमध्ये तयार झाला. पुढे दिगंबर आणि इतर उपपंथीयांवर ते लिहिणार होते.

गुजराथमध्ये १९०० मध्ये फार मोठा दुष्काळ पडला. महाराजांनी नानावटींना 'गुजरातमधील शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा' या विषयावर स्थानिक तलाठ्यांची मदत घेऊन, संपूर्ण अहवाल तयार करण्यास सांगितले. १९०१ पर्यंत नानावटींनी सारी माहिती गोळा केली. त्या माहितीचा उपयोग महाराजांनी शेतकऱ्यांना योग्य ती मदत करण्यासाठी केला. महाराष्ट्रामध्ये सार्वजनिक सभेने असा प्रयत्न केला होता आणि सरकारने शेतकऱ्यांची कर्जे माफ करावी, अशी मागणी केली होती. नानावटींच्या अहवालामुळे कोणाची कर्जे माफ करायची आणि कोणाची करायची नाहीत, याची संपूर्ण माहिती महाराजांच्या हाती तयार होती. या अहवालामुळे शेतकरी कर्जात का डुबतो, याची कारणेही (उदाहरणार्थ दारू, मुलीचे लग्न वगैरे) समजली. महाराष्ट्रात जसा शेतकऱ्यांमध्ये असंतोष माजला, तसा प्रकार गुजराथमध्ये घडला नाही. महाराष्ट्रातील शेतकरी आणि त्यांचे पुढारी सतत ब्रिटिश सरकारला बडोद्याचे उदाहरण देऊन, हैराण करत. महाराजांनी खुष होऊन नानावटींना उच्च शिक्षणासाठी अमेरिकेच्या व्हॉर्टन स्कूल ऑफ फायनान्समध्ये

धाडले. महाराज पुढे जपानमार्गे टोरांटोला गेले होते. तेथे त्यांनी नानावटींना बोलावून घेतले. महाराजांनी नानावटींना विचारले, ''मी तुम्हाला अमेरिकेत का धाडले ते माहीत आहे काय?'' नानावटींनी उत्तर दिले, ''माझ्या कामामध्ये जास्त कार्यक्षमता, अधिक हुषारी आणि धडाडी यावी म्हणून.'' सयाजीराव म्हणाले, ''मला बडोदे एक आदर्श राज्य निर्माण करायचे आहे आणि त्या कामामध्ये तू मला केलेली मदत माझ्या स्वप्नांशी जास्तीत जास्त जवळीक राखणारी आणि जास्त सकस व्हावी म्हणून.'' पुढे १९२२ मध्ये महाराजांनी नानावटींना स्वतःबरोबर आपल्याला जेथून नवनव्या कल्पनांची स्फूर्ती मिळते त्या युरोप खंडामधील भारताप्रमाणे रोम, अथेन्स, फ्रान्स, जर्मनी वगैरे प्राचीन संस्कृती म्हणून ओळखल्या जाणाऱ्या देशातील प्रेक्षणीय स्थळांची यात्रा घडवली. हेतू हा की, त्यांनादेखील प्राचीन काळापासून ओळखले जाणारे बडोदे हे 'आदर्श शहर' म्हणून निर्माण व्हावे, अशी प्रेरणा मिळेल.

नानावटी बडोदा येथे परत आल्यावर '१९११ च्या मध्यभागी दिसणारी गुजराथमधील शेतकऱ्यांची नादारी' याची पाहणी करण्याचे काम महाराजांनी त्यांच्यावर सोपवले. त्यानंतर पुढील एक दशक त्यांना महाराजांनी पुढीलप्रमाणे वेगवेगळ्या पाहण्या सोपवल्या. १) खासगी खात्यामधील (पर्सोनेल डिपार्टमेंट) ८५० नोकरांची सामाजिक आणि आर्थिक पाहणी (१९१४), २) युरोपच्या तुलनेत गुजराथमधील व्यवसाय संघ (गिल्डज), ३) म्हैसूर संस्थानामध्ये भरलेल्या आर्थिक परिषदेचा विशेष अभ्यास (दुग्धव्यवस्थापन) कडबा संग्रहाची व्यवस्था आणि गोधनाचा विमा उतरवण्याची व्यवस्था यांच्या संदर्भात (१९१५), ४) युरोपमध्ये आहे तशा स्वरूपाची चांदी आणि सोने यांच्या शुद्धता छापाची (हॉलमार्क) व्यवस्था येथे होऊ शकेल का? त्याचा सखोल अभ्यास आणि अहवाल, ५) बडोद्यामध्ये वार्धक्य निवृत्ती वेतनाच्या व्यवस्थेऐवजी अनाथाश्रम आणि अशक्ताश्रम यांच्या स्थापनेची शक्यता (१९१८), ६) चरोतरमधील भाडकड नावाच्या खेडेगावाची आर्थिक पाहणी (१९१५), ७) बडोदे संस्थानाच्या आर्थिक विकासाची पाहणी, ८) बडोदे संस्थानातील संख्याशास्त्रीय व्यवस्थेची पुनर्रचना – प्रत्येक खेडेगाव, प्रत्येक तालुका, प्रत्येक जिल्हा आणि सरतेशेवटी सर्व संस्थानामधील व्यवस्था किती परिपूर्ण आहे आणि बडोदे हे आदर्श संस्थान (मॉडेल स्टेट) होण्याच्या दृष्टीने त्यामध्ये जरूर असेल तर कोणते आणि कशा प्रकारचे बदल असावेत? त्याला त्यांनी 'आदर्श पत्रक' असे नाव दिले.

नानावटींचे हे एक उदाहरण म्हणून सांगितले. अशा अनेक नानावटींचा महाराजांनी प्रयोगासाठी उपयोग केला. काही पहिल्या वर्गामध्ये यशस्वी झाले, तर

काही दुसऱ्या वर्गामध्ये यशस्वी झाले. काही मात्र एकदम नापास (टोटल फेल्युअर) झाले. अशा मंडळींना महाराजांनी नेहमीच दूर ठेवले. त्यामुळे स्वजातीयांचा त्यांनी रोष ओढवून घेतला. महाराजांना कामामध्ये रस होता, जातीमध्ये नाही. "मला राज्याचा आणि देशाचा उद्धार करावयाचा आहे. एका जातीचा केवळ विचार करून कसे चालेल?" असे ते नेहमी म्हणत असत.

८. **पर्यवेक्षण आणि व्यवस्थापन** – गुलामी वृत्तीमुळे हिंदी माणसांना सर्कसमध्ये असतो त्याप्रमाणे सतत एका रिंग मास्टरची जरूर असते. तो नसेल तर ही माणसे काम करत नाहीत. महाराजांची समस्या होती, एवढे पर्यवेक्षक कोठून आणायचे ? आर्थिकदृष्ट्या ते मोठे ओझे आपल्याला परवडेल का? म्हणून आपल्या माणसांना शिस्त, स्वावलंबन, चारित्र्य इत्यादींचे धडे शिकवून शासकीय कवायती फौज निर्माण करण्याकडे, त्यांचे विशेष लक्ष असे. चमच्यांची तर त्यांना मनस्वी चीड होती. अधिकारीवर्ग चोख काम करतात किंवा नाही, लाच घेत नाहीत ना, यासाठी ते वेष बदलून बडोद्यामध्ये फिरत. गोवंड्यांचा हा अनुभव वाचण्यासारखा आहे.

एक दिवस रविवारी अंधाऱ्या पहाटे आम्ही दोघे जण जवळजवळ धावतच निर्जन जेल रोडने कमिटी बागेकडे जात असताना एक गृहस्थ रस्त्यामध्ये भेटले. मोठा पण जुना कोट, डोक्यावर हॅट व हातात काठी घेतलेल्या त्या गृहस्थाने आम्हाला थांबवले.

"अरे मुलांनो, कोठे चाललात धावत?"

"आम्ही बॉय स्काउटला जात आहोत."

"अरे, पण आज रविवार, शाळेला सुट्टी असते ना?"

"पण आज खरी मजा असते. आज सर्वांचीच हजेरी असते. जुने खेळ होतात आणि नवे खेळ शिकविले जातात."

"रविवारी मुलांना बोलावणे म्हणजे वाईटच नाही का? तुमचे पालक कोणी विचारीत नाहीत?"

"पालकांना फार आनंद होतो. तेच आम्हाला पहाटे उठवितात."

"पण धावताहात का? सावकाश चालत जावे."

"साडेसहाला हजेरी असते, बिगुल वाजतो. मग आता धावावे, नाही तर काय करावे?"

"अरे, पायात वहाणाही नाहीत आणि अंधारात ठेच लागली म्हणजे?"

"पण मग पळत कसे जायचे?"

"ते राहू द्या. पण तुमचे मुख्य कोण आहेत? आणि ते असा तुम्हांला त्रास देण्याचा उपद्व्याप का करतात?"

"आमचे मुख्य प्रसाद बॉय स्काउट कमिशनर आहेत आणि रविवारी पण आम्ही मनापासून जातो."

"प्रसाद? ऐकले आहे त्यांचं नाव. फार वाईट वागवतो म्हणे मुलांना. शिव्या देतो. पालक फार तक्रारी करतात गावात."

"कोण म्हणतो असं? आमचे स्काऊट कमिशनर गोड बोलतात. खूप माहिती इंग्रजीमध्ये आम्हाला समजेल अशी सांगतात आणि कोण म्हणतं शिव्या देतात? वा, उलट आम्हाला शपथ घ्यावी लागते की, मी सत्य सांगेन. प्रत्येकाशी गोड बोलेन, गरिबांना मदत करेन."

"लवकरच जाणार आहेत म्हणे, बरं होईल, तुम्ही सुटाल त्यांच्या जाचातून."

"पण आम्ही त्यांना जाऊच देणार नाही; ते आमचे लाडके आहेत. बरं जाऊ आम्ही आता? उगीच बराच वेळ वाया गेला. आता आम्ही धूम ठोकणार."

"जा बरं, परंतु पुढच्या रविवारी तरी घरी झोपून राहा."

"मग तुम्ही तरी कशाला कडाक्याच्या थंडीत बाहेर पडलात?"

शेवटचे वाक्य मी कुत्सितपणे बोललो, तोच मागच्या बाजूने अंधारातून एक नखशिखांत मिलिटरी गरम ड्रेस घातलेला उंच मनुष्य आमच्यापर्यंत आला आणि त्या गृहस्थास आदबीने म्हणाला, "महाराज, आता जायचं का परत?"

अरे बाप रे, म्हणजे हे सयाजीराव महाराज स्वतःच होते की. वस्तुस्थिती अशी होती की, प्रसाद स्काउट कमिशनर हे फार मोठ्या पगारावर आणले गेले होते आणि काम काय तर म्हणे मुलांना खेळवायचे. म्हणून बडोद्यामधील काही ऑफिसर्स प्रसादांचा हेवा करत असत. महाराजांच्या कानावर जाईल असा प्रसादांच्याबद्दल अपप्रचारही करत असत. प्रसादांची नोकरीची पहिली मुदत संपल्यावर ती वाढवावी की नाही, ह्या विचारात महाराज कदाचित असतील; पण आमच्याशी ह्या सहजासहजी झालेल्या भेटीने त्यांच्या मनातील मळमळ निघून गेली असावी. इनक्वायरी कमिटी नेमून किंवा हेरखात्याला सांगून सुद्धा महाराजांना जे कळले नसते, ते आम्हा निष्पाप मुलांकडून त्यांना कळले व ते निश्चित झाले. प्रसाद यांना नोकरीत चालू ठेवण्याचा हुकूम झाला (डॉ० गोवंडे, गंगाधर कृष्ण, 'स्मृतिविहार', पृ० १४-१५)

**९) हायर अँड फायर उच्चपदस्थ**

**अ) मानसशास्त्र** – कोणीही माणूस फार काळ एका पदावर स्थिरावला की, हळूहळू तो भ्रष्टाचाराच्या जाळ्यामध्ये फसला जाण्याचा धोका वाढतो. टी० माधवरावांच्या बाबतीत सयाजीराव अल्पवयीन असल्यामुळे निर्णय घेऊ शकत नव्हते. त्यांचा कटू अनुभव सयाजीरावांसाठी पुरेसा होता. त्यामुळे त्यांनी उच्च

पदांसाठी संगीत खुर्चीचा खेळ खेळायचे नक्की केले. खालील पहिल्या क्रमांकाच्या पदाची यादी त्याचा पुरावा देऊ शकेल.

**दिवाण** – १) राजा सर तंजावरकर माधवराव (१८७५-१८८२)७ वर्षे, २) खानबहादूर शाहबुद्दीन काझी (१८८२-१८८६) ४ वर्षे, ३) बहादूर लक्ष्मणराव ज० वैद्य (१८८६-१८९०) ४ वर्षे, ४) बहादूर मणीभाई जसभाई (१८९०-१८९५) ५ वर्षे, ५) जयसिंहराव (स्टेप नी), ६) बहादूर श्रीनिवास अयंगार (१८९६-१९०१) ५ वर्षे, ७) बहादूर रामचंद्र व्ही.धामणस्कर (१९०१-१९०४) ४ वर्षे, ८) केरशासजी रूस्तम दादाचानजी (१९०४-१९०९) ५ वर्षे, ९) रमेशचंद्र दत्त (आय० सी० एस०) (१९०९) अर्धा वर्ष, १०) सी० एन० सेडन (आय० सी० एस०) (१९०९-१९१२) ३ वर्षे, ११) बिहारीलाल गुप्ता (१९१२-१९१४) २ वर्षे, १२) व्ही० पी० माधवराव (१९१४-१९२६) १२ वर्षे, १३) गणपतराव (प्रभारी), १४) व्ही० टी० कृष्णमाचार्य (१९२७-१९४३)१२ वर्षे.

**१०) उत्कृष्ट व्यवस्थापन**

एवढी धावपळ, एवढी संकटे, गोऱ्या साहेबांचा जागता पहारा आणि जातभाईंचा मत्सर. त्यामुळे रोष या सर्वांचा मनावर ताण बाळगत सयाजीराव राज्याचे उत्कृष्ट व्यवस्थापन कसे सांभाळत ? ते एक मोठे कोडे आहे. सयाजीरावांच्या व्यवस्थापनाचे रहस्य होते 'समर्पण.' एखादा चांगला माणूस पारखून त्याला एखाद्या प्रकल्पाची जबाबदारी सोपवायची आणि आपण त्याचा न कंटाळता पाठपुरावा करणे, हे त्यांच्या व्यवस्थापनाचे वैशिष्ट्य होते. त्याची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे :

१) बडोदा येथे उच्च न्यायालय होते; पण सयाजीरावांनी त्याचे नाव ठेवले 'न्यायमंदिर'. शंभर वर्षे झाली तरी सुद्धा ही इमारत नवीन वाटते. या इमारतीला एवढी वर्षे झाली, तरी रंग देण्यात आलेला नाही. सयाजीरावांचा भर काटकसरीवर होता. त्यांनी लहान उंचीच्या सपाट विटा या न्यायमंदिरामध्ये बाहेरच्या बाजूने वापरल्या आहेत. या विटा एका बाजूने 'चमकदार' (ग्लेझ) करण्यात आल्या आहेत. त्यामुळे एका वेळी काटकसर, सौंदर्य, दीर्घायुष्य आणि मजबुती असे बाह्य भिंतींना आवश्यक असलेले चार गुण उपयोगामध्ये आले आहेत. मी जगामध्ये खूप ठिकाणी हिंडलो आहे; पण विटांना एका बाजूने चमकदार करण्याचे तंत्र सयाजीराव महाराजांनी कोठून आणले, देवालाच ठाऊक. मला हे तंत्र इतरत्र कोठेच पाहावयास मिळालेले नाही.

२) आमच्याकडे पावसाच्या पाण्याचे गटार वेगळे आणि संडासाचे गटार वेगळे असे. अशा विभागणीमुळे पाऊस कितीही पडला, तरी पाणी पटकन वाहून जात

असे. हल्ली थोडासा जरी पाऊस पडला तरी रस्त्याची नदी होते. हल्लीच्या अभियंत्यांनी त्या दोन्ही गटारमार्गांची भेसळ करून, रस्त्याची पार वाट लावली आहे. पुष्कळदा साचलेल्या पाण्याचा निचरा व्हायला चार चार दिवस लागतात.

३) बडोदा येथे पिण्याचे पाणी आजवा तलावातून येते. ही सारी व्यवस्था साध्या उंचीच्या आणि गुरूत्वाकर्षणाच्या तत्त्वावर आधारित आहे. आजवा तलाव हा उंचावर बांधला आहे. पाणी गुरूत्वाकर्षणामुळे बडोद्यामध्ये येते. कालव्यांद्वारा शहराला केलेल्या पाणी पुरवठ्याचा (लिफ्ट इरिगेशन किंवा पंपिंग) खोटा खर्च नाही.

४) बडोदे संस्थानामध्ये दप्तरखान्याची (अर्काइव्हज) स्वतंत्र इमारत होती. जमिनींची आणि राज्याची शासकीय कागदपत्रे फार महत्त्वाची असतात. समजा, चुकून तेथे आग लागली तर पाच मिनिटांमध्ये ती आग विझली पाहिजे, म्हणून आपोआप जोराने पाणी पुरवले जाण्याची व्यवस्था छताला नळ जोडून केली होती.

५) बडोद्याचे आर्ट्स कॉलेज सुप्रसिद्ध आहे. या महाविद्यालयाच्या देखभालीच्या खर्चासाठी एक स्वतंत्र निधी होता आणि त्या निधीच्या व्याजामधून या इमारतीच्या देखभालीचा खर्च करण्यात येई.

६) त्या काळी आजच्यासारख्या मोटारी आणि फटफट्या यांचा सुळसुळाट नव्हता. घोडागाड्या असत. रस्त्यावर जागोजागी सफाई कामगार काम करताना दिसत. घोड्याची लीद रस्त्यावर पडली की, लगेच रस्ता साफ केला जाई!

७) बडोद्यामध्ये 'कलाभवन' नावाचे तंत्रज्ञानाचे कॉलेज होते. दादासाहेब फाळके हे पहिले चित्रपट निर्माण करणारे या कॉलेजचे विद्यार्थी होते. राज्याचे यांत्रिक काम 'कलाभवन'मधून करवून घेण्यात येई. आपल्या संस्थानची स्वतःची तंत्र-कार्यशाळा असताना उगाचच इतर लोकांना आपली मागणी का द्यावी, असा सयाजीरावांचा विचार होता. उदाहरणार्थ गटारामधील घाणेरडे वायू जाण्यासाठी हिरव्या रंगाचे उंच उंच खांब या कलाभवनामध्ये ओतले जात असत. डोक्यावर एक गोल गोळा आणि खाली बाण असे. बाण गटाराची दिशा दर्शवत असे. त्यांना त्या दर्पाचा त्रास होऊ नये म्हणून, सर्व इमारती या खांबाच्या उंचीच्या खाली असत. कोणाला इमारत उंच बांधायची असेल, तर एक पोकळ ओतीव खांब त्याला जोडत म्हणजे ही नवी इमारत घाण वासाच्या दृष्टीने सुरक्षित राही. क्रांतिकारक या कलाभवनामध्ये बेकायदेशीररित्या रात्रीच्या अंधारामध्ये बॉम्बचे कवच गुपचूप तयार करत असत. इतरांना त्याचा पत्ताही लागत नसे.

८) बडोद्यामध्ये पूर्वी जेल रोड किंवा सध्याचा इंदिरा ॲव्हेन्यू नावाच्या रस्त्यावर दोन्ही बाजूंनी वडाची झाडे लावली होती. त्यामुळे भर दुपारी सुद्धा

रस्त्यावर ऊन येत नसे आणि पलीकडेच असलेल्या सयाजी रुग्णालयामध्ये वडावरून येणारा वारा सतत मिळे आणि तेथे थंडावा राही. या रस्त्याच्या दोन्ही टोकांना एक पाटी होती –

'यांत्रिकी वाहनाला बंदी आहे.' मोटार वा फटफटी तेथून जात नसे. घोडागाडी किंवा सायकलींना त्या रस्त्यावर परवानगी होती. यामागे रुग्णांना मोटार आणि फटफट्या यांच्या आवाजाच्या त्रासाबरोबरच पेट्रोल आणि डिझेल यांचे प्रदूषण होऊ नये, हा उद्देश प्रामुख्याने होता.

९) गोविंदराव मध्यवर्ती शाळा ही प्राथमिक शाळा शहराच्या मध्यभागी आहे. ती तीन मजली आणि प्रशस्त बांधल्यामुळे त्या अभियंत्याचा सन्मान करण्यात आला. मात्र दुसऱ्या दिवशी त्याला बोलावून त्याच्या हाती त्याच्या बडतर्फीचा आदेश देण्यात आला. त्याला सांगितले, "बडोद्यामध्ये जागा कमी आहे का? ही प्राथमिक शाळा आहे. प्राथमिक शाळा फक्त तळमजल्याचीच असली पाहिजे. मुले लहान असतात. ती दंगामस्ती करणारच. तिसऱ्या मजल्यावरून मुलगा पडला आणि मेला, तर मी त्याच्या आईबापाना तोंड कसे दाखवू?"

१०) पायऱ्या बांधण्याचे शास्त्र आहे. स्टेशनजवळ आर्ट्स कॉलेजच्या शेजारी सायन्स कॉलेज आहे. हल्ली त्याच्या शेजारी 'हंसा मेहता लायब्ररी'ची इमारत बांधलेली आहे. दोघांची उंची सारखीच आहे; पण सायन्स कॉलेजच्या पायऱ्या चढल्यावर दम लागत नाही, पण हंसा मेहता लायब्ररीच्या जिन्याच्या पायऱ्या चढल्या की दम लागतो आणि पाय दुखू लागतात.

११) ललित कला सादर करणाऱ्या महाविद्यालयासमोर सुरसागर तलाव आहे. तेथे बोटिंग क्लबची इमारत बांधली आहे. पण अशा बेताने खालच्या स्तरावर बांधली आहे की, या महाविद्यालयाचा देखावा समोरच्या काठांवरून बघितला तरी झाकला जाऊ नये. याउलट, पद्मावती चौगान हल्लीच्या काळात बांधले आहे. त्यामुळे न्यायमंदिर आणि महात्मा गांधी नगरगृह यांची शोभा रसातळाला गेली आहे. दिल्लीच्या पालिकाबाजारप्रमाणे तेथे जमिनीखाली (अंडरग्राऊंड) इमारत बांधून वर सुंदर बाग करता आली नसती का? पण या नव्या राज्यामध्ये 'सत्यं शिवं सुंदरम'चे अधिकाऱ्यांना वावडे आहे.

१२) बरोबर शंभर वर्षांपूर्वी बडोद्यामधील काही लोक विजेचे देयक (बिल) अनधिकृतपणे वीजमापक यंत्रामध्ये फेरफार (मीटर टँपरिंग) करून भरत नसत. त्यांनी विजेच्या ग्राहकांचे गट केले होते आणि गटाचे सरासरी बिल किती येईल याचा अंदाज केला होता. एखाद्या गटाचे बिल कमी आल्यास, त्या गटातील प्रत्येक घराचा कसून तपास केला जाई आणि विजेची चोरी करणाऱ्यास आणि त्या

गटाधिकाऱ्यास शिक्षा होई. आज भारतभर विजेची चोरी ही मोठी डोकेदुखी होऊन बसली आहे.

**११) तुलना होणे अटळ –**

ब्रिटिश शासन म्हणजे "मोले घातले रडाया, नाही आसू आणि माया।" गोखले यांच्यासारखी इंग्रजधार्जिणी माणसे जेव्हा बडोद्याशी तुलना करून विधानसभेमध्ये सांगत, "इंग्रजी शासन बडोद्यापेक्षा कमी दर्जाचे आहे," तेव्हा इंग्रज अधिकाऱ्यांना इंगळ्या डसल्यासारख्या वेदना होत. या दोन शासनांमध्ये फरक काय आहे? या प्रश्नाचे उत्तर गो० स० सरदेसाई या महाराजांच्या शिक्षकानेच दिले आहे. "हिंदुस्थानच्या सामान्य माणसास नुसती मामलेदाराची भेट घेण्यास कोण मारामार पडते. मग कलेक्टर किंवा गव्हर्नर यांचे तर नावच नको. आधी परकी भाषा, गर्व्हनरांचे सभोवार नेहमी कडक पहारा. खुद्द आपल्या खिशात पिस्तुल घेतल्याशिवाय ते बाहेर पडायचे नाहीत. थोरामोठ्यांची भेटसुद्धा ते साशंकतेने घेणारे. शिवाय गव्हर्नर वगैरे सर्व मुदतबंदीचे नोकर, अधिकार संपून परत गेले की, पुन्हा सामान्य जनतेत जमा. सयाजीरावांचा प्रकार त्यातला नाही. लहानांपासून थोरांपर्यंत त्यांच्या दीर्घ कारकिर्दीत प्रत्येक प्रजाजनाला अशी खात्री वाटे की, माझी दाद घेतील असे एक गृहस्थ आज विद्यमान आहेत. आपले गाऱ्हाणे कानावर घातले की, माझे दैव उघडणार. अशी ही मनोमन खात्री घटकाभर अधिकार गाजवणाऱ्या इंग्रजांबद्दल लोकांना का वाटावी? खिशात पिस्तुले बाळगून का लोकप्रेम संपादन करता येते? मला पक्के आठवते, द्वारकेच्या दूर मामलतदाराचा एक शिपाई होता. त्याने आपणावर काही अन्याय झाला, अशी तक्रार पैशाच्या पत्राद्वारे महाराजांच्या नावाने टपालातून पाठवली. मी त्या वेळी महाराजांचा 'रीडर' होतो. महाराजांनी सर्व टपाल पाहिले. त्यामध्ये त्यांच्या नजरेस हे पत्र आले. लगेच त्यांनी हे पत्र महसूल खात्याच्या मुख्याकडे पाठवून हुकूम लिहिला की, द्वारकेच्या शिपायाची तक्रार खरी खोटी आहे का, याचा तपास करावा आणि योग्य न्याय केल्याची खबर हुजुरांस जाहीर करावी. दहा दिवसांत निकाल होऊन त्या शिपायाचेच पत्र महाराजांच्या नावे आले की, मला न्याय मिळाला. आता माझी तक्रार काही नाही. असा प्रकार इंग्रज कलेक्टर किंवा इतर अधिकाऱ्यांच्या बाबतीत कितीसा होतो आणि त्यांना सयाजीरावांसारखी मान्यता का मिळत नाही याचे उत्तर द्यावे" (सरदेसाई, गो० स०, सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात, पृ० ३०-३१).

भारतीय शेतकरी म्हणजे बिनडोक, म्हणून विचार न करता यंत्रवत काम करणारा, कारकून. म्हणजे खोटे बोलणारा, सबबी सांगणारा आणि भ्रष्टाचार करणारी शासनाला लागलेली वाळवी. नोकर म्हणजे सांगकाम्या वगैरे इंग्रज

साहेबाने लोकप्रिय केलेली बोधचिन्हे सयाजीरावांना बदलायची होती. विशेषतः भ्रष्टाचाराची त्यांना नफरत होती. पैशामुळे माणसाची दानत बिघडते, इभ्रतीच्या भ्रांत कल्पना सुचतात आणि रुजतात. त्यामुळे पैशाचे महत्त्व कमी करून, सुखसवलती द्यायला त्यांनी सुरुवात केली. उदाहरण म्हणजे माझ्या वडिलांना त्यांनी अकरा नोकर देऊ केले होते. एक द्वारपाल, दुसरा टपाल आणणारा, तिसरा केर काढणारा वगैरे. माझ्या आईने त्यापैकी फक्त तीन-चारच ठेवून घेतले. इतर नोकर सरकारकडे परत केले! या नोकरांच्या तांड्यामागे मोठ्या अधिकाऱ्याच्या घरचे व्यवहार पारदर्शक असावेत, असाही सयाजीरावांचा हेतू असे; पण त्यांना मानवी स्वभाव बदलणे शक्य झाले नाही. भ्रष्टाचार कमी झाला, पण तो पूर्ण संपला असे नाही. त्याचे उदाहरण माझ्या काकांनी लिहिले आहे. ''त्या काळी बडोद्यामध्ये खिचडी नावाचा एक प्रकार चालत असे. गरिबांना खिचडी देण्यात येत असे. मुसलमानांना 'पक्की' म्हणजे शिजवलेली खिचडी देण्यात येई आणि हिंदूंना 'कोरडी' खिचडी म्हणजे शिधा वाटत असत. ही खिचडी कुबेरेश्वर दत्त मंदिराजवळील शंकराच्या देवळामध्ये वाटत असत. त्यामध्ये अर्धा शेर तांदूळ आणि पाव शेर तुरीची डाळ देण्यात येई. त्याशिवाय दशमी किंवा द्वादशीला मुंज झाली असेल, अशा ब्राह्मण मुलाला एक आणा दक्षिणा देत. शिवाय एकादशीचे दिवशी वऱ्याचे तांदूळही वाटत. ही खिचडी आणि दक्षिणा मिळवण्यासाठी शेजारच्या बाई मला तेथे घेऊन जात. दक्षिणेशिवाय खिचडीही मला मिळेच. खिचडीसाठी आलेल्याला मंदिरामध्ये घेत आणि दिंडी दरवाजा बंद करून, खिचडीचे वाटप सुरू होई. खिचडी मिळाल्याबरोबर त्या माणसाला दरवाजाबाहेर काढीत'' (नेने, म० पां०, निवृत्त न्यायाधीश, यांचे अप्रकाशित आत्मचरित्र).

''खिचडी घेऊन बाहेर पडल्याबरोबर बाहेर मोठा बाजार भरलेला असे. इतर काही वस्तू घेण्यासाठी कुणास रोख पैसे हवे असले, तर तो इसम आपली खिचडी तेथील बाजार मांडलेल्या व्यापाऱ्यांना विकत असे. दुसरा प्रकार असा होता की, बाहेर बाजारामध्ये भाजीपाला विकायला बाया बसलेल्या असत. त्यांच्याशी खिचडीतील भाग आणि भाजीपाला अशी अदलाबदल करत. बाईंची पंचाईत होत असे. माझ्यामुळे त्यांना अशी अदलाबदल करता येत नसे. मला मिळणारी दक्षिणा मात्र त्या लाटत. ही खिचडी पद्धत पुढे त्यामध्ये होणाऱ्या गैरव्यवहारामुळे सयाजीरावांनी बंद केली'' (तत्रैव).

वर सांगितलेल्या अनेक नोकरांमध्ये एखादा गुप्तहेरदेखील असे. अधिकारी रयतेशी चोख व्यवहार ठेवतो किंवा नाही किंवा अडीअडचणीमध्ये असलेल्यांकडून लाच खातो का, याची माहिती महाराजांना घरबसल्या मिळत असे. याशिवाय ते

वेष बदलून प्रजेत बेमालूम मिसळत आणि भ्रष्टाचार कोठे, किती आणि कोण करतो, याचा प्रत्यक्ष अनुभव मिळवत. त्यामुळे अधिकारीवर्गाला महाराजांचा बडोद्यामधील मुक्काम जाचाचा वाटे. ते दूर युरोपमध्ये असले की, हा अधिकारीवर्ग खुष असे. प्रत्यक्ष पैशाच्या भ्रष्टाचाराशिवाय महाराजांच्या असे लक्षात आले होते की, काही रूसलेले वा दुखावलेले अधिकारी वा सरकारी कर्मचारी नियमितपणे कँपमधील रेसिडेंटला आपल्याविरुद्ध कागाळ्या करत. हा भ्रष्टाचार त्यांच्या दृष्टीने जास्त घातक आणि जाचक असे. त्यांच्यावर पाळत ठेवून, त्यांना वठणीवर आणणे आणि त्याला रंगे हात पकडल्यावर रेसिडेन्सीमध्ये काय कट कारस्थाने चालतात, हे समजून घेणे त्यांना आवश्यक वाटे. या माहितीच्या आधारे सयाजीराव महाराज क्रांतिकारकांना गुप्तपणे मदत करू शकले. एवढेच नाही तर सावरकरांचा साथी असलेला शंकर वाघ नावाचा एक न्हावी राजरोसपणे लक्ष्मीविलास राजमहालामध्ये राजपुत्रांचा संरक्षक म्हणून राहात असे.

॥ ॥ ॥

# १



# अर्थकारण

**अ) पौर्वात्य आणि पाश्चिमात्य आर्थिक नीती** – अनेक पंडितांनी सयाजीरावांना भारतीय अर्थशास्त्रावर आधारलेले महत्त्वाचे आर्थिक सिद्धान्त समजावले.

उदारहरणार्थ, नित्यानंदांनी त्यांना 'दंडनीतिम् अधितिष्टान्। प्रजाः संरक्षित ॥' हा मंत्र दिला. सरदेसाई यांनी महाराजांना शिवाजी महाराजांनी शून्यातून आपले संपन्न राज्य कसे निर्माण केले, ते शिकवले. ती झाली जुनी आर्थिक नीती. पण इलियटने सयाजीरावांना एक वेगळीच पाश्चिमात्य आर्थिक दृष्टी दिली. ''तुमच्या लोकांमध्ये व्यक्तिपूजा हा एक फार मोठा दोष आहे. तुम्ही लोक राजा म्हणजे परमेश्वर, तो चुका करू शकत नाही असे मानता. अशाने तुमची राजकीय वाढ खुंटते, हे विसरता. त्यामुळे शत्रूंनी तुमचा पराभव केला आणि तुम्हाला गुलाम बनवले. इंग्लंडमध्येही असा एक काळ होऊन गेला. त्या वेळी लोकांमध्ये राजा चूक करूच शकणार नाही, अशी अंधश्रद्धा होती. हळूहळू लोकांमध्ये राजकीय जागृती निर्माण झाली. इतकी की, क्रॉमवेलने भ्रष्ट राजाला फाशीवर चढवले! इंग्लंडमध्ये हळूहळू लोकांच्या हाती सत्ता दिली गेली. त्या सत्तेला संसद म्हणजे पार्लमेंट म्हटले जाऊ लागले.''

''शिवाजी महाराजांचा अपवाद सोडला, तर तुमचे महाराष्ट्रामधील सर्व मराठी राजे आणि पेशवे नेहमी कर्जबाजारी असत. पैसे मिळवण्यासाठी बादशाहाच्या करवसुलीच्या नावाने त्या सर्वांना स्वकीयांची लूटमार करावी लागली. त्यामुळे इतिहासामध्ये मराठ्यांची नाचक्कीच झाली. मोगलांना त्यांच्या संपत्तीचा हिस्सा मिळतच गेला; पण मराठ्यांना त्याची केवढी मोठी किंमत मोजावी लागली! बंगाल्यांची आणि राजपुतांची दुष्मनी पत्करावी लागली. शिवाजी महाराजांनादेखील दोनदा सुरत शहर लुटावे लागले. संपत्ती कशी निर्माण करू नये, हे जाणून घेण्यासाठी मराठ्यांचा इतिहास वाचावा! त्यामानाने दक्षिणेकडले विजयनगरचे हिंदू राजे आणि मुसलमानपूर्व हिंदू सम्राट शेती आणि व्यापार-उद्योग यांच्या जोरावर

खूप संपन्न झाले. मराठे जन्मभर लुटारूच राहिले. त्यांनी दिल्लीचे तख्त फोडले, पण त्यावर ते थाटामध्ये कधीच बसले नाहीत.''

''गायकवाड तसे नाहीत.''

''असे सरदेसाई शिकवतात? कारण ते तुमच्या चाकरीमध्ये आहेत. तुमच्या आधीच्या गायकवाडांचा या बाबतीतला गतेतिहास फारसा भूषणावह नाही. तुमच्या गणपतराव महाराजांनी बी० बी० सी० आय० या खासगी कंपनीला शेतकऱ्यांच्या मौल्यवान जमिनी फुकट देऊन टाकल्या. हा अधिकार त्यांना कोणी दिला? आणि ही कंपनी यामध्ये प्रचंड फायदा मिळवणार आहे, हे त्यांना माहीत नव्हते? तुमच्या पूर्वजांनी जिंकलेली सुरत आणि भडोच ही बंदरे व अहमदाबादसारखे संपन्न शहर इंग्रजांना देऊन टाकले! तीच गोष्ट खंडेराव महाराजांची. प्रजेला प्यायला नर्मदेच्या पाण्याची योजना पूर्ण करण्याऐवजी, त्यांनी सुंदरपुरा येथे मुसलमान साथीदारांना शिकारीसाठी वन निर्माण केले आणि मक्केतल्या काबा मशिदीसाठी मोत्यांची चादर तयार केली. केवळ इंग्रजांना खुष करण्यासाठी त्यांनी सर्वांत महाग 'करारा' नावाचा चिनी संगमरवरी दगडाचा महाराणी व्हिक्टोरियाचा पुतळा १८,००० पौंड खर्च करून मुंबईच्या एस्प्लनेड विभागामध्ये बसवला. गायकवाडांचा हाच वारसा तुम्ही पुढे सुरू ठेवणार असाल, तर मला त्याची फार लाज वाटेल.''

**२) इंग्रजांचे शस्त्र – आर्थिक नीती** – लंडनमध्ये सयाजीरावांना दादाभाई नौरोजी यांचा चांगला सहवास लाभला. त्यांच्यामुळे सयाजीरावांना आधुनिक आर्थिक दृष्टी प्राप्त झाली. सारखी चर्चा करून, त्यांना दादाभाईंची 'ड्रेन थियरी' तोंडपाठ झाली होती. एकदा सयाजीरावांनी दादाभाईंना विचारले, ''दादाभाई, या जातीपातीमुळे भारताचा लष्करी पराभव झाला, हे कितपत खरे आहे?''

''वर्ण आणि जातपात तर सामाजिक व्यवस्था आहे. ती जगामध्ये सर्वत्र दिसून येते. कारण ती एक प्रकारची सामाजिक सोय आहे. समाज अफाट मोठा आहे. जात ही त्याचे एकम (युनिट) म्हणून काम करते.''

''म्हणजे इंग्रज म्हणतात ते खोटे?''

''इंग्रज तसे का म्हणतात याचा विचार करा ना. त्यांचे मुख्य शस्त्र आहे, 'फोडा आणि राज्य करा.' त्यांना जातीपातींचे विभाजन करण्यासाठी, हे एक आयते साधन मिळाले आहे. इंग्रजांमध्ये जातपात नाही का?''

''ते त्याना जातींऐवजी वर्ग असे संबोधतात.'' इति सयाजीराव.

''नाव काहीही द्या, मानशास्त्रीय बैठक तीच आहे. सामाजिक व्यवस्था किंवा सोय.''

''त्या बदलाव्यात का?''

"काळाच्या रेट्याखाली सोयी बदलतात. रेल्वेच्या डब्यांमध्ये कसला आला आहे विटाळ? साऱ्यांना बरोबरच बसायला लागते ना? जातपात ही सोय आहे हे लक्षात ठेवले की, सारा गुंता उलगडतो. यांत्रिकीकरणामध्ये जुन्या सोयी जातील आणि नवीन सोयी निर्माण होतील. जुन्या व्यवस्था कोलमडून पडतील आणि नव्या व्यवस्था तयार कराव्या लागतील. आपल्यासारख्यांना जातीपातीचे जराही भय नसावे."

"हे कसे?"

"स्वातंत्र्याच्या लढ्यामध्ये जातीपातीचा लोप होतो. मग हे युद्ध व्यापारातले असो का ते शत्रूंच्या जमिनी मिळवण्यासाठी. व्यापाऱ्यांना लढावेच लागते ना? ते डोक्याने लढतात, मराठी वीर सैनिक हातामध्ये शस्त्रे घेऊन लढत. दोघांची शस्त्रे वेगळी, पण लढाई समान."

"असे असूनही महाराष्ट्र व्यापारामध्ये मागे का?"

"कारण तशी जरूर नाही. स्वारी केली की, वाटेल तेवढा पैसा. करायची कशाला रोज व्यापाराची कटकट? ज्यांना लढाई करता येत नाही, त्यांना हा व्यापार बरा. हां, आता इंग्रजांच्या गुलामगिरीमध्ये लढायाच नाहीत. त्यामुळे तुमची संपत्ती कमी झाली असेल. याच्या उलट जेवढी शांतता, तेवढी आमची संपत्ती वाढते."

"मुंबईमधील संपत्तीच्या निर्मितीमध्ये मराठी माणूस का दिसत नाही?"

"त्याचे फार मोठे योगदान आहे कामगार म्हणून. मालक म्हणून नाही. मुंबईतील पहिली गिरणी १८५४ मध्ये कावसजी दावर यांनी सुरू केली. दुसरी १८५७ मध्ये त्यांनीच सुरू केली. तेव्हापासून १८७३ पर्यंत १७ गिरण्या स्थापन झाल्या. त्यापैकी ८ जण पारशी तर ७ जण गुजराथी समाजाचे होते. मालकांपैकी एकाही मराठी माणसाचे त्यामध्ये नाव नाही. पारशी लोकांनी व्यापारधंदा सुरू केला, कारण इंग्रजांना मुंबईचा विकास करायचा होता, म्हणून त्यांनी पारशी लोकांना राजाश्रय दिला. नाहीतर मुंबई हे खेडेच राहिले असते."

"तसे पुणेदेखील एके काळी खेडेच होते? पेशव्यांनी मराठ्यांना भरपूर आश्रय दिला; पण त्यांनी काही उद्योग सुरू केले नाहीत. फक्त सावकारी आणि सराफी केली."

"उद्योगाची कल्पना फार उशिरा सुरू झाली, औद्योगिक क्रांतीनंतर ढाका हे हिंदुस्थानचे मँचेस्टर होते. इंग्रजांमुळे तेथील कापड उद्योगाची वाट लागली. ढाक्क्याची लोकसंख्या जी दीड लाख होती, ती तीस-चाळीस हजारांवर खाली आली. इंग्लंडची औद्योगिक क्रांती बंगालच्या चितेमधून निर्माण झाली आहे."

''पण एकंदरीत मराठी समाजामध्ये वाणीसमाज नाहीच. ही घटना अनर्थकारक नाही का? त्याशिवाय मराठी समाजाची भरभराट कशी होणार?''

''आपण मराठी उद्योजकांना राजाश्रय देऊन पहा. त्यांचे उद्योग आपोआप वाढतील. त्यांचे पाहून इतर मराठी उद्योजक पुढे येतील.''

''मला त्याची खात्री नाही.''

''होळकरांनी राजाश्रय दिला आणि माळवा व खानदेशाची भरभराट झाली. बऱ्हाणपूर वाढले, ते अहिल्याबाई होळकरांमुळे. सुरत वाढले, ते मोगलांमुळे. दक्षिणेत हंपी वाढले, ते चोला राजांमुळे. बडोद्यामध्ये राजाश्रय द्या, बडोदेसुद्धा संपन्न होऊ शकेल.''

धूर्त इंग्रजांनी १८१८ मध्ये पुणे जिंकले ते सरदार नातूंच्या फितुरीच्या बळावर आणि सत्ता टिकवली ती आर्थिक नीतीच्या बळावर. त्या वेळी दीड कोटीच्या महाराष्ट्रामध्ये १५-१६ लक्ष सैनिक वा सैन्याशी संबंधित लोक होते. ते एका झटक्यात त्यांनी बेकार केले. (बंगाल आणि उत्तरप्रदेश येथे वीणकरांचे अंगठे तोडले!) त्यांना निरुपायाने नापीक आणि ओसाड जमिनीवर शेती करण्यास भाग पाडले. ब्राह्मणांना सावकारी करण्यास भाग पाडले. 'फोडा व राज्य करा' या धोरणाचा आर्थिक अवतार म्हणजे ब्राह्मणब्राह्मणेतर वाद. महाराष्ट्राच्या मानाने गुजराथमध्ये जातपात फार, कारण तेथे युद्धे कमी. अशी परिस्थिती महाराष्ट्रामध्ये उद्‌भवत नाही, कारण महाराष्ट्रामध्ये पावला-पावलाला युद्धे खेळली जातात. युद्धभूमीवर जातिपातीचे लाड चालू शकत नाहीत. त्याचे उत्तम उदाहरण खर्ड्याच्या लढाईमध्ये घडले. तेथे शिदनाक महाराचे पथक होते. तो तासगावाकडील कळंबी गावचा वतनदार होता. शाहू सुटून आल्यावर, त्याचा आजा शाहूला फार उपयोगी पडला, म्हणून महाराजांनी त्याला हा गाव वतन दिला होता. शिदनाक आपल्या पथकासह खर्ड्यावर आला होता. त्याचा तळ इतर ब्राह्मण-मराठे सरदारांच्या तळाशेजारीच पडला होता. अर्थात सरदार मंडळींमध्ये थोडी चुळबूळ सुरू झाली. ही तक्रार सवाई माधवरावापर्यंत पोचली. श्रीमंतांच्या शेजारी वृद्ध मराठा सरदार हिरोजी पाटणकर हे बसलेले होते. श्रीमंतांनी तक्रार ऐकून त्यांच्याकडे पाहिले. तो म्हातारा गुरगुरत आणि डोळे वटारीत म्हणाला, ''ही जेवणाची पंगत नव्हे, ही तलवारबहाद्दर शूरांची पंगत आहे. येथे विटाळचांडाल काही नाही'' (दादूमिया, दलितांचे राजकारण, मॅजेस्टिक, १९). हे लक्षात ठेवले पाहिजे की, पेशव्यांच्या फौजेमध्ये महार सैनिक एकदोन नसत, चांगले हजारांनी पथकदार असत.

जातिपातींना भडक आणि लढाऊ रंग दिला तो इंग्रजांनी. तो देखील त्यांच्या राजकारणासाठी. भारतीयांनी एकत्र येऊ नये आणि स्वातंत्र्याचा विचार करू नये,

हीच इंग्रजांची प्रमुख राजकीय खेळी होती. त्यामध्ये त्यांचा स्वार्थ होता, त्यांचे स्वहित होते. सवर्ण विरुद्ध अवर्ण, ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर आणि दलित व मुस्लीम विरुद्ध सर्व हिंदू यांच्यामध्ये इंग्रजांनी चांगली जुंपवून दिली आणि ते साळसूदपणे हा तिरंगी सामना पाहात बसले. भारतीयांना ते उमजले नाही, ते झगडत बसले आणि इंग्रजांनी हसत हसत १५० वर्षे राज्य केले. सयाजीरावांनी नेमके असे जातीय झगडे बडोदे राज्यामध्ये टाळले.

३. शेती

१. **मानसशास्त्र** – १९०९ पर्यंत बडोद्यामध्ये शेतकी खाते वेगळे नव्हते, ते महसूल खात्याचाच एक भाग होते. १८९९-१९०१ च्या दुष्काळानंतर साऱ्या भारतामध्येच शेतकऱ्यांच्या हलाखीच्या परिस्थितीकडे सर्व महत्त्वाच्या पुढाऱ्यांचे आणि काही अंमलदारांचे लक्ष वेधले गेले. त्या लोकजागृतीस प्रामुख्याने पुण्याची सार्वजनिक सभा आणि बडोदे संस्थानाचे सयाजीराव महाराज कारणीभूत झाले. १९१२ मध्ये व्ही० एम० समर्थ या शेतकीतज्ज्ञाची नेमणूक केल्यामुळे पाहिजे तशी आधुनिक शेतीची माहिती शेतकऱ्यांना मिळू लागली. स्वतः महाराजांनी सोनगढच्या भिल्ल आणि आदिवासी यांच्यामध्ये आधुनिक शेतीचे ज्ञान विकसित कसे होईल, त्याकडे लक्ष पुरवले. आपली माणसे तेथे धाडून त्यांनी नव्या तंत्रज्ञानाच्या बळावर दुप्पट-तिप्पट उत्पन्न कसे वाढवता येईल, त्याचे मार्गदर्शन केले. त्यासाठी त्यांनी बऱ्याच बेकार सुशिक्षितांना मोफत जमिनी देऊन, त्यांना आधुनिक शेती करण्याकडे वळवले. त्याविषयी एका भाषणामध्ये त्यांनी आपले अनुभव सांगितले, ''सुशिक्षितांना शारीरिक श्रम करणे जीवावर येते. शेतीमध्ये त्यांना मर्यादित फायदा दिसतो. त्यांना जरी शेतकी कॉलेजमध्ये शिक्षण दिले, तरी त्यांची नजर सदैव शहरी जास्त पगाराच्या नोकऱ्यांवरच असते. सर्वांना अशा नोकऱ्या कोठून देणार?''

२. **शेतीत सुधारणा आणि जास्त उत्पादन** – सामान्य माणसाला पाश्चिमात्य देशांमध्ये नवीन शोध कोणते लागले आहेत, याची काहीच कल्पना असणे खेडेगावी शक्य नव्हते. सयाजीरावांना सामान्य माणसाला ते शिकवण्याची भलतीच आवड. ते म्हणत, ''तेथला शेतकरी काय आकाशातून पडला आहे काय? त्याला जे येते ते माझ्या राज्यामधील शेतकऱ्यांना आलेच पाहिजे!'' त्यासाठी त्यांनी 'आदर्श मळ्याची' (मॉडेल फार्म) स्थापना केली.

३. **आधुनिक शेतीचे प्रशिक्षण** – पेट्रोल आणि डिझेलवर चालणारे ट्रॅक्टर्स पाश्चिमात्य देशांत १८७० सालापासून उपयोगात आणले जात आहेत. त्यांनी निरनिराळे भाग, उदाहरणार्थ हे बेलर्स, क्रॉप स्प्रेअर्स, मोईंग मशिन्स वगैरे, जोडून

तेथील लोकांनी शेतीचे उत्पादन किती तरी पटीने वाढवले आहे. बडोद्यामध्ये शेतकी खात्याने मामुली भाडे घेऊन, लोकांच्या शेतावर ट्रॅक्टरांचा उपयोग करण्यास यापूर्वीच सुरुवात केली होती. त्यासाठी खात्याने वेगळे ट्रॅक्टरचालक व अभियंत्यांची नेमणूक केली होती.

**४) काँग्रेस अधिवेशनामधील भाषण**

१९०२ मध्ये अहमदाबाद येथे काँग्रेस अधिवेशन भरले होते. त्याला जोडूनच तेथे शेतकी प्रदर्शन भरले होते. त्याचे उद्घाटन महाराजांनी केले. महाराज शेती व्यवसायासंबंधी बोलताना म्हणाले, ''आपला देश मागे राहण्याचे कारण म्हणजे शेती आणि इतर उद्योगधंद्यांमध्ये आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग करण्याकडे झालेले दुर्लक्ष, हेच होय. याउलट युरोपमध्ये अशा ज्ञानाचा उपयोग जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्ये जाणीवपूर्वक कौशल्याने केला जातो. आपल्या जमिनीतून चांगल्या दर्जाचे आणि भरपूर पीक मिळवण्यासाठी, शेती करत असताना त्यामध्ये सुधारणा करण्याची जरूर आहे. बीटपासून साखर करण्याचा उद्योग आणि कापसाच्या जातीत जी सुधारणा झाली, ती रासायनिक क्रियेचा परिणाम होय. ऊस आणि कापूस हे आपल्या देशाचे उत्पन्न आहे. युरोपमध्ये बीटचे कंद सावधगिरीने निवडून त्यामध्ये शेतकीचे रसायनशास्त्र लागू करून, साखरेचा उद्योग हळूहळू वाढवण्यात आला आहे. आपल्या साखर उद्योगासाठी खरा उपाय हा आहे की, आपल्याला प्रतिस्पर्ध्यांची युक्ती उसनी घेण्याची जराही लाज वाटू नये. तसेच सर्वांत चांगला ऊस उत्पादन करण्याची योग्य तरतूद आपल्याला करण्याची जरूर आहे. त्याचप्रमाणे देशी कापसामध्ये सुधारणा केली, तरच जागतिक स्पर्धेत आपण टिकाव धरू शकू. आपण त्याप्रमाणे सुधारणा सहज करू शकू, असे मी मानतो. मात्र त्याकरिता काळजीपूर्वक संशोधन करण्याची आवश्यकता आहे. चांगली कापसाची जात शोधून काढून, आपण ते उत्पादन वाढवले पाहिजे.''

''गुलामीने आमच्यामधील काम करण्याची संस्कृतीच मारून टाकली आहे. शेतकऱ्यांमधील अज्ञान आणि आळस झाडण्याचे काम आपल्याला सर्व प्रथम करावयास पाहिजे. आज लढाया नाहीत. त्यामुळे पूर्वी तलवार चालवणारे वीर आज नांगर चालवतात. इंग्रज राजकर्त्यांनी इंग्रजी उद्योगधंदे वाढवण्यासाठी आमचे देशी उद्योगधंदे मारून टाकले ! ते बेकार कारागीर जाणार कोठे ? तेही आज शेती करू लागले आहेत. त्यामुळे पूर्वीपेक्षा आज शेतकऱ्यांची संख्या वाढली आहे. मात्र त्यांच्या शेती करण्यांच्या पद्धती जुन्यापुराण्याच आहेत. त्यांचे नांगर आणि इतर अवजारे पूर्वीचीच आहेत. त्यामुळे शेतकऱ्याचे दारिद्र्य काही केल्या हटत नाही.

दुष्काळामध्ये गरीब बिचाऱ्या शेतकऱ्यांचे हाल बघवत नाहीत. सर्वांत वाईट गोष्ट म्हणजे आपल्या जमिनीचा कसदेखील हळूहळू कमी होत चालला आहे.''

''शेती सुधारण्याचे उपाय अनेक आहेत. पहिला उपाय म्हणजे शेतीची आणि शेतीच्या अवजारांची पारंपरिक पद्धत सोडून, त्यामध्ये सुधारणा केली पाहिजे त्यामध्ये आपण अद्ययावत व्हायला पाहिजे. दुसरा उपाय म्हणजे सर्वच शिक्षणाचा दर्जा – त्यात शेतीचेही शिक्षण आले – वाढवला पाहिजे. सरकारने गुरांच्या वाढीचा प्रश्न हाताळण्याचे ठरवले आहे; पण मला येथे असे सांगावेसे वाटते की, लोकांमध्ये जागृती होऊन त्यांचा प्रत्यक्ष सहकार जोपर्यंत मिळत नाही, तोपर्यंत ते प्रयत्न फक्त कागदावरच राहणार आहेत. सर्व गोष्टींमध्ये मायबाप सरकारवर अवलंबून राहण्याची आपली जुनी खोड आहे. तीदेखील गेली पाहिजे आणि लोकांनी आपणहून पुढे आले पाहिजे. शेताच्या बांधावर आणि सभोवार झाडे लावणे, उपयुक्त रोपवाटिका तयार करणे, चांगल्या बी-बियाणांची निवड करणे यासारखी कामे एकमेकांच्या सहकार्याने सहज शक्य होऊ शकतील.''

**५) परदेशी अथवा परप्रांती जायला शिष्यवृत्ती**

**अ) रेशीम** – बंगाल इलाख्याच्या शेतकी खात्याच्या प्रमुखांनी बडोद्यामध्ये रेशमाचे उत्पादन सुरू करता येईल, असा अभिप्राय व्यक्त केला. त्यामुळे १९०५ मध्ये रावजीभाई पटेल यांना महाराजांनी काश्मीरला रेशमाची पैदास कशी करावयाची याचे शिक्षण घेण्यासाठी धाडले.

**आ) सुधारणा** – शेतीचे उत्पादन वाढवायचे असल्यास शेतीची पारंपरिक पद्धत सोडली पाहिजे आणि नवीन सुधारणा राबवल्या पाहिजेत, असे महाराजांनी सुचवले. शेतकरी सुधारणा करतात की नाही ? करत नसतील तर ते का? हे शोधण्यासाठी त्यांनी फिरते तपासनीस नेमले.

**इ) पशुपालन** – महाराजांनी पशुपालन करणाऱ्या शेतकऱ्यांना शेती करण्याबरोबरच तीन जादा कामे नेमून दिली. (१) जनावरांची उत्तम पैदास करणे, (२) कोंबड्यांचे मोठ्या प्रमाणावर उत्पादन आणि वाढ करणे व (३) दुग्ध व्यवसायाची (डेअरी) माहिती करून घेणे. त्यासाठी त्यांना खामगाव येथील पशुसंवर्धन केंद्रामध्ये प्रशिक्षणासाठी पाठवण्यात आले. जनावरांसाठी २१ पशू दवाखाने उघडण्यात आले.

**४) उद्योग**

**अ) मानसशास्त्र** – प्रत्यक्ष कामकाज १८८१ मध्ये हाती आल्यावर महाराजांच्या असे लक्षात येऊ लागले की, आपल्याभोवती बोलघेवड्यांची संख्या

अधिक आहे. काम सांगितले की ते काही तरी कारण सांगून पळ काढतात. त्यांना ब्रह्मानंदांचे शब्द आठवले, ''माणसाची पारख करणे सोपे आहे. त्याच्यावर एखाद्या कामाची जबाबदारी टाका आणि गंमत पहा. शेकडा पाच टक्के लोक जेमतेम परीक्षेमध्ये उत्तीर्ण होतील. लोकांना काम करण्यापेक्षा ते काम का झाले नाही, याच्या सबबी सांगणे आवडते.'' इलियट नेहमी महाराजांना सुनवायचा, ''तुम्ही हिंदू लोकांनी रामायण-महाभारत काळामधून बाहेर आले पाहिजे, तरच तुम्ही लोक तराल. 'भूतकाळा'चा केवळ स्फूर्ती घेण्यासाठी उपयोग करा आणि वर्तमानाकडे पाहा. किती दिवस त्या भूतकाळाला गोंजारत बसणार आहात? जग मोठे क्रूर आहे, ते तुम्ही 'आज' काय आहात, ते बघते आणि तुमची योग्यता ठरवते. भूतकाळ खूप चांगला असेल, तर तुमची रवानगी संग्रहालयामध्ये होते.'' सयाजीराव १८८७ मध्ये प्रथम इंग्लंडला गेले, तेव्हा त्यांनी जे पाहिले आणि अनुभवले, त्या सर्वांचा त्यांच्या मनावर खूपच चांगला परिणाम झाला. तेथे दादाभाई नौरोजी यांना त्यांनी सांगितले की, ''हिंदुस्थानचा एके काळी चीन, जपान, लंका, इराण, अरबस्थान, कंबोडिया, मिसर, आफ्रिका, इटाली, मेक्सिको वगैरे देशांशी व्यापार होता, याची बढाई माराण्यामध्ये काही अर्थ नाही. ते ऐकले की, लोक हसतात आणि आठवण करून देतात, ''पण आज तुम्ही गुलाम आहात.'' दादाभाई त्यांना नेहमी बजावत, ''तुम्हाला काळाचे आवाहन आहे, तुमच्या हाती सत्ता आहे, हिंमत असेल तर दाखवा तुमच्या बडोद्याचे औद्योगीकरण करून.''

**आ) औद्योगिक विकास** – दादाभाई नौरोजी यांचे आवाहन त्यांनी स्वीकारले. त्याआधी त्यांच्याकडून त्यांनी त्यांची 'ड्रेन थियरी' समजावून घेतली. दादाभाईंनी बंगालच्या लुटीवर इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती कशी फोफावली, हिंदुस्थानाने त्यांना आयती बाजारपेठ कशी बहाल केली आणि त्यासाठी सुरतेच्या विणकरांचे आणि बंगालच्या रेशीम कारागिरांचे इंग्रजांनी अंगठे कसे कापले, हा कडू पण सत्य इतिहास ऐकवला. दादाभाईंनी महाराजांना बजावले, ''अजून फार उशीर झालेला नाही, कापड तयार करावयाची यंत्रे आपल्याला इतर देशांकडून विकत घेता येतील. आपल्यापाशी चांगले कारागीर आहेत. उत्तम जातीचा कापूस आपल्याकडे भरपूर होतो. प्रश्न आहे साहसी व्यापाऱ्यांना हाताशी धरून त्यांना उद्योगपती बनवण्याचा.''

**इ) कलाभवनाची जादू** – महाराजांची सुरुवातीची वर्षे या आवाहनाच्या दृष्टीने निराशाजनक ठरली; पण १८९० मध्ये कलाभवन ही तांत्रिक शाळा त्यांनी स्थापन केली आणि त्यांचे ग्रह एकदम पालटले. त्यांनी बऱ्याच विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देऊन परदेशी पाठवले. हे विद्यार्थी तंत्रज्ञान शिकणे आपल्या लोकांना कसे आवश्यक आहे, याचा प्रचार करू लागले, तेव्हा महाराजांचे काम बरेच सोपे झाले. तोपर्यंत मुंबई,

कलकत्ता, मद्रास वगैरे मोठ्या शहरांमध्ये कापडाच्या गिरण्या सुरू झाल्या होत्या. रेल्वेमुळे सुबक आणि स्वस्त माल सर्वत्र मिळू लागला होता. महाराजांनी व्यापाऱ्यांना बडोद्यामध्ये कारखानदारी सुरू करत असाल, तर मोठाली कर्जे तर देतोच; पण इतर करांवरही सवलती देईन, अशी आश्वासने देऊन, त्यांना बडोदे राज्यामध्ये छोटेमोठे उद्योग सुरू करण्यासाठी प्रवृत्त करण्याचा धुमधडाका चालवला.

नव्या उत्साहाने १९०५ मध्ये महाराजांनी काम सुरू केले. त्यांनी १९०६-०७ या वर्षी नव्या उद्योगांना स्वस्त किमतीमध्ये जमिनी दिल्या आणि त्यांच्या तयार मालावर आयात कर माफ केला. टाटांनी पोलादाचा कारखाना सुरू केला, तेव्हा इंग्रज अधिकारी हादरले. त्यांनी आर्थिक बाबतीत टाटांना सतावण्यास सुरुवात केली. सयाजीरावांची आणि पोलाद निर्मितीच्या बादशहा असलेल्या जर्मन उद्योगपती क्रुप्सची ओळख होती. टाटांसारख्या उद्योगपतींना सतत 'रोख पैशांची' अडचण भासते. ही अडचण दूर करण्यासाठी १९०८ मध्ये बँक ऑफ बरोडा सुरू केली. त्या वेळी टाटांचे जास्तीत जास्त समभाग विकत घेण्यासाठी सयाजीरावांच्या अधिकाऱ्यांनी बडोदे राज्यामध्ये खूपच मेहनत घेतली. त्या नंतर त्यांनी उद्योगाचे वेगळे, पण खास खाते १९०९ मध्ये सुरू केले. या अगोदर ते महसूल खात्यामध्ये समाविष्ट असल्यामुळे उद्योगावर विशेष लक्ष दिले जात नव्हते. संस्थानामध्ये आता आयात, निर्यात आणि जकात कर रद्द करण्यात आले होते. या तीन नव्या सुधारणांमुळे बडोदे संस्थानामध्ये उद्योगाच्या विकासाचा आलेख भराभरा वर चढू लागला. १९१४ मध्ये या नव्या खात्याला सल्ला देण्यासाठी औद्योगिक सल्लागार मंडळाची नेमणूक केली. आज्ञा पत्रिकेत (गॅझेट) आणि स्थानिक वृत्तपत्रांमध्ये सरकारने जाहिराती दिल्यामुळे अहमदाबादमधील काही व्यापाऱ्यांनी सतरंज्या आणि गालिचे विणण्याच्या कारखान्यांमध्ये रस दाखवला. त्याचप्रमाणे कागद आणि घड्याळे तयार करण्याच्या, धागे बनवणाऱ्या आणि चिनीमातीच्या कपबशा, भांडी व इतर वस्तू तयार करण्यासाठी काही मंडळी पुढे आली आणि त्यांचे लघुउद्योग चांगले चालायला लागले. त्यामध्ये गणपुले, सरदेसाई, फडके वगैरे मराठी मंडळीदेखील होती. कलाभवनमधील तज्ज्ञमंडळी त्यांच्या तैनातीला आणि सल्ला देण्यासाठी सदैव तयार होतीच. बऱ्याच जणांना त्यामुळे नोकऱ्या मिळाल्या. काही तज्ज्ञांना उद्योगपतींना दिलेल्या सल्ल्यामुळे अधिक कमाई होऊ लागली.

बडोद्याचा १९१४-१५ मधील शासकीय अहवाल वाचून महाराजांना फार वाईट वाटले. त्यामध्ये लिहिले होते की, बडोद्याचा व्यापार आणि उद्योगामधील नोंदी अगदी वाईट आहेत! जुन्या तंत्रशास्त्रावर आधारलेले हे कारखाने पूर्णपणे

अयशस्वी ठरल्यामुळे, जुने उद्योग बंद पडायच्या मार्गावर आहेत. सुरत, भडोच आणि अहमदाबादप्रमाणे कापड गिरण्या बडोद्यामध्ये नीट चालत नाहीत. म्हणून कसलीही लाज न बाळगता महाराजांनी परदेशातील तसेच देशी तज्ज्ञांना बोलावून "आमचा मुलगा नापास झाला आहे, तेव्हा त्याला सुधारण्यासाठी काय करावे?" असा प्रश्न विचारला.

ते तज्ज्ञ म्हणाले, "हिंदुस्थानी शेतकरी काय किंवा उद्योगपती काय, नवीन तंत्र चटकन ग्रहण करतो; पण त्याला त्याने या उद्योगामध्ये जी गुंतवणूक केली असेल त्यावरील व्याज किंवा फायदे ('रिटर्न') त्याला चटकन हवे असतात. हे साऱ्या जगभर असेच आहे; पण परदेशी उद्योगपतींची नुकसान सहन करण्याची ताकद जास्त असते. गरिबीमुळे येथील माणसाची ती मानसिक तयारी नसते. ही अनिश्चिततेची भावना आपण दूर करू शकलात, तर येथे उद्योग यशस्वी ठरतील, अन्यथा नाही. त्यासाठी तुम्हाला जास्त सवलती द्याव्या लागतील, कर माफ करावे लागतील आणि जमिनी जवळजवळ फुकट द्याव्या लागतील." महाराजांनी संस्थानी उद्योगांऐवजी (स्टेट एंटरप्राईज) खासगी उद्योग सुरू केले. (प्रायव्हेट एंटरप्राईज). त्यानुसार त्यांची स्टेट स्पिनिंग अँड विव्हिंग इंडस्ट्री खाजगी मालकीची झाली आणि चांगला नफा देऊ लागली. महाराजांनी खुष होऊन फेब्रुवारी १९१४ मध्ये १२ लाख रुपये अलग काढून ठेवून, ते फक्त उद्योगाला उत्तेजन देण्यासाठी उपयोगात आणण्याचे ठरवले.

**ड) नैसर्गिक वायू** – १९२१-२२ मध्ये राजमहालाच्या हद्दीमधील नवलाखी विहिरीजवळ खोदकाम करत असताना अचानक नैसर्गिक वायूचा फवारा बाहेर आला. इंग्रज तज्ज्ञ सत्य सांगणार नाहीत म्हणून इतर परदेशी तज्ज्ञांचा सल्ला विचारला. साऱ्या चाचण्या आणि परीक्षा झाल्या. हा वायू प्रकाश आणि घरामध्ये अन्न शिजवण्यासाठी चालू शकेल, असे त्यातून निष्पन्न झाले; पण महाराज तेवढ्यावर थोडेच संतुष्ट राहणार होते? त्यांनी कलाभवनातून खास 'बर्नर्स' तयार करून घेतले आणि महाराजा मिलमधील इंजिन काही दिवसांसाठी मागून आणून ते त्या वायूवर चालते का याची चाचणी घेतली. ते चालले! दुर्दैवाने बडोद्यामधील गिरण्यांना पुरेल एवढा पुरेसा नैसर्गिक वायू त्यांना न मिळाल्यामुळे, ती योजना नाइलाजाने सोडून द्यावी लागली.

### ५) महाराजांची महत्त्वाकांक्षा

दादाभाई नवरोजींचे आवाहन सयाजीरावांनी केवळ स्वीकारले नाही, तर ते यशस्वीपणे पार पाडले. कलाभवनमध्ये सर्व प्रकारचे परीक्षण आणि पृथक्करणाची

सोय असल्यामुळे बडोद्यामधील उद्योग वाढत होते. कलाभवनचे विद्यार्थी आपापल्या शहरी जाऊन स्वतःचे उद्योगधंदे सुरूकरत होते ते वेगळे. आता करमुक्त बडोद्यामधील विभागांमधून पुढील वस्तू तयार होऊन साऱ्या देशामध्ये विकल्या जात होत्या. कापडाचे वेगवेगळे प्रकार, कागद, निरनिराळ्या शाया, मलेरियाविरोधी तेले आणि औषधे, मध, तेल, केक्स, जंतूनाशक द्रव्ये, धातू, डालडा (वनस्पतीचे तूप), ॲसिड लाईम, सोडा ॲश, तंबाखू, काड्यापेट्या, काच, काढे, कपबशा, चिनी मातीची भांडी, यांत्रिक माल, वगैरे. १९२६ मध्ये महाराजांच्या राज्यारोहणाचा हिरक महोत्सव साजरा करण्यात आला. त्या निमित्ताने त्यांनी 'डायमंड ज्युबिली कॉटिज इंडस्ट्रीज ट्रस्ट' निर्माण केला. त्यातून कुटीर उद्योगांसाठी जे तंत्रज्ञान लागते, ते शिकवणारी एक खास शाळा सुरू केली. त्यातून विसनगर ब्रास उद्योग, संखेडा फर्निचर उद्योग वगैरे उभे राहिले. इंग्रजांनी सयाजीरावांच्या 'कमजोरी'चा फायदा घेण्याचे ठरवले आणि त्यांना बी० बी० सी० आय० रेल्वेची कार्यशाळा (वर्कशॉप) बडोद्यामध्ये सुरू करण्यासाठी दबाव आणला. महाराजांनी नम्रपणे ती संधी नाकारली. त्यामुळे राजधानीचे शांत वातावरण बिघडले असते. त्यांना बडोदे हे शहर विद्येचे माहेरघर म्हणून निर्माण करावयाचे होते; पण अंदरकी बात वेगळी होती. त्यांना अशी भीती वाटली की, राजमहालाच्या परिसराजवळ लालबाग विस्तारामध्ये ती कार्यशाळा आली असती, तर त्याबरोबर बरेचसे इंग्रजांचे हेर तेथे घुसले असते आणि त्यांच्या इतर उद्योगांना बाधा आली असती. ही कार्यशाळा पुढे दाहोद येथे सुरू झाली.

### ६) सहकारी क्षेत्र

१९१३ मध्ये महाराजांनी 'सहकारी कायदा' पारित केला. १९१४ मध्ये बडोदे येथे सहकारी संस्थांची अखिल भारतीय परिषद भरवली. तिच्या उद्घाटनसमयी केलेल्या भाषणामध्ये ते म्हणाले, "ग्रामीण भागातून पैदा होणारा माल एकत्र करून, तो योग्य भावाने शहरामध्ये विकणे, तसेच खेड्यापाड्यांतील लोकांना लागणारा माल किफायतशीर भावाने विकणे वगैरे बाबतींत सहकारी चळवळीचे महत्त्व फार आहे.

नुसते सरकारवर अवलंबून न राहता लोकांनी स्वतः ही चळवळ उचलून धरली पाहिजे. जर्मनी, डेन्मार्क, हॉलंड वगैरे देशांमध्ये सहकाराच्या योजनेने शेतकरी वर्गाची अभूतपूर्व अशी सुधारणा घडवून आणली आहे आणि त्यायोगे राष्ट्रीय उन्नतीचा पाया त्या त्या देशांमध्ये चांगल्या रीतीने रोवला गेला आहे. आपल्या देशामध्येही या चळवळीने फार फायदा होण्यासारखा आहे."

७) बँकिंग क्षेत्र

**१) सार्वजनिक** – बडोदे राज्यामध्ये 'बाबाशाही' चलन वापरले जात होते. ते बदलून बडोद्याने ब्रिटिश चलन व्यवहारात आणावे, अशी इंग्रजांची इच्छा होती. त्यात बडोदे संस्थानाचे नुकसान होईल, असे महाराजांच्या अर्थतज्ज्ञांनी त्यांना सुचवले होते. म्हणून ते या गोष्टीस तयार होत नव्हते. आजपर्यंत सयाजीरावांना शेतकऱ्यांना आणि उद्योगपतींना मोठाल्या रकमांची कर्जे देता येत नव्हती. ती ताकद फक्त इंग्रज बँकांपाशी होती. त्या बँका इंग्रज सोडून हिंदी लोकांना मदत करत नसत. टाटांनी महाराजांना हे सगळे आर्थिक राजकारण समजवून सांगितले होते. याचा अर्थ असा की, हिंदी माणूस पैशाच्या अभावी उद्योगधंद्यामध्ये कधीच वर येऊ शकणार नव्हता. याचा सरळ अर्थ क्रांतिकारकांना कोणी 'क्रप' सारखा उद्योगपती कधीच लाभणार नव्हता! महाराजांनी त्यांच्यामध्ये असलेल्या दूरदृष्टीचा उपयोग केला आणि बँकेचा प्रकल्प इंग्रज सरकारसमोर मांडला. इंग्रजांनी नेहमीप्रमाणे विलंबाचे धोरण स्वीकारले आणि सरतेशेवटी आठ वर्षांनंतर बँक ऑफ बरोडाची २० जुलै १९०८ रोजी स्थापना झाली. सयाजीरावांना ई० रँडल या इंग्रज तज्ज्ञाची नेमणूक करावी लागली; पण सुरुवात चांगली झाली होती. बँकेचे अधिकृत भांडवल साठ लाख रुपयांचे होते. शाखा सुरू झाल्या. हळूहळू प्रत्येक महत्त्वाच्या शहरी बँकेची शाखा उघडली गेली. महाराजांनी पहिली भरघोस मदत केली असेल तर टाटांना! नाहीतर टाटा स्टील कंपनी बंद पडायच्या मार्गावर होती! टाटा स्टीलचे जास्तीत जास्त भागधारक बडोदे आणि नवसारीमधील होते. कित्येक शेतकरी या बँकेमुळे तरले. कित्येक छोटे छोटे उद्योगपती या सवलतीमुळे देशातले मोठे उद्योगपती म्हणून ओळखले जाऊ लागले.

**आ) सहकारी** – गुजराथी माणूस कोठेही असला, कसाही असला, तरी तो सतत संपत्ती निर्माण करण्याच्या मागे असतो. मराठी माणूस नोकरी हा एकच संपत्ती निर्माण करण्याचा मार्ग आहे असे समजतो. पूर्वी लढाईमध्ये बहादुरी गाजवली की, त्याला मालक खुष होऊन जमीनजुमला देई. ती शक्यता इंग्रजांच्या राज्यात बंद झाली होती. त्याच्या अडीअडचणींचे काय? महाराजांनी त्या मध्यम वर्गीयांसाठी १८८८ मध्ये सहकाराचा कायदा पारित करवून घेतला आणि पुढील वर्षी 'अन्योन्य साहाय्यकारी कंपनी'ची स्थापना केली. ही आशियातील पहिली सहकारी बँक होय. मध्यमवर्गीयांसाठी तिने छोटी बचत योजना भारतामध्ये प्रथमच सुरू केली.

माझे आजोबा तात्यासाहेब नेने यांचा न० वि० गाडगीळ यांच्या हस्ते बँकेच्या रौप्य महोत्सवानिमित्त सत्कार झाला. आद्य संस्थापकांपैकी ते त्या वेळी एकमेव

हयात संस्थापक होते. लाचलुचपत आणि आसवाद यामुळे त्या बँकेचे आज दिवाळे वाजले आहे. ही बँक पहिल्यापासून ब्राह्मणी बँक म्हणून ओळखली जाई. स्वच्छ आणि चोख व्यवहारासाठी ती कालपर्यंत प्रसिद्ध होती. मराठी ब्राह्मण भ्रष्टाचारामध्ये फार मागे नाहीत, हे काळाने सिद्ध केले आहे. मिठाने खारटपणा सोडला तर भारत देशाचे काय होईल?

। । ।

# १०



# संरक्षण

**१) संरक्षणाचा आर्थिक पाया** – आपण आपल्या संरक्षण हितासाठी केलेला खर्च भारताच्या हितासाठी केला आहे, असे भासवून तो खर्च भारत सरकारच्या माथी मारण्याचे प्रकार इंग्लडमधील सरकारने केले. १८८५ मध्ये इंग्लडमधील सरकारला अचानक भारतीय सीमेच्या सुरक्षिततेविषयी काळजी वाटू लागली, कारण मध्य आशियामध्ये रशियाचा प्रभाव वाढत होता आणि वायव्येला रशिया अफगाणिस्थानच्या दिशेने सरकत होता. दुसऱ्या बाजूला फ्रान्सने वसाहती मिळवण्यासाठी जोराचे प्रयत्न सुरू केले होते. खरे पाहता भारताची नैसर्गिक सरहद्द म्हणजे तिन्ही बाजूंचे समुद्र आणि उत्तरेस भली मोठी हिमालयाची उंचच उंच पहाडांची रांग.

या सरहद्दीच्या पलीकडे होणाऱ्या घडामोडींचा भारताशी संबंध आहे, असे मानायचे कारण नाही. वरील दोन देशांपैकी एकाची जर सरशी झाली असती तर मालक बदलला असता; पण मालकाची दादागिरी बदलली नसती. इंग्लंडच्या सरकारला काळजी आपली मालकी जाते की काय इतकीच होती.

वरील दोन युरोपीय देशांकडून धोका निर्माण झाल्याचे दिसताच वायव्य सीमेच्या रक्षणाची जोरात तयारी इंग्लंडने सुरू केली. तिकडे सैन्य, रसद इत्यादी जलद गतीने पाठवता यावे, म्हणून नवीन रेल्वेचे आणि रस्त्यांचे जाळे वाढवण्यास सुरुवात झाली. त्यासाठी साडेपंधरा कोटी रुपये खर्च झाले. संरक्षणाची खास सोय व्हावी म्हणून साडे चार कोटी रुपये देण्यात आले. चार कोटी रुपये खर्च करून २९,००० नव्या सैनिकांची भरती करण्यात आली. १८८६-८८ मध्ये काही नवीन भूभाग इंग्रजांच्या प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष नियंत्रणाखाली आणले गेले. त्यातील पहिला बळी ठरला उत्तर ब्रह्मदेश. प्रत्यक्ष स्वारीचा खर्च ६,३०,००० रुपये आला. पुन्हा तेथील लष्करी आणि प्रशासकीय व्यवस्थापनासाठी जवळजवळ पंधरा कोटी रुपये लागले. इंग्रजांनी बलुचिस्थानासाठी जे सैन्य उभे केले, त्याकरता दरवर्षी पन्नास लाख रुपयांची सोय करावी लागली. गिल्गित प्रतिनिधीच्या कार्यालयासाठी

(एजन्सीसाठी) दरवर्षी दोन लाख रुपयांचा आणि चित्रालसाठी वीस लाख रुपयांचा अंदाजपत्रकामध्ये समावेश होता.

ईस्ट आफ्रिकेतील सोमाली किनाऱ्याच्या बंदोबस्तासाठी सालिना एक ते दोन लाख रुपये लागणार होते. या एकूण भारत संरक्षणासाठी जवळजवळ अडुसष्ट कोटी रुपये खर्च झाला आणि दरवर्षी साडेसहा कोटींचा खर्च करावा लागणार होता. या सर्व उलाढालींमागे इंग्रजांच्या प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष वर्चस्वाखाली ५,५५,००० चौरस मैल इतका मोठा प्रदेश आला. तो फ्रान्स, जर्मनी आणि इटली यांची बेरीज केली, तर जेवढा प्रदेश होईल तेवढा होतो. याच काळात मंडाले-कुन्लॉन रेल्वे मार्गाचा प्रकल्पही इंग्रज सरकारने हाती घेतला. त्याचा उद्देश चीनमधील युनान प्रांतापर्यंत चटकन पोहचता यावे आणि फ्रेंचांच्या आधी तेथे इंग्रजांचा व्यापार सुरू करावा हा होता. थोडक्यात भारताचे रक्षण करावे हा इंग्रजांचा खरा उद्देश नसून, आपल्या बाजारपेठा सुरक्षित राहाव्यात आणि त्या वाढाव्यात हा होता. त्यासाठी सरकारने भारतीय रयतेच्या खऱ्या भल्यासाठी होणाऱ्या खर्चांमध्ये (उदाहरणार्थ दुष्काळ, विमा) कपात केली आणि करांमध्ये वाढ केली.

**२. टिळकांची शस्त्रे : स्वदेशी आणि बहिष्कार** – सयाजीराव यांची युद्ध म्हणजे आमनेसामने लढलेले युद्ध, अशी कल्पना होती. टिळक केसरीमधून संपूर्ण युद्धाची कल्पना मांडत. ते ४३ वर्षांच्या सयाजीरावांना पटत नसे. क्रांतिकारक खेळतात ते खरे युद्ध, अशी त्यांची धारणा होती. सयाजीराव स्वतः कधीच दारूला स्पर्श करत नसत; पण दारूबंदी करून स्वातंत्र्य कसे मिळेल, असा त्यांना प्रश्न पडे. त्यात भरीस भर गोखले टाकत असत. ''बहिष्काराचे तत्त्व आपल्याला मान्य नाही,'' ते म्हणत, ''तो काळाचा अपव्यय आहे. ते द्वेषदूषित आहे.'' म्हणून महाराज आपल्या शंका घेऊन टिळकांकडे आपला खास दूत गुप्तपणे पुण्याला धाडत आणि प्रश्नांची उत्तरे मिळवण्याचा प्रयत्न करत. गोखले यांनी महाराजांवर 'बुद्धिभेद'चा प्रयत्न केला होता, हे दूताकडून टिळकांना समजले. त्यांनी दूतामार्फत कळवले, ''मामला गंभीर आहे. मी काही हकीकत धाडत आहे. जास्त माहितीसाठी पुढील आठवड्यात यावर मी आमचे हितशत्रू आमच्याविरुद्ध काय म्हणतात, त्यावर अग्रलेख लिहीन तो नीट वाचा.'' दूताने टिळक परिवारातून मिळालेली पुढील काही माहिती महाराजांना पुरवली.

**अ)** – 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे', अशी घोषणा टिळकांनी २ मे रोजी अकोल्याच्या शिवाजी उत्सवामध्ये केली. ''शिवाजी महाराजांनी मराठ्यांना सर्वप्रथम स्वराज्याची कल्पना दिली. तो त्यांचा अधिकार आहे, हे त्याने महाराष्ट्रात सर्वांना शिकवले. मध्यंतरी काही काळ आम्हास त्याचा विसर पडला

होता. प्रत्येक माणसास स्वातंत्र्याची चांगली जाणीव असते. ज्याला स्वातंत्र्याची जाणीव वा जरूर वाटत नाही, तो पशू समजावा.''

आ) – स्वराज्याची घोषणा ही हिंदुस्थानामध्ये सर्वप्रथम दाजी आबाजी खरे यांनी १९०६ मध्ये रायगडच्या शिवाजी उत्सवामध्ये केली. त्यानंतर दादाभाई नौरोजी यांनी कलकत्ता काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून ती घोषणा पुन्हा उद्धृत केली. तोवर बंगालमध्ये स्वराज्य शब्द लोकप्रिय झाला नव्हता. ते स्वाधीनता या शब्दाचा उपयोग करत. १९१६च्या स्वराज्याच्या आंदोलनामध्ये ही घोषणा लोकप्रिय झाली. स्वराज्याला स्वदेशीची जोड महाराष्ट्रामध्ये १८४९ मध्ये लोकहितवादींनी आणि सार्वजनिक काका यांनी दिली. स्वदेशी हा एक आर्थिक प्रश्न आहे आणि तो धर्माधिष्ठित आहे, ही जाणीव त्या दोघांनी दिली. कारण बाटलेल्या ख्रिस्ती लोकांनी विदेशीचा प्रचार आणि प्रसार करावयाला सुरुवात केली होती.

इ) – त्याची प्रचिती लोकांना १८९४ मध्ये मिळाली. मँचेस्टरच्या कापडावरचा कर काढून टाकल्याची घोषणा सरकारने केली. नेमका सार्वजनिक गणेशोत्सव त्या सुमारास टिळकांनी सुरू केला होता. हे पाप पचवल्यावर १८९६ मध्ये सरकारने मँचेस्टरच्या कापडाला उत्तेजन देण्यासाठी देशी कापडावर साडेतीन टक्के कर बसवला. त्याची प्रतिक्रिया म्हणून विदेशी कपड्यांची होळी १८९६ मध्ये सावरकरांनी टिळकांच्या नेतृत्वाखाली पुण्यामध्ये घडवून आणली. त्या वेळी शि० म० परांजपे यांनी मोठे प्रक्षोभक भाषण केले होते. या प्रसंगाच्या आधी सार्वजनिक सभेचे सचिव या नात्याने गोखले यांनी सरकारकडे निवेदने दिली होती; पण त्याचा काहीही उपयोग झाला नाही. सरकारी हेरखात्याने या सर्वांच्या मुळाशी टिळक आहेत, असा अहवाल सादर केला. टिळकांनी त्या वेळी 'मराठा'मध्ये लिहिले, ''इंग्रज संशयात्मे हिंदुस्थान हे कधीच एक राष्ट्र होऊ शकणार नाही, असा प्रचार करत असतात. याकरिता या आणीबाणीच्या प्रसंगी आपण सर्व एक होऊन या आक्षेपाला उत्तर देऊ या. शंकाकुशंका काढण्याची किंवा द्विधा वृत्ती करण्याची ही वेळ नव्हे. राष्ट्रहितासाठी भारतीय आणि आंग्लभारतीय यांनीही आपले फरक विसरण्याची ही वेळ आली आहे.''

ई) – १९०५ मध्ये मवाळांच्या एका परिषदेमध्ये त्यांचे नेते विल्यम वेडरबर्न यांनी भाषण केले. ते म्हणाले, ''इटालीमधील लोकांनी ऑस्ट्रियाची सत्ता राष्ट्रीय म्हणून अमान्य केली. त्यांनी ऑस्ट्रियामधील लोकांवर बहिष्कार पुकारला. त्यामुळे शासन खिळखिळे झाले आणि राज्य करणे मुष्कील झाले. याच्या उलट भारतीयांनी इंग्रजी सत्ता 'राष्ट्रीय सत्ता' म्हणून स्वीकारली आहे आणि इंग्रजांना सहकार्य देत

आहेत. राष्ट्रीय भारतीय काँग्रेसचे ठराव पहा. त्यांचा उद्देशच प्रजेची गाऱ्हाणी दूर करून ब्रिटिशांचे राज्य लोकप्रिय करणे हा आहे." या उद्देशाचा पायाच बहिष्काराने उखडला जात असल्यामुळे, गोपाळ कृष्ण गोखले यांचा आणि इतर मवाळांचा त्याला तीव्र विरोध होता.

उ) – बंगाली कालिपूजक नेत्यांनी १९०५च्या फाळणीच्या दिवसांमध्ये स्वदेशी आंदोलनाला धर्माचे अधिष्ठान मिळवून दिले. त्या आंदोलनाच्या पुढाऱ्यांनी स्वधर्माला स्मरून स्वदेशीच्या शपथा घेतल्या व त्यांच्या अनुयायांनी तेच धोरण पुढे सुरू ठेवले. टिळकांनी १९ जानेवारी १९०४ च्या 'केसरी'मध्ये लिहिले, "हिंदुस्थानातील ३० कोटी प्रजेस एकत्र आणण्याकरिता हिंदुत्वाव्यतिरिक्त दुसरीही काही साधने पाहिली पाहिजेत हे खरे; पण त्याच्याबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, ३० कोटींपैकी २० कोटी प्रजा हिंदुत्वाने एकत्र झालेली आहे. तिचे बंधन टिकविणे हे राष्ट्रीयदृष्ट्या अधिक सोयीचे, सहज शक्य आणि आवश्यक आहे." कलकत्ता येथे ९ जून १९०६ रोजी टिळकांनी शिवजयंती उत्सवाच्या निमित्ताने केलेल्या एका भाषणामध्ये सांगितले, "इंग्रजीत ज्याला राष्ट्रीयता, देशाभिमान म्हणतात, तद्वतच आपली स्वदेशी आहे. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, जैन, पारशी आणि बौद्ध यांनी आपल्या धर्मात स्वदेशीचा अंतर्भाव केला, म्हणजे ते एका सूत्रात बांधले जातील. याच तत्त्वाच्या प्रभावाने आपण इतर राष्ट्रांना तोंड देऊ शकू."

ऊ) – पूर्व बंगालमध्ये बहिष्कारामुळे काय परिस्थिती उद्‌भवली, त्याचे वर्णन ६ जुलै १९०७ च्या 'टाईम्स ऑफ इंडिया'ने पुढीलप्रमाणे केले, "एके काळी खेडेगावामध्ये लोकांना पोलिसांची फार भीती वाटे. तो आपल्या सत्तेचा दुरुपयोग करी, लाच घेई आणि नाडलेल्यांकडून पैसे उकळी. भारतीय सब-इन्स्पेक्टरचा छळवाद असह्य होता. आज परिस्थिती उलट आहे. आता सबइन्स्पेक्टर आणि पोलीस घाबरतात, चळाचळा कापतात. बहिष्कार समितीच्या पुढाऱ्यांचे हुकूम ऐकतात आणि मध्ये काही अडथळे आणण्याच्याऐवजी समाजावर जर काही अन्याय झाला असेल, तर चौकशी करून त्यांना मदत करतात."

२८ एप्रिल १९०८ रोजी टिळकांनी उपरोधाच्या आणि उपहासाच्या सुरात आणि व्याजोक्ती व वक्रोक्ती यांनी भरलेला अग्रलेख 'केसरी'मध्ये प्रसिद्ध केला. त्यामध्ये त्यांनी लिहिले की, "दारूची बंदी हे बाहेरचे सोंग असून, वस्तुतः हे ब्राह्मणांचे बंड पुन्हा उपस्थित होत आहे. चारचौघांना एके जागी गोळा करून, स्वयंसेवकांना शिस्त लावून, रक्षकाशी आणि अधिकाऱ्यांशी झुंझावयास शिकवण्याचा ह्या बंडखोरांनी आता हा उपक्रम केला आहे. उघड राजकीय कामासाठी जर ह्यांनी स्वयंसेवकांच्या टोळ्या निर्माण केल्या असत्या, तर सरकारने

विलंब न लावता टोळ्यांना निजधामाला पाठविले असते. यांच्या खऱ्या स्वरूपासंबंधी सरकारास व्यामोह पडावा म्हणून यांनी दारुबंदीचे सोंग घेतले आहे. ब्राह्मण किंवा पांढरपेशा जातीवाचून इतर साहाय्य या चळवळीला नाही. सत्तेचा दुरुपयोग करून ऋग्वेदातील, मनुस्मृतीतील, साधुसंतांच्या बोधमृतातील वचने पुढे करून इतर जमातींना हे धूर्त विद्वान आपल्या लगामी लावीत आहेत.''

''कोणाला कोणचे अधिकार द्यावयाचे आणि कोणाचे अधिकार काढून घ्यावयाचे, याचा सर्वाधिकार स्वतःकडे घेणारे इंग्रज सरकार जिवंत असताना, समर्थ असताना ह्या चळवळ्यांनी दारूच्या गुत्त्यांपुढे निरोधन करून पानस्वातंत्र्याला अडथळा करणे इंग्रजी राजसत्तेपैकी काही भाग संघसामर्थ्याने आत्मसात करण्यासारखे आहे. शारीरिक दांडगाई स्वयंसेवक करत असतात, असे म्हणण्यास भक्कम पुरावा सरकारकडे मिळत नाही. याचे कारण लोकांच्या मनावर यांनी एक प्रकारचा वचक बसविला आहे. लहान लहान देशी अधिकाऱ्यांच्या मनावरही या बंडखोरांनी दरारा बसविला असल्याने यांची कृष्णकृत्ये न्यायालयातून उजेडात आणणे अवघड झाले आहे. स्वयंसेवक म्हणून शे-दीडशे तरुणांनी गोळा व्हावे आणि सरकारच्या अधिकारास खग्रास ग्रहण लावावे, हे सरकारच्या प्रतिष्ठेस न्यूनत्व आणणारे नाही काय?'' महाराजांनी तो लेख नीट वाचला आणि त्यांचे पूर्ण समाधान झाले. टिळक आपल्याला किती मान देतात, ते आठवून महाराजांना भरून आले.

**३) संरक्षण क्षमता** – १८५८ नंतर खंडेराव गायकवाडांनी आपले सैन्य जास्त अद्ययावत आणि जास्त शिस्तीचे बनवण्यास सुरुवात केली.

(अ) बारा वर्षांनी म्हणजे १८७० मध्ये बडोद्याच्या रेसिडेंटने बडोद्याच्या सैन्याची ताकद पुढीलप्रमाणे लिहून ठेवली आहे:

| | | |
|---|---|---|
| १. | सिल्वर गन बॅटरी | १६६ |
| २. | घोड्यांनी खेचलेला तोफखाना | २१२ |
| ३. | रिसाला (अश्वदल) | १९६ |
| ४. | सेकंड बॅटरी फूट आर्टिलरी | १७२ |
| ५. | थर्ड बॅटरी फूट आर्टिलरी | १७३ |
| ६. | पहिले रेजिमेंट हायलँडर्स | ५९४ |
| ७. | दुसरे रेजिमेंट हायलँडर्स | ५९४ |
| ८. | तिसरे रेजिमेंट हायलँडर्स | ५९४ |
| | एकूण | २,७०१ |

(ब) पन्नास वर्षांनी १९२१-२२ मध्ये बडोदे संस्थानाच्या सैन्याची ताकद पुढीलप्रमाणे होती–

| सैन्य | अधिकृत | प्रत्यक्ष |
|---|---|---|
| (१) तोफखाना – | | |
| लाईट फिल्ड बॅटरी | १६० | १४५ |
| (सहा ९ पौंडी तोफा) | | |
| (२) घोडदळ – | | |
| पहिली कॅव्हलरी | ७२७ | ६८६ |
| दुसरी कॅव्हलरी | ७४७ | ७४३ |
| तिसरी कॅव्हलरी | ७२७ | ६२० |
| चौथी कॅव्हलरी | ५४३ | --- |
| ओखा बटालियन | ४७५ | ३७१ |
| फरासखाना कंपनी | -- | १०७ |
| | ३२१९ | २५२७ |
| वाद्यवृंद (बँड) | ११७ | ६५ |
| जनरल्स आणि स्टाफ अधिकारी | ०८ | ०४ |
| | १२५ | ६९ |
| ग्रँड टोटल (एकंदर) | ५०८६ | ३७७७ |
| त्यासाठी होणारा खर्च | रु. २४,०३,४५८ | (१९२१-२२) |

४) **संरक्षणाचे मानसशास्त्र** – पहिल्या महायुद्धाच्या काळापासून (१९१४-१९१८) ब्रिटिश सरकारने हिंदी संस्थानिकांवर इंपिरियल सर्व्हिस स्कीम (आय०एस०एफ०) लादली. संस्थानी फौजेस ब्रिटिश सरकारने त्यांच्या खर्चाने हायर मिलिटरी ट्रेनिंग देऊ केले. त्याच्या बदल्यात ब्रिटिश सरकार जेव्हा मागणी करेल तेव्हा ही पथके काही आढेवेढे न घेता संस्थानाबाहेर धाडण्याची व्यवस्था करेल. ग्वाल्हेर, जयपूर वगैरे संस्थानिकांनी ताबडतोब त्याला संमती दिली आणि आपली सैनिकी पथके फुकट प्रशिक्षित करून घेतली. प्रशिक्षणासाठी बचत केलेला पैसा त्यांनी सरकारी खजिन्यामध्ये जमा केला.

मात्र बडोद्याच्या महाराजांनी ती योजना (स्कीम) पसंत केली नाही. ते म्हणाले, ''बडोदे संस्थान दर वर्षी ३,७५,००० रुपये ब्रिटिश सरकारला बडोद्यामध्ये खडे सैन्य ठेवण्यासाठी देत आहे. का तर म्हणे परकीय आक्रमणापासून बडोदे

संस्थानाला वाचवण्यसाठी! त्या खड्या सैन्याला मला 'इंपिरियल सर्व्हीस ट्रुप्स'मध्ये रूपांतर करायची जरूर वाटत नाही. आमच्या सैन्याजवळ हेन्री मार्टिन रायफल्स, कार्बाइन्स, भाले, तलवारी आणि नऊ पौंडी तोफा आहेत. बडोद्यामध्ये कायदा, शांतता सुव्यवस्था राखण्यासाठी तेवढे प्रशिक्षण मिळालेले सैन्य पुरेसे आहे, असे मला वाटते.''

दुसऱ्या महायुद्धाच्या (१८३८-१९४५) वेळी ब्रिटीश सरकार सयाजीरावांचे स्पष्टीकरण ऐकून घेण्याच्या मनःस्थितीमध्ये नव्हते. हिटलर एकामागून एक युरोपीय देश गट्ट करत आगेकूच करत होता. या वेळी त्यांनी पवित्रा बदलला आणि रिझर्व्हड इंडियन स्टेट फोर्स (आय० एस० एफ०) म्हणून एक योजना १९३८ मध्ये सयाजीरावांच्या इच्छेविरुद्ध ती त्यांच्या गळी उतरवली. अशा रीतीने महाराजांची 'सेकंड बरोडा इन्फंट्री' ही बटालियन आय० एस० एफ० योजनेखाली आली. त्याची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे –

(१) गुजराथसारख्या अहिंसाप्रेमी लोकांमध्ये लष्करी प्रेम निर्माण करणे, (२) संमिश्र (कॉस्मॉपॉलिटन) प्रजा (लढाऊ आणि बिनलढाऊ) आणि (३) त्यासाठी सहिष्णुता (टॉलरन्स) (स्थानिक गुर्जर आणि उपरे मराठी व दाक्षिणात्य) शिकवणे. 'फोडा आणि राज्य करा' यावर विश्वास असणाऱ्या इंग्रजांच्या तोंडी सहिष्णुतेची भाषा! सयाजीरावांनी ओळखले, इंग्रजांचे काही खरे नाही!

**५) इतिहासाचे भान** – आपल्या गायकवाड पूर्वजांनी मुसलमानांकडून गुजराथमधील भला मोठा मुलूख जिंकून त्याचा हिंदूपदपातशाहीमध्ये समावेश केला, याचा सयाजीरावांना रास्त अभिमान वाटत असे; पण पूर्वजांनी केलेल्या दोन पापांची त्यांना तेवढीच लाजही वाटत असे. पहिले पाप भाडोत्री मुसलमान अरबांना आपल्या सैन्यामध्ये भरती करण्याने ते अरब शिरजोर होऊन; ऐकेनासे झाले. त्या वेळी इंग्रजांची मदत घेऊन, अरबांचा काटा काढला, पण इंग्रजांनी लादलेल्या तैनाती फौजेचा खर्च भागवण्यासाठी भडोच आणि सुरत ही मौल्यवान बंदरे व तापी आणि नर्मदा यांच्यामधील अत्यंत सुपीक मुलूख इंग्रजांना आंदण दिला, हे दुसरे पाप. आपले दिवाण आणि शिक्षक सर टी० माधवराव यांनी हे मुलूख परत घेण्याचे काहीही प्रयत्न केले नाहीत, याचे त्यांना फार दुःख वाटत असे. आपण का हरलो आणि गुलाम झालो? यांच्या कारणांचा विचार करत असताना, त्यांना ही कारणे दिसत. १) बाजारबुणग्यांची गर्दी, २) ध्येय आणि शिस्त नाही आणि ३) शस्त्र आणि (संरक्षण) शास्त्र दुर्बल, ४) गुजराथवर जास्तीत जास्त आणि प्रदीर्घ मुसलमानांचा अंमल, ५) जास्त प्रभावी शस्त्रांच्या उत्पादनाचा अभाव. जर्मन उद्योगपती क्रुपची मदत (स्मॉल आर्म्स) वगैरे घेऊन महाराज भारताबाहेर त्यासाठी

त्यांच्या उत्पादनाच्या खटपटीत होते. इंग्रज अर्थातच त्यांना परवानगी देणे शक्य नव्हते.

६) **सैनिकी शिक्षण** – सयाजीराव काय किंवा लोकमान्य टिळक काय, दोघांचे लष्करी आणि परराष्ट्रीय धोरण एकच होते. "तुमची ताकद अजमवून पहा. योग्य संधी मिळताच सशस्त्र लढा करायला बिचकू नका. योग्य संधी म्हणजे एखादे महायुद्ध. तोपर्यंत त्या लढ्याची गुप्तपणे तयारी करत रहा. सैनिक, त्यांचे प्रशिक्षण, परराष्ट्रीय आर्थिक आणि शस्त्रांची मदत व शत्रूचा शत्रू तो आपला मित्र." आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके आणि चाफेकर बंधू बडोदा येथे सैनिकी शिक्षण मिळते का, हे पाहण्यासाठी बडोद्यामध्ये आले होते. (स्वातंत्र्य मिळाल्यावर हिंदुस्थानचे स्वातंत्र्य अबाधित राखण्यासाठी आणि त्या स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी बुद्धिमान, धाडसी आणि युद्धाच्या हालचाली व व्यूह (मुव्हमेंटस व स्ट्रॅटेजीज) जाणणारे वीर आपल्या सैन्यात पाहिजेत. त्यासाठी लष्करी शिक्षणाची आवश्यकता आहे. म्हणून चाफेकरांना उदेपूर संस्थानामध्ये समादेशक (ॲडव्हायझर) असलेल्या श्यामजी कृष्ण वर्मांना खुद्द लोकमान्य टिळकांनी १० जानेवारी १८९६ रोजी पत्र लिहून चाफेकरांना संस्थानाच्या लष्करी नोकरीमध्ये घेण्यासाठी शिफारस केली होती! टिळक, शामजी कृष्ण, सयाजीराव आणि क्रांतीचे प्रशिक्षण यांचे अद्वैत यामुळे लक्षात यावे.)

प्रत्येक वेळी सयाजीरावांना परदेशी जाणे शक्य नव्हते. त्यासाठी ते पूर्व-तयारी म्हणून काही तरी सबब काढून कोणा विश्वासू अधिकाऱ्याला परदेशी पाठवत. त्याला दिलेले काम निराळे असायचे आणि अंतरंगांतील हेतू आणि कार्य वेगळे असायचे. उदाहरणार्थ प्रा० पुरोहितांना पाँडेचरीस धाडण्यात आले ते दक्षिण भारतातील जुनी संस्कृत हस्तलिखिते विकत घेण्यासाठी. आतला हेतू होता, श्री अरविंद परत भारतात येऊ शकतील का, हे चाचपून पाहण्याचा.

रशियन झारने भारतीय तरूणांना लष्करी शिक्षण देण्याचे कबूल केले होते. या योजनेची चर्चा २८ डिसेंबर १९०४ रोजी मुंबईमध्ये टिळकांनी रशियन काँसुलेटबरोबर केली होती, असे नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या रशियन पेपर्सवरुन समजून येते. त्या योजनेनुसार बडोद्याहून खाशेराव जाधवांचे धाकटे बंधू माधवराव यांना श्यामजी कृष्ण वर्मा यांच्या मदतीने उच्च लष्करी शिक्षणासाठी युरोपमध्ये धाडण्यात आले. त्याच योजनेखाली सयाजीरावांनी एका स्विस लष्करी तज्ज्ञास बडोद्याला सेनाप्रमुख म्हणून आमंत्रित केले होते (करंदीकर, अ० ज०, क्रांतिकारक टिळक नि त्यांचा काळ, पृ० २८२). संभाव्य युद्धांमध्ये अद्ययावत प्रशिक्षण घेतलेली भारतीय सेना हाताशी असावी, असे दोघांचे गणित होते. दोन कारणांसाठी

ही गुप्त योजना यशस्वी झाली नाही. (१) जपानने १९०५ मध्ये सागरी युद्धामध्ये रशियाला हरवले. (२) त्याच वर्षी झारविरूद्ध क्रांतियुद्ध झाले आणि झारची सत्ता संपली.

### ७) बडोदे सेनादल (बरोडा काँटिंजंट)

दिवाण माधवरावांवर सर्व मराठी वृत्तपत्रांचा, विशेषतः 'केसरी'चा, एक गंभीर आरोप होता. त्यांनी इंग्रज सरकारबरोबर एक करार करून, बडोद्याच्या सैन्याची ('बरोडा काँटिजंट'ची) संपूर्णपणे वाट लावून टाकली. बडोदे सैन्यदलाजवळ ३,००० घोडदळ होते. बडोद्याच्या लष्कराची ती शेवटची निशाणी होती. एके काळी गायकवाडांची दानत बिघडली. ते आपल्या स्पर्धकाला नामोहरम करण्यासाठी आणि सत्ता मिळवण्यासाठी इंग्रजांच्या नादी लागले व ईस्ट इंडिया कंपनीच्या सेवेसी रुजू झाले. त्यांनी राजसत्ता मिळवली, पण इंग्रजांना गुजराथच्या राजकारणामध्ये कायमचा प्रवेश मिळवून दिला. कंपनी सरकारने लगेच बडोद्यावर २,००० प्रशिक्षित सेना आणि तोफखाना दल यांची 'तैनाती फौज' लादली. किंमत? सालिना आठ लाख रुपायांचा मलिदा. या नव्या बळावर कंपनीने नव्या मोहिमा प० भारतामध्ये सुरू केल्या. त्यामुळे जादा सैन्याची जरूर भासू लागली. २,००० चे ३,००० आणि ३,००० चे १८१७ मध्ये ४,००० सैन्य झाले. त्यामध्ये ४,००० पायदळ, १,००० अश्वदल आणि तोफखाना यांचा समावेश होता. गायकवाड सरकार होतेच त्यांचा खर्च सोसायला. कंपनी सरकार आता गायकवाडांकडून सालिना २५ लाख रुपये उकळत होते. नादान गायकवाड एवढी रक्कम रोख देण्याऐवजी कंपनीला तेवढा कर देणारा मुलुख तोडून द्यायला राजी झाले. कंपनीला त्यामध्ये फायदाच फायदा होता. १८१७ मध्ये साऱ्या भारतातील सर्वांत सुपीक आणि सधन ४,००० चौ.मैल प्रदेश इंग्रजांना बक्षीस म्हणून फुकट मिळाला होता – जवळ जवळ दोन परगण्यांएवढा (उदाहरणार्थ नॉर्थ हंबरलँड आणि नॉरफोक) २० लाख लोकसंख्या असलेला मुलूख. गायकवाडांना हे काही कळत का नसेल? विनाशकाले विपरीत बुद्धी! १८१८ मध्ये पुणे पडले आणि साऱ्या पश्चिम भारताचा कब्जा इंग्रजांना मिळाला. तैनाती फौजेची आता त्यांना आवश्यकता नव्हती. त्यामुळे ती कमी करण्यात आली. फौज कमी झाली की खर्च कमी होतो. खरं म्हणजे गायकवाडांनी तोडून दिलेला मुलूख परत मागायला पाहिजे होता; पण त्यासाठी मनाची हिंमत लागते. गुलामीमुळे ती केव्हाच ते हरवून बसले होते. अरेरे, राजकारणामध्ये परवंशतेसारखे पाप दुसरे काही नाही. सयाजीरावांच्या प्रशिक्षणकाळामध्ये गुलामी मनोवृत्तीच्या दिवाणांमुळे हे घडले.

सर टी० माधवराव तसे 'उपरे' होते. मराठ्यांच्या इतिहासाचे तसे त्यांचे जवळचे नाते नव्हते. १८७८ मध्ये तैनाती फौज 'खालसा' झाली; पण 'बरोडा काँटिंजंट' सुरूच राहिली. इंग्रजांनी बडोदे सेनादलाचे विसर्जन करण्याचा प्रस्ताव मांडला. त्याला तत्काळ दिवाणांनी संमती दिली. ते पाहून चेव चढलेल्या इंग्रजांनी दुसरा प्रस्ताव मांडला. सेनादलाला काठेवाडामधील महालांमध्ये पोलीसी काम सोपवले होते. महाल त्या वेळी इंग्रजांच्या सत्तेखाली होता. आता ते काम इंग्रजांकडे आले. म्हणून बडोदे संस्थानाने इंग्रजांना त्या जादा कामाचे पैसे दिले पाहिजेत. हे अजब तर्कशास्त्र होते; पण माधवरावांना त्याचे काही सोयरसुतक नव्हते. त्यांनी इंग्रजांना दर वर्षी ३,७५,००० रुपये देण्यास चटकन होकार दिला. अशा दिवाणांना रेसिडेंटने त्रास म्हणून कधी दिला नाही. रेसिडेंटने मागणी करण्याचाच अवकाश की, दिवाणाने त्याला लगेच मान्यता देऊन टाकलीच. दिवाणांवर मराठी वृत्तपत्रांनी, विशेषतः पुण्याच्या 'केसरी'ने कडाडून हल्ला चढवला. माधवरावांचा बचाव पुढीलप्रमाणे होता, ''मी कबूल झालो नसतो, तर मला काढून दुसरा आणखी नरम प्रकृतीचा दिवाण इंग्रजांनी नेमला असता आणि आपले ईप्सित साध्य केले असते.'' त्या अंधाऱ्या रात्रीच्या वेळी पुण्याच्या 'केसरी'ने 'धोक्याची घंटा' वाजवून जागे करण्याचे महत्त्वाचे काम केले. सयाजीराव ते ऋण कधीच विसरले नाहीत.

**८) शस्त्रे आणि शास्त्रे**

**अ) मानसशास्त्र** – सयाजीरावांना नर्मदातीरी वास्तव्य करणाऱ्या ब्रह्मानंदांनी अगदी सुरुवातीला उपदेश केला होता. तो सयाजीरावांच्या मनामध्ये सदैव ताजा होता. १) जिसकी लकडी उसकी भैंस। २) शत्रू तुमच्या शिव्यांना वा निषेधपत्रांना जराही महत्त्व देत नाही; मात्र तो तुमच्या सैन्याला बिथरवण्याच्या शक्तीला घाबरतो. ३) तुमची शस्त्रे शत्रूच्या शस्त्रांपेक्षा जास्त समर्थ पाहिजेत. त्यांचा अभ्यास आणि त्यांचे संशोधन करणारी तज्ज्ञ मंडळी तुमच्यापाशी पाहिजेत. ४) राजकारणामध्ये चोरी क्षम्य असते. शत्रूच्या शस्त्रांच्या विकासाच्या आणि संशोधनाच्या गुप्त माहितीची चोरी करणारी माणसे तुमच्याकडे पाहिजेत. शत्रूचा शत्रू तो तुमचा मित्र. तुम्हाला मदत करणे ही त्याची गरज आहे, तुमची नाही. या मित्राकडे तुमचे तज्ज्ञ धाडा आणि त्यांना प्रशिक्षित करा. ते तुमच्याशी एकनिष्ठ आहेत ना याची अधूनमधून चाचपणी करत जा.

**आ) शस्त्रागार** – मोठ्या प्रमाणावर हिंसा आणि विध्वंस करणाऱ्या शस्त्रांचा विकास तसा अलीकडचा, म्हणजे पहिल्या महायुद्धानंतरचा आहे. १८५७ मध्ये इंग्रजांच्या आणि भारतीयांच्या शस्त्रांमध्ये फारसा फरक नव्हता. फरक होता तो

सेनेच्या शिस्तीचा आणि रणनीतीचा. पहिल्या युद्धामध्ये तर हातघाईच्या युद्धाला जास्त महत्त्व दिले गेले. त्यामध्ये भारतीय आणि नेपाळी वीरांनी खूप शौर्य दाखविले. अरेरे, त्यांना इंग्रजांनी 'फॉडर' म्हणून वापरले! भारतीय एके काळी धातूशास्त्रामध्ये खूप पुढे होते. एके काळी भारतामध्ये अशा पोलादी तलवारींची निर्मिती होई की, त्यांची धार अनेक वर्षे जशीच्या तशी राही. मुसलमानी काळामध्ये या विद्येचा उपयोग आपली गुलामगिरी घट्ट वाढवण्याकडे होईल या भीतीने तो विकास बुध्याच होऊ दिला नाही. सयाजीरावांनी धातुशास्त्राचा (मेटॅलर्जी) विकास करण्यासाठी कलाभवनाची (आजचे इंजिनियरिंग कॉलेज) स्थापना केली.

**इ) रायफल क्लब** – काँग्रेसची अधिकृत नीती सत्य आणि अहिंसेची म्हणजे बौद्ध संन्याशांप्रमाणे होती आणि पक्षाचे पुढारी काळानुसार त्यामध्ये फरक करण्यास तयार नव्हते. याच्या उलट, सावरकरांचा आग्रह अद्ययावत शस्त्र आणि (युद्ध) शास्त्रांवर होता. प्रत्येक भारतीय तरुणाला लष्करी शिक्षण आवश्यक असावे, असे त्यांना वाटे. बडोद्याची लोकसंख्या समप्रमाणात विभागलेली होती. गुर्जर प्रजा या बाबतीत गांधीजींच्या सत्य-अहिंसेमागे, तर मराठी मंडळी एकजात समशेर बहाद्दूर. त्यामुळे बडोद्यामधील रायफल क्लबमध्ये मराठी मंडळी संख्येने अधिक असल्यास नवल नव्हते.

सयाजीराव युरोपमध्ये या शस्त्रास्त्रांचा विकास कसा घडत गेला, ते तेथील शस्त्र संग्रहालयात जाऊन तासनतास बघत बसत. तेथे त्यांना संबंधित तज्ज्ञ भेटत आणि त्यांचे पत्ते कळत. त्यांनी क्रप्स या जर्मन पोलाद उद्योगपतीला (स्टील जायंटला) गाठून बंदुका आणि गोळ्या (स्मॉल आर्म्स) तयार करण्याचा कारखाना नेपाळ या शेजारी राष्ट्रामध्ये टिळक आणि नाट्याचार्य खाडिलकर यांच्या मदतीने सुरू केला. वरकरणी दिखाऊ रूप होते कौलांच्या कारखान्यांचे! क्रांतिकारकांनी सावरकर आणि हरदयाळ यांच्या मदतीने हँडबिलांच्या द्वारा ब्रिटिश हिंदी सैन्यामध्ये, विशेषतः शीख सैन्यात असंतोष निर्माण करून त्यांना आपलेसे केले. गोव्यामध्ये आणि विदर्भात (हैदराबाद संस्थानात) असा उद्योग सुरू करायचा विचार होता. इंग्रज हेरांना त्याचा सुगावा लागला आणि त्या १९१५च्या सशस्त्र उठावाच्या योजनेवर थंड पाणी पडले.

### ९) हेर खाते

**अ) आवश्यकता** – तिसरे सयाजीराव इतर राजेमहाराजांपेक्षा खूप निराळे होते. ते 'तिहेरी आयुष्य' जगत होते – बडोद्याचे महाराज देशभक्त, क्रांतिकारक आणि समाजसुधारक. पहिल्या आणि तिसऱ्या गोष्टीला इंग्रजांची अडचण नव्हती;

पण दुसऱ्या गोष्टीसाठी म्हणजे क्रांतिकारकाच्या भूमिकेसाठी मात्र गुप्तता राखणे आवश्यक होते. इंग्रजांना त्यांचे पडद्यामागील उपद्व्याप समजले असते, तर त्यांनी महाराजांना राजद्रोहाच्या गुन्ह्यासाठी फासावर चढवण्यास मागेपुढे पाहिले नसते. ते लोकमान्य टिळकांचे सन्माननीय परराष्ट्र मंत्री होते. त्यामुळे इंग्रजी हेरांचे ते जेथे जातील, तेथे त्यांच्यावर लक्ष असे. वेश बदलून त्या हेरांना ते कसे उल्लू बनवत, ते त्यांचे त्यांनाच ठाऊक. प्रकटपणे ते युरोपीय आणि इतर देशांमधील नेत्यांना, उदाहरणार्थ मुसोलिनी, हिटलर, प्रो० रूझवेल्ट वगैरेंना अधिकृतपणे इंग्रजांची परवानगी घेऊन, राजरोसपणे भेटत असत. त्यांच्याशी बरोबरीच्या नात्याने चर्चा करत असत आणि पाहिजे ती माहिती काढून घेत असत. त्यानंतर पाठपुरावा करण्यासाठी खाशेराव जाधव, माधवराव जाधव, बॅ० केशवराव देशपांडे, वि० पां० नेने यांच्यासारखे विश्वासू सचिव किंवा अधिकारी धाडले जात. ह्या मंडळींचे एक समान वैशिष्ट्य असे – ते चुकूनही आपले तोंड उघडत नसत. त्यामुळे सयाजीरावांचा खराखुरा इतिहास अजून तरी अज्ञातच आहे आणि तो अज्ञातच राहील. त्या वेळी लिहून ठेवणे म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखे होते. युरोपमध्ये प्रत्येकावर वेगळी जबाबदारी सोपवली जाई. एका अधिकाऱ्याला दुसरा काय करतो याचे कुतूहल असले, तरी परस्परांमध्ये चर्चा होत नसे. त्या हेरांमध्ये काही गोरी मंडळी होती; पण त्यांची माहिती उपलब्ध नाही.

**आ) महाराज उत्तम** हेर – परदेशामध्ये गुप्तहेरांचा ससेमिरा कायमचा मागे लागल्यामुळे महाराजांना युरोपात वा अमेरिकेत संचारस्वातंत्र्य नव्हते, असे महाराजांच्या युरोपीय लेखकांनी लिहिलेल्या चरित्रांवरून कळते. अशा वेळी वेश बदलून विशिष्ठ स्थळी वा वेळी महाराज क्रांतिकारकांना भेटायचे धाडस करत. हे ते कसे सिद्ध करत ते सांगायला आज दुर्दैवाने कोणीही हयात नाही. कोणीही त्याबाबत एक चकार शब्दही लिहून ठेवलेला नाही. वि० पां० नेने हे त्यांचे एकदम निकटवर्ती सचिव आणि माझे वडील. त्यांनी माझ्या आईला सांगितलेली एक गोष्ट अजूनही आठवते. एकदा महाराजांनी सावरकरांना लंडनमध्ये विचारले, "सावरकर, गुप्तहेरांना चकवण्याचा सर्वांत उत्तम उपाय कोणता?"

सावरकर म्हणाले, "रोमिओची भूमिका करणे. गुप्तहेर शेवटी माणूस असल्यामुळे, करू द्या बिचाऱ्यांना प्रेम, अशीच सहानुभुतीची वृत्ती ठेवतो. त्याचा आपण चांगला फायदा उठवायचा." "तुमचे ठीक आहे, तुम्ही तरुण आहात."

"तरुण नसलात, तरी मेकअपमुळे तरुण दिसण्याची सोय आहे ना" (नेने, वि० पां०, यांनी मनोरमाबाई नेने (लेखकाच्या मातोश्री) यांनी सांगितलेली आठवण).

महाराज या नव्या खेळामध्ये एवढे तरबेज झाले की, चिमणाबाईंचादेखील गैरसमज होत असे. त्यामुळे दोघांमध्ये भरपूर भांडाभांडी व्हायची. अशा दोनचार प्रसंगांचे सुंदर वर्णन आपल्याला गांधीवादी आणि पारदर्शकता मानणाऱ्या आणि महाराजांचे एडीसी-कम्-डॉक्टर असलेल्या सुमंत मेहतांच्या आत्मचरित्रामध्ये आढळते. ''महाराणींनी त्या प्रेमिकेचे पत्र वाचले आणि दोघांमध्ये मोठे भांडण झाले. महाराणींनी सारे घर डोक्यावर घेतले. महाराज शांत होते. महाराणींनी महाराजांना वाटेल ते बोलून घेतले. महाराणींनी जुनी प्रकरणे उकरून काढली. फार झाले तेव्हा महाराज थंडपणे म्हणाले, ''आपणांस हे पसंत नसेल, तर आपण वेगळे राहू शकता.'' दुसऱ्या एका ठिकाणी डॉ० मेहता लिहितात, ''एकदा आम्ही हाईड पार्कमध्ये फिरत होतो. मी त्यांना म्हणालो, ''ही माणसे पहा, आपल्या मागे मागे फिरत आहेत. ते इंडिया हाऊसला सारी माहिती पुरवतात. तुमच्या अशा वागण्याने प्रजेला फार दुःख होते.'' त्यांच्या डोळ्यांत एकदम विलक्षण तेज आले आणि ते मला म्हणाले, ''डॉक्टर, तुम्ही वयाने लहान आहात. तुम्ही डॉक्टर असलात, तरी तुम्हाला विशिष्ट गोष्टी समजत नाहीत.'' मी म्हणालो, ''मी काही लहान नाही, चौतीस वर्षांचा आहे. न्याय आणि नीती यांच्या दृष्टिकोनातून पाहा म्हणजे माझे म्हणणे तुम्हाला समजेल.'' ते शांतपणे म्हणाले, ''तुम्ही वरणभात खाणारे आणि थंड रक्ताचे आहात. तुमचे वय वाढले म्हणजे आपोआप तुम्हाला समजायला लागेल'' (डॉ० मेहता, सुमंत, आत्मकथा (गुज०) पृ० २०७ व २०९).

बडोद्यातदेखील गुप्तहेरांचा सुळसुळाट होताच. म्हणून गंगनाथचे सरस्वती मंदिर (बाँब स्कूल) बडोद्यामध्ये प्रथम काशीविश्वनाथ मंदिराच्या पडवीमध्ये आणि नंतर भीमनाथी दांडेकरांच्या घरामध्ये आणण्यात आले आणि ते थोड्याच काळात बंद करावे लागले. आपले अधिकारी आपण दीर्घ काळ युरोपात असतो, त्या काळात आपल्या गैरहजेरीचा फायदा कसा उठवतात आणि गरिबांना नाडून लाच उपटतात का, याचा तपास करण्यासाठी महाराज स्वतः वेश बदलून सामान्य प्रजेमध्ये मिसळत. त्यांची दुःखे जाणून घेत आणि छळ करणाऱ्या अधिकाऱ्याचे नाव बोलता बोलता शिताफीने काढून घेत. एकदा तर सुब्यास (कलेक्टरास) भेटण्यासाठी एका शिक्षकाने त्याच्या नोकराला एक रुपयाची लाच दिली. बिचाऱ्या नोकराला काय कल्पना की, तो शिक्षक म्हणजे स्वतः महाराजच आहेत. एका जख्ख म्हातारीने एका खेडुतास थांबवून फर्मावले, ''ही लाकडाची मोळी जरा उचलून माझ्या डोक्यावर ठेव ना.'' दुसऱ्या दिवशी तिला राजमहालामध्ये बोलावणे आले, तेव्हा तिला कळले की, आपण ज्याला काल मोळी उचलून डोक्यावर ठेवायला सांगितले, तो दुसरा तिसरा कोणी नसून स्वतः महाराजच होते. महाराजांनी तिला एक मोठी रक्कम भेट

दिली. या सर्व गोष्टींमुळे त्यांच्या अधिकाऱ्यांना महाराज बडोद्याच्या बाहेरच असले तर बरे, असे वाटे. एवढी सुप्त दहशत होती महाराजांच्या वेश बदलून फिरण्याची.

**इ) महाराजांचे खास हेर** – रेसिडेंटच्या वसतिस्थानामध्ये आपल्याविरुद्ध कोणती खलबते शिजतात, हे जाणून घेण्यासाठी महाराज शत्रूच्या शिबिरामध्ये आपली माणसे पेरत असत. रेसिडेंटने राजमहालामध्ये वा खासगी खात्यामध्ये कोणाकोणास पेरले आहे आणि आपण कोणापासून सावध असावे यासाठी त्यांचे हे खबरे फार उपयोगी ठरत. इंग्रज सरकार डोळ्यांत तेल घालून महाराजांच्या प्रत्येक हालचालींवर पाळत ठेवत असे (सरदेसाई, गो० स०, सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात, १९५६, पृ० ४१). त्यामुळे महाराजांना प्रतिहेरखात्याची फारच आवश्यकता असे. त्या माहितीवर त्यांची पुढची खेळी अवलंबून असे. म्हणून ती माहिती वेळेवर मिळणे आणि ती अचूक असणे फार महत्त्वाचे असे. या बाबतीत ते अत्यंत सावध आणि दक्ष असत. तरीदेखील ते चार वेळा फसले. १) बापट प्रकरणी बापट निर्दोष आहेत हे त्यांना नीट समजले होते. दिवाण मणीभाई रेसिडेंटच्या हातचे बाहुले बनून गुजराथी-दक्षिणी (मराठी) राजकारण खेळण्यासाठी उद्युक्त केला गेला. त्यासाठी लोकमान्य टिळकांना बडोद्यामध्ये येऊन चार महिने मुक्काम ठोकावा लागला. २) इंग्रज अधिकाऱ्यांनी १९११ मध्ये गोखले यांच्यावर दबाव आणला की, ''तुम्ही सयाजीरावांकडून लेखी माफीचा कागद घेऊन या.'' ते त्यांच्या आधीच लक्षात यायला पाहिजे होते. ३) व्हॉईसरॉयच्या नातेवाइकाने महाराजांना चक्क फसवले. दातार नावाच्या अधिकाऱ्यांनी त्यांना आधी सावध करायला पाहिजे होते. ४) १९३९ मध्ये वल्लभभाई पटेल यांनी बडोद्यामध्ये उगाचच गुजराथी-मराठी वाद पेटवला. सरदार आणि त्यांच्या पटेल अनुयायांची घोषणा होती, 'चटणाओ चाल्या जाव' (मराठ्यांनो, चालते व्हा). त्या वादामध्ये सुर्वेची पठाणांकडून फुकट हत्या करवली गेली. अर्थात आधी माहिती समजली असती, तरी फारसा उपयोग झाला नसता, कारण महाराज त्यांच्या शेवटच्या गंभीर आजाराने रुग्णशय्येवर होते आणि त्यानंतर त्यांचे लगेचच निधन झाले.

या हेरगिरीचे एकदा मला विश्वदर्शन झाले. मानसिंगराव गायकवाड बडोद्याचे डी०एस०पी० होते. त्यांचा बिवलकर नावाचा एक विश्वासू हेर माझ्या रुग्णालयामध्ये दाखल झाला होता. तो त्याचे शेवटचे दिवस मोजत होता. तो केसरी, लोकसत्ता, मराठा वगैरे प्रसिद्ध पत्रांचा बातमीदार म्हणून बडोद्यामध्ये वावरत असे. त्या काळामध्ये मानसिंगराव गायकवाड त्याला पगाराव्यतिरिक्त पंचाहत्तर रुपये खास सेवेसाठी देत असत. त्याचे विलक्षण आणि थरारक अनुभव आणि अतिशय माहितीपूर्ण मुलाखत मी त्या वेळी 'सोबत' साप्ताहिकामध्ये प्रसिद्ध

केली होती. ती वाचून जयवंतराव टिळकदेखील थक्क आणि बेचैन झाले होते. ते म्हणाले, "मी त्यास कमालीचा सावरकरभक्त समजत असे आणि तो असा हेर निघावा? आपण त्यास एकांतात किती तरी न सांगण्यासारख्या गोष्टी बोललो असू."

**ई) अंतिम विजय** – महाराजांच्या पाठीवर एवढे खास हेर नेमूनदेखील इंग्रजांना महाराजांच्या हालचालींविषयी फारशी माहिती कधीच मिळू शकली नाही. या बाबतीत इंग्रज हारले आणि महाराज जिंकले, याची स्पष्टपणे कबुली देणारे स्कॉटलंड यार्डच्या मुख्य अधिकाऱ्याचे क्लिव्हलंडचे २६ मार्च १९१४ चे एक पत्र उपलब्ध आहे. "बँकर बंधूंवर पाळत ठेवली नव्हती, कारण त्यांचे नाव पाळत ठेवायच्या यादीमध्ये नव्हते. महाराजांवर पाळत ठेवणे अतिशय महागडे आणि कष्टमय काम आहे. मागील वर्षांचा आमचा अनुभव समाधानकारक नव्हता. महाराजांचा पक्ष एवढ्या वेळा फुटायचा की, त्यांच्या दोन्ही बाजूंच्या मधल्या साथीदारांवर लक्ष ठेवणे आम्हाला शक्य होत नसे. गेल्या वर्षीच्या व्यवस्थेवर मी खूष नाही. सारांश माझे (तुमच्या तारेस) उत्तर 'नाही' असे आहे. या वर्षी युरोपमध्ये त्यांच्यावर पाळत ठेवायची गरज नाही." (चार्लस क्लीव्हलँडचे हे पत्र इंडिया हाऊसमध्ये ज्या फायलीत ठेवले आहे तिचे नाव 'बाँडेड बॉक्स केस') हे सांगितले तर आश्चर्य वाटेल की, ही 'व्यवस्था' बडोद्याच्या रेसिडेंट इंपे यांच्यापासून लपवून ठेवली होती. न जाणो, तो फुटलेला असेल तर? क्लिव्हलंडचे म्हणणे, फार लोकांना याची माहिती झाली, तर माहिती फुटण्याचा धोका अधिक. व्हॉईसरॉय हार्डिंगचा त्याला विरोध होता. रेसिडेंट तर आमच्या आतल्या गटातला. त्याला तर ही माहिती असायलाच पाहिजे. लंडनने व्हॉईसरॉयचेदेखील ऐकले नाही. स्कॉटलंड यार्डचे म्हणणे, बँकर बंधू जवाहिरे होते आणि महाराणी चिमणाबाई त्यांच्याकडून सतत दागिने खरेदी करत असत. आतली गोष्ट अशी होती की, ते जवाहिरे होते हे खरे; पण ते क्रांतिकारकांना सयाजीरावांचे पैसे पोचवणारे मध्यस्थदेखील होते. जवाहिरे हे दाखवायचे रूप होते! वा रे स्कॉटलंड यार्डचे 'हेरखाते'! गोऱ्या अधिकाऱ्यांमधील परस्परांविषयीचा संशय आणि त्यामधून निर्माण होणाऱ्या गोंधळाचा आनंद सयाजीराव नेहमी उपभोगत असत.

/ / /

११



# परराष्ट्रीय धोरण

**अ) आधारभूत सूत्रे** – हैदराबाद, म्हैसूर, कोल्हापूर आणि काश्मीर या राज्यांमध्ये आणि बडोद्याच्या राज्यामध्ये फार मोठा फरक होता. या इतर राजांना राष्ट्रीय धोरण नव्हते, तर परराष्ट्रीय धोरणे कोठून असणार? सयाजीरावांचे जगभर संबंध होते आणि त्यांनी सर्वांशी पत्रसंबंध नियमितपणे सुरू ठेवला होता. जगभराच्या वार्ताहरांशी त्यांच्या ओळखी होत्या. जे टिळकांचे परराष्ट्रीय धोरण, तेच सयाजीरावांचे परराष्ट्रीय धोरण होते. श्री० अरविंद त्या दोघांमधील सेतू होते. या तिघांचे परराष्ट्रीय धोरण पुढील पाच सूत्रांमध्ये सांगता येईल,

१) शत्रूचा शत्रू तो आपला मित्र.

२) शक गेले, हूण गेले, गुलाम गेले, सैय्यद गेले, मोगल गेले, तसे इंग्रजही जातील. कोणताही आक्रमक स्वतःहून देश सोडत नाही. त्याला हाकलावा लागतो. इंग्रज येथून किती लवकर घालवले जातील आणि कसे?

३) अजून आम्ही इंग्रजांशी सशस्त्र लढा देऊन जिंकू शकू एवढे लष्करीदृष्ट्या समर्थ झालेलो नाही. आमच्याजवळ मनुष्यबळ भरपूर आहे. आधीच्या आक्रमकांप्रमाणे इंग्रजही ते 'फॉडर' म्हणून वापरतात. गुलामाला, "अरे, तू गुलाम म्हणून का जगतोस? स्वतंत्र म्हणून राहावयाची तुझी क्षमता आहे." असे म्हणून त्याला जागे करणे, हे पुढाऱ्यांचे कर्तव्य आहे.

४) तुमच्याकडे 'जागृत' सैनिकबळ आहे, हे समजले तर शत्रूचा शत्रू, शस्त्र आणि शास्त्र यांच्यासह स्वतःहून तुमच्याकडे मदतीसाठी धावतो.

५) पूर्वतयारी म्हणून सांप्रत देशांमध्ये आणि देशाच्या बाहेर शत्रूचे नीतीधैर्य खच्चीकरण करणे आणि त्याच्या शत्रूला लढण्यासाठी चिथावणी देणे, हा द्विसूत्री कार्यक्रम राबवणे.

**आ) साध्य आणि साधने** – या साऱ्या देशभक्तांचे ध्येय किंवा साध्य एकच होते. देशाला स्वतंत्र करणे आणि भारत देशाला पुन्हा त्याचे हरपलेले वैभव परत मिळवून देणे. पहिला भाग जास्त महत्त्वाचा आणि तात्कालिक होता. तो पूर्ण

झाल्याशिवाय दुसऱ्या भागाचा विचार करणे वेडेपणाचे ठरले असते. सयाजीराव युरोपच्या प्रवासामध्ये निरनिराळ्या पुढाऱ्यांशी आणि सेनापतींशी सहज बोलता बोलता युद्धाचा विषय काढत. त्या सर्वांचे सारखेच मत असे. "शांतता आणि युद्ध हे दोन्ही राष्ट्राच्या राजकारणाचे आवश्यक घटक आहेत. शांतता युद्धाच्या तयारीसाठी आवश्यक आहे. शांतता ही दोन युद्धांमधील मध्यंतरासारखी असते. युद्ध म्हणजे केवळ लष्करी डावपेच नव्हे. नेत्याला संयुक्तपणे लष्करी बळ, मुत्सद्देगिरी, आर्थिक आणि मानसशास्त्रीय डावपेच, त्याचप्रमाणे राष्ट्रीय धोरण या सर्वांचा विचार करावा लागतो. राष्ट्रीय हित आणि ध्येये यांना भेडसावणाऱ्या समस्यांचा जर अनीतिमान शत्रू फायदा घेणार असेल आणि मुत्सद्देगिरीचा जेथे संपूर्णपणे पराभव होणार असेल, तेथे युद्ध अटळ असते."

"एके काळी युद्धे सोपी आणि सरळ होती. बंदुकीच्या दारूचा शोध लागल्यापासून त्यांच्यामधील सरळपणा आणि सोपेपणा संपला आणि सर्वंकष युद्धाला सुरुवात झाली. ही प्रक्रिया अमेरिकी नागरी युद्धापासून सुरू झाली. जनरल शर्मनने जॉर्जीया जिंकल्याबरोबर आपल्या युद्धघोषणेमध्ये जाहीर केले की, "आम्ही केवळ शत्रूच्या सैन्याशी लढत नाही, तर आम्ही शत्रूच्या समस्त लोकांशी लढत आहोत. म्हातारे आणि तरुण, गरीब आणि श्रीमंत, धडधाकट आणि व्यंग असलेल्या सर्व लोकांना सर्वंकष युद्धाची झळ पोहोचणार आहे." युद्धाच्या क्षेत्रातली १७८९ मधील ही संपूर्ण मानववंश नष्ट करणारी पहिली ओंगळ क्रांती होती. १९१४ मध्ये सुरू झालेल्या पहिल्या महायुद्धाने आत्तापर्यंत झालेल्या युद्धामध्ये सर्वांत जास्त रक्तपात, क्रौर्य आणि मनुष्यहानी पाहिली आहे."

"आम्हाला ते चांगले माहीत आहे." सयाजीराव त्यांना भडकवत असत. "जास्तीत जास्त भारतीय सैनिक त्या युद्धामध्ये बळी गेले आहेत. भारतीयांना 'फॉडर' म्हणून वापरले गेले आहे आणि तरीदेखील इंग्लंडला भारताला स्वातंत्र्य द्यावेसे वाटत नाही."

"हिज हायनेस, स्वातंत्र्य असे भीक मागून मिळत नसते. त्यासाठी रक्त सांडावे लागते. तुम्ही म्हणता, एवढ्या सैनिकांचे रक्त सांडले, पण कोणासाठी? ज्यांचा आणि तुमचा काहीही संबंध नाही, अशा इंग्रजांसाठी. तुम्हाला त्या सैनिकांना मातृभूमीसाठी लढायला उद्युक्त करता येत नसेल, तर आम्हाला वाटते, आपण पारतंत्र्यासाठीच लायक आहात."

सयाजीराव त्यावर निरुत्तर होत असत.

**इ) कामाची वाटणी** – जहाल पक्षामध्ये 'भडकू' लोकांचे बहुमत होते. ते क्रांती करायला तयार होते. लढायला तयार होते, मरायला तयार होते; पण एकूण

लोकसंख्येच्या प्रमाणात त्यांची संख्या किती टक्के? याच्या उलट सुधारकांना आणि मवाळांना युद्ध म्हटले की, कापरे भरत असे. इंग्रज त्याचे देव होते. इंग्रजांमुळे देशामध्ये विज्ञान आले, सभ्यता आली, सुरक्षितता आली, रेल्वे, टपाल, तारखाते यासारख्या सोयी आल्या. स्त्रियांना आणि दलितांना समतेची वागणूक मिळू लागली आणि अशा अन्नदात्या राज्यकर्त्यांविरूद्ध युद्ध छेडायचे? हरहर, आम्ही तर जन्मोजन्मी त्यांचे दास म्हणून राहावयास तयार आहोत, असे ते म्हणत.

सयाजीराव काय किंवा लोकमान्य टिळक काय, दोघांचे परराष्ट्रीय धोरण सारखेच होते. ''योग्य संधी मिळताच सशस्त्र लढा. तोपर्यंत त्या लढ्याची तयारी करणे. सैनिक, त्यांचे प्रशिक्षण, शस्त्रे आणि परराष्ट्रीय मदत, शत्रूचा शत्रू तो आपला मित्र. परराष्ट्रीय मदत मिळेपर्यंत शत्रूचे नीतीधैर्य खच्ची करत राहाणे!''

रशियायी झारने भारतीय तरूणांना लष्करी शिक्षण देण्याचे कबूल केले होते. या योजनेची चर्चा २८ डिसेंबर १९०४ रोजी मुंबईमध्ये टिळकांनी रशियन काँसुलेटबरोबर केली होती. त्या योजनेनुसार बडोद्याहून खाशेराव जाधवांचे धाकटे बंधू माधवराव यांना श्यामजी कृष्ण वर्मा यांच्या मदतीने, उच्च लष्करी शिक्षणासाठी युरोपमध्ये पाठवण्यात आले. सयाजीरावांना रशियाचा भरवसा वाटेना. शेवटी माधवरावांनी जर्मनीमध्ये लष्करी शिक्षण घेतले, तेही अधिकृतरित्या. त्या विषयावर त्यांनी पुस्तके देखील लिहिली. (ते आमचे शेजारी होते. त्यांना आम्ही गमतीने 'जर्मन जाधव' असे म्हणत असू.)

ड) **उत्तम गृह धोरण** – परराष्ट्रीय धोरण सफल होण्यासाठी उत्तम गृहधोरणाची आवश्यकता असते. त्यासाठी सयाजीरावांनी धर्माचा चांगला उपयोग केला. पटेल लोक धडधाकट, विश्वासू, धाडसी आणि मरणाला न घाबरणारे. एकदा शब्द दिला की, कोणतीही किंमत देऊन तो पाळणार. म्हणून पटेल पूर्वी पूर्व आफ्रिकेत सुखी व संपन्न झाले. गुजराथमध्ये तर ते संपन्न खेडूत पाटीदार होतेच. पटेल मूळचे क्षत्रिय. कश्यप आणि दक्ष प्रजापतीची सुपुत्री अदिती यांना कुर्मी नावाचा पुत्र झाला. त्याचे हे वंशज. लवाचे वंशज लेहुवा पटेल आणि कुशाचे वंशज कडवा पटेल. कणबी पटेल हे कृमी ऋषीचे वंशज. कडवा पटेलांची कुलदेवता शंकराची पट्टराणी उमियादेवी. उंझा हे साऱ्या जगामध्ये प्रसिद्ध आहे. तेथील उमियादेवीच्या मंदिरात दरवर्षी सर्व पटेल हे यात्रा, बाधा, पूजन, अर्चन, नैवेद्य यासाठी जातात. १२९७ नंतर गुजराथमध्ये मुसलमानांची सत्ता सुरू झाली. त्यांनी प्रथम सोमनाथ मंदिर तोडले. त्यानंतर नंबर लागला तो उंझा येथील उमियामातेच्या मंदिराचा! सयाजीरावांनी १८८७मध्ये त्या मंदिराचा जीर्णोद्धार करून तेथे एक भव्य वास्तू निर्माण केली आणि साऱ्या पटेलांना जिंकून घेतले! त्याचे उद्‌घाटन करण्यासाठी

सुरत आणि अहमदाबाद येथे जिल्हाधिकारी म्हणून काम केलेल्या 'शतपत्रे' फेम गोपाळ हरी देशमुख (लोकहितवादी) यांना सयाजीरावांनी आमंत्रण दिले. पाटीदारांच्या मंदिराच्या उद्‌घाटनाला देशमुख! काय नियोजन आहे !

**इ) सयाजीरावांच्या यशाचे मूल्यमापन** – सयाजीरावांजवळ अमाप राजकीय आणि आर्थिक सत्ता होती. ते संस्थानिक असले तरी इंग्रजांचे गुलाम होते. गुलामाला नेहमीच मर्यादेत राहून काम करावे लागते. तो बाहेर दाखवतो, तेवढे त्याला स्वातंत्र्य नसते. अनिच्छेने का होईना, पण पहिल्या महायुद्धामध्ये त्यांना इंग्रजांना खूपच लष्करी आणि आर्थिक मदत करावी लागली आणि ती त्यांनी केली. त्या मदतीकडे त्यांनी 'गुंतवणूक' म्हणून पाहिले. त्यांना बजावण्यात आले होते की, कुटिल इंग्रज चार मुद्द्यांवरून सयाजीरावांचे शासन कोलमडायला लावतील.

१) चोरी करत असताना जर पोलिसांनी पकडले नाही, तर ती व्यक्ती निर्दोष. राजद्रोहाचेही तसेच आहे. सयाजीरावांनी विश्वासातील माणसे जवळ बाळगून, क्रांतिकारकांना इंग्रज सरकारविरुद्ध मदत केली आणि गुप्तता राखून शेवटपर्यंत अशा थाटामध्ये राज्य केले की, इंग्रजांना त्यांचा राजद्रोह कधीच सिद्ध करता आला नाही. त्यांच्याइतकेच त्यांच्या राजनिष्ठ सेवकांनाही त्याचे श्रेय दिले पाहिजे.

२) गुजराथी-मराठी वादाला खतपाणी घालून आणि तेथे महाराजांविरुद्ध उठाव करवून त्यानुसार हा वाद बडोद्यामध्ये महाराजांनी कधीही वाढू दिला नाही. गुजराथमधील साऱ्या पटेलांना त्यांनी वश करून घेतले होते. त्यांच्यापैकी महत्त्वाच्या व्यक्तींना 'राजरत्न', 'राजमित्र' वगैरे पदव्या बहाल केल्या आणि त्यांच्यामार्फत सर्व खेड्यांवर आपली पकड मजबूत केली. त्यांनी 'बापट प्रकरण' अतिशय कौशल्याने हाताळले. साऱ्या विश्वामध्ये त्यांनी सर्व मोठ्या आणि प्रसिद्ध पुढाऱ्यांशी संपर्क ठेवला व इंग्रजांना काय वाटेल याची पर्वा न करता, त्यांच्याशी मैत्रीचे संबंध जपले.

३) हिंदू-मुस्लीम दंगे आपल्या संस्थानामध्ये महाराजांनी कधीच होऊ दिले नाहीत. त्यांचे हेरखाते पहिल्या दर्जाचे होते. त्यामुळे त्यांना आग लागायच्या आधीच ती विझवता येई आणि आग लावणारे परप्रांतीय मुसलमान हत्यारे, स्फोटक पदार्थ, काड्यापेटी वगैरे मुद्देमालासह पकडले जात.

४) महाराजांना रमेशचंद्र दत्तांसारखे आर्थिक सल्लागार लाभल्यामुळे त्यांचे सर्व प्रकल्प, सर्व योजना आणि त्यांची सर्व स्वप्ने साकार करता आली. प्रजा आर्थिक दृष्टीने गांजल्यावर कोणा परक्याच्या हातचे खेळणे होते; पण महाराजांनी तो धोका कधीच पत्करला नाही. महाराज सत्तेवर यायच्या आधी खंडेराव आणि मल्हारराव यांनी सर्व तिजोरी रिकामी केली होती. दळिद्री बडोद्याचे सुसंपन्न अशा वडोदरा शहरामध्ये (ज्याच्या उदरात वडाची झाडे आहेत.) महाराजांनी रूपांतर केले.

# १२



# विज्ञान आणि तंत्रज्ञान

**अ) इलियटची शिकवण** – इलियटमुळे सयाजी महाराजांना पाश्चिमात्य वैज्ञानिकांची विचार करण्याची, विचारांवर चिंतन करण्याची आणि त्यामधून एका निर्णयापर्यंत येण्याची पद्धत (सिस्टीम) समजली. तेथे धर्म आणि राजकारण यांची गल्लत केलेली कोणालाही आवडत नाही. याचे कारण १८ व्या शतकातील विज्ञानाने आणि तंत्रज्ञानाने केलेली लोकजागृती. आधुनिक तंत्रज्ञानाच्या युगामध्ये स्वसंरक्षणासाठी किंवा उद्धारासाठी परमेश्वरावर अवलंबून राहण्याची जरूरी नाही. पूर्वी ती फार असे. त्या युगाने चर्च आणि राज्य यांचा सांधा तोडला. त्यामुळे इहवादी (सेक्युलर) राजकीय तत्त्वज्ञान निर्माण झाले आणि इंग्रजांमुळे ते हिंदुस्थानमध्ये आले. इंग्रजांचे राज्य साऱ्या जगभर पसरलेले असल्याने त्याचा प्रसार साऱ्या जगभर होणार हे निश्चित होते. पूर्वी ख्रिस्ती धर्म पोपशाहीमुळे पाशवी, जाचक आणि छळवादी झाला. गोव्यामध्ये हिंदूंना पोर्तुगीजांचे राज्य एवढे नकोसे झाले होते की, संभाजी महाराजांना त्यांच्यावर हल्ला करावा लागला. सत्ता म्हटली की तिचा दुरुपयोग होणारच. ते अटळ आहे. पैसा उततो आणि सत्ता माजते. धर्मसत्ता आणि राजसत्ता एकत्र झाल्या, तर मग विचारायलाच नको. ही ऐतिहासिक युती टाळता आली तर पाहिजेच आहे. पाश्चिमात्यांच्या शास्त्रशुद्ध व्यवस्थेने सयाजीरावांवर खूप प्रभाव पाडला. जेवायची पद्धत, चालायची पद्धत, लिहावयाची पद्धत, शिकारीची पद्धत... त्यांनी आपल्या जीवनामध्ये ही शास्त्रशुद्ध पद्धत आणली आणि ती आपल्या अधिकाऱ्यांना आणि त्यांच्यामार्फत प्रजेला शिकवण्याचा प्रयत्न केला. 'यत्न तो देव जाणावा' हे त्यांचे ब्रीदवाक्य झाले. स्वामी विवेकानंदांचे ग्रंथ वाचून पौर्वात्य आणि पाश्चिमात्य विचारांची सांगड घालणे कसे आवश्यक आहे याची महाराजांना कल्पना आणि जाणीव निर्माण झाली. कमीत कमी हे काम आपल्या संस्थानामध्ये झाले पाहिजे आणि ते करण्यामध्ये आपण पुढाकार घेतला पाहिजे, अशी ऊर्मी त्यांच्या मनामध्ये निर्माण झाली. त्यासाठी हिंदू धर्मामधील अंधश्रद्धा आणि जातपात नष्ट करणे, विज्ञानाचा प्रसार करणे, योग्य अशा तरुणांची

निवड करून, त्यांना उच्च शिक्षणासाठी परदेशी पाठवणे आणि त्यांचा योग्य तो फायदा बडोदे संस्थानासाठी करून घेणे, असा सोपा आणि सुटसुटीत कार्यक्रम महाराजांनी आपल्या मनामध्ये आखला. महाराजांची डोकेदुखी निराळीच होती. युरोप-अमेरिकेमध्ये जाऊन, हे तरुण हलक्या जातीच्या गोऱ्या मुलींच्या मागे लागत आणि त्यांना मडमा म्हणून हिंदुस्थानामध्ये आणत. त्यामुळे ही कर्तबगार तरुण मंडळी स्वदेश आणि स्वधर्म यांच्या बाबतीत वाया जात असत. महाराज कोणत्याही गोष्टीच्या यशाचे प्रमाण फार जपत. (cost benefit ratio).

**आ) विज्ञान** – विशेष ज्ञान म्हणजे विज्ञान. हे ज्ञान आले की, अंधश्रद्धा नाहीशा होतात. धर्म आणि विज्ञान विरोधी नाहीत. चांगल्या हातांमध्ये या दोन महाविधायक शक्ती ठरतात, तर दुष्टांच्या हाती त्या महाभयंकर विध्वंसक शक्ती म्हणून सिद्ध होतात. दोघांमध्ये विकृती निर्माण होऊ शकतात. तसे होणे आपल्याला टाळायचे असते. कलकत्त्यामधील शास्त्रीय शिक्षणाच्या वाढत्या प्रसाराबद्दल महाराजांनी तेथील शिक्षकांचे अभिनंदन केले आणि ते म्हणाले, "एकट्यादुकट्या (सर जगदीशचंद्र) बोसाने आपले समाधान होणार नाही. असा काळ खात्रीने येईल आणि असे अनेक बोस निर्माण होऊन देशाच्या आर्थिक भरभराटीस हातभार लावतील, असा मला भरवसा वाटतो... संधी आणि साधने दिली, तर आपण राष्ट्रीय विजय मिळवूच मिळवू, इतकी कार्यशक्ती आपल्या राष्ट्रामध्ये आहे... हिंदुस्थानमध्ये शास्त्रीय शिक्षणाची भलतीच हेळसांड झालेली आहे. विज्ञान आणि वाङ्मय यांचे शिक्षण घेण्यासाठी आपण परदेशामध्ये विद्यार्थी पाठवले पाहिजेत. इतर राष्ट्रांनी कोणत्या पद्धती स्वीकारल्या आहेत, ते त्यांनी पाहिले पाहिजे. किमान श्रमांमध्ये कमाल फलनिष्पत्ती करून दाखवायची, हा अर्थशास्त्राचा एक मोठा सिद्धान्त आहे. तो खरा करून दाखवण्यासाठी शास्त्रीय शिक्षणाची जरूर आहे. येथे (कलकत्त्यामध्ये) नुकतीच जी 'असोसिएशन' स्थापन झाली आहे, तिच्याबद्दल मला मोठी सहानुभूती वाटत आहे. प्रत्यक्ष काम करण्याचे शिक्षण घेतलेले लोक आपल्याला हवे आहेत आणि असे लोक जर देशामध्ये पुरेसे मिळत नसतील, तर त्यांना परदेशी पाठवून आपण तयार करून आणले पाहिजे" (१९ नोव्हेंबर १९०४ रोजी कलकत्त्याच्या सार्वजनिक सभागृहामध्ये मानपत्र घेताना केलेल्या भाषणातून).

**इ) रसायनशास्त्र** – आधुनिक रसायनशास्त्राचा विकास म्हणजे आधुनिक स्फोटकाचा विकास. आधुनिक रसायनशास्त्र म्हणजे नायट्रेटेड कार्बन्सचे संशोधन. या नव्या शास्त्रामुळे क्रांतिकारकांच्या नव्या योजनांना एक नवा हुरूप आला. सयाजीरावांनी बडोद्यामध्ये बऱ्याच रसायनशास्त्रज्ञांना एकत्र करून त्यातील निवडक तरुणांना जपान-जर्मनीला पाठवण्यास सुरुवात केली. त्यातील अग्रणी म्हणजे प्रो०

त्रिभुवनदास गज्जर. प्रो० गज्जर यांच्या केवळ ''उल्लेखामुळे माझे हृदय हेलावले आहे. त्यांचा माझ्याशी जो संबंध आला, त्याचा विशेष प्रकार लक्षात घेता तो संबंध अत्यंत सुखकर असाच झाला... गज्जर हे नाव उच्चारले की, अविरत परिश्रम, अखंड उत्साह आणि अदम्य निश्चय या गुणांची मला आठवण होते'' (२९ जानेवारी १९३३ रोजी अलेंबिक केमिकल्सच्या रौप्य महोत्सवानिमित्त केलेले महाराजांचे भाषण). अलेंबिक फार्मा० कंपनीचे गज्जर मुख्य आधारस्तंभ होते.

**ई) धातुशास्त्र (मेटॅलर्जी)** – पिस्तुलापेक्षा बाँब जास्त निश्चित, जास्त सुरक्षित आणि जास्त भीतिदायक आहे, असा दावा रशियन क्रांतिकारक करत होते. बापटांमुळे ते रशियन ज्ञान भारतीय क्रांतिकारकांच्या हाती लागले; पण जो अनुभव रशियन क्रांतिकारकांना आला, तसा अनुभव भारतीयांना आला नाही. निर्मितीची सुलभता आणि स्फोटाची अचूकता त्यांना जमत नव्हती. या शास्त्राचे महत्त्व बाँबच्या निर्मितीनंतर उमजले. बाँबचे कवच योग्य नसेल, तर तो बाँब कधी लवकर फुटे, कधी उशिरा, तर कधी फुटतच नसे. त्यामुळे बरेच वेळा फोडणाराच मरत असे किंवा घायाळ होत असे. मुख्य म्हणजे बऱ्याचवेळा 'लक्ष्य' सुरक्षित राही. उदाहरणार्थ दिल्लीमध्ये आणि अहमदाबादेत लॉर्ड हार्डिंग. थोडक्यात बाँब निर्मितीच्या यशाचे प्रमाण (कॉस्ट बेनिफीट रेशिओ) क्रांतिकारकांना अनुकूल नव्हते. असे प्रयोग बाँबसाठी आहेत, हे लोकांना न समजता, दिवसाढवळ्या वेगळ्या कारणासाठी त्यावर प्रयोग करता आले पाहिजेत. त्यासाठी त्या ताकदीची माणसे, प्रयोगशाळा आणि अधिकृत संस्था बडोद्यामध्ये सुरू करणे महाराजांना आवश्यक वाटले. हा एक धोकादायक खेळ होता! सयाजीरावांनी १९२३ मध्ये हमरस्त्यावरील जयसिंगरावांसाठी बांधलेला राजवाडा सेनाभवनामध्ये असलेल्या कलाभवनास का देऊन टाकला आणि टाटा स्टील कंपनीला वेगळ्या मार्गाने जाऊन एवढी आर्थिक मदत का केली, याचे रहस्य चाणाक्ष जाणकारांच्या सहज लक्षात येईल.

**उ) पुरातत्त्व (आर्किऑलॉजी)** – सयाजीरावांना ज्ञानाच्या प्रत्येक शाखेमध्ये रस होता आणि त्यामुळे गती होती. त्यामागील चालना देणारी शक्ती म्हणजे या ज्ञानाचा फायदा माझ्या प्रजेला आणि देशाला काय व कसा होऊ शकेल, ही जाणीव. हिंदुस्थानी प्रजा मूर्ख नाही. ती अंधश्रद्ध असेल; पण आपल्याला इंग्रज विज्ञान तंत्रज्ञान आणि उद्योग या क्षेत्रांमध्ये जाणूनबुजून मागे ठेवत आहेत आणि जपानप्रमाणे आपण आपली माणसे युरोप-अमेरिकेमध्ये धाडून हे पाश्चिमात्य विज्ञान आणि तंत्रज्ञान हस्तगत केले पाहिजे, या टिळकांच्या मताशी ते एकदम सहमत होते आणि हे कशासाठी तर त्यांचीच शस्त्रे वापरून त्यांचाच पराभव करण्यासाठी.

मागे वळून पाहताना सयाजीरावांनी विज्ञान हे 'परहस्त गतं धनं' समजून ते परत कसे मिळवता येईल, यासाठी अतोनात प्रयत्न केले. आज सर्वच विज्ञानाच्या क्षेत्रांमध्ये भरपूर प्रगती झालेली दिसते. तशी प्रगती त्या वेळी झाली नव्हती. तेही लोक अंधारामध्ये चाचपडत होते; पण आपल्यापेक्षा खूपच प्रगत होते. पुरातत्त्वशास्त्र हे असे एक क्षेत्र. नेपोलियनमुळे इजिप्तमध्ये त्या ज्ञानात बरीच प्रगती झाली होती. भारतामध्ये तशी प्रगती करण्यासाठी खूप वाव होता.

बडोद्याच्या प्राचीनत्वाविषयी सयाजीरावांना खूप कुतूहल होते. पण त्या क्षेत्रामध्ये जाणकार अशी अधिकारी व्यक्ती अजून त्यांना लाभली नव्हती. भट्टाचार्य त्यांना सांगत असत की, "प्राच्यविद्या आणि पुरातत्त्व ज्ञान एकमेकांच्या हातात हात घालून गेले, तर आपला उद्धार होईल." त्यामुळे, कीर्तिमंदिराचा खोल पाया खणत असताना मुख्य अभियंता तळवलकरांना बरीच मातीची रंगीत आणि नक्षीकाम केलेली भांडी मिळाली, तेव्हा त्यांचे काय करावयाचे असा प्रश्न उभा राहिला. महाराजांनी त्या भांड्यांना बडोदे संग्रहालयामध्ये मांडून ठेवण्यास सांगितले. त्या आधी श्री सयाजी (डफरीन) हॉस्पिटल, सेंट्रल जेल, कोठी कचेरी (कलेक्टोरेट), पाण्याची टाकी वगैरे ठिकाणी पायाच्या खोदकामाच्या वेळी अभियंता मंडळींनी किती मौल्यवान वस्तू गमावल्या असतील, ते परमेश्वर जाणे!

भट्टाचार्य महाराजांना बडोदे खूपच प्राचीन कसे आहे ते सांगत असत. त्यासाठी ते पौराणिक उल्लेख सांगत. उदाहरणार्थ मत्स्य पुराणातल्या रेवाखंडातल्या नर्मदेच्या किनाऱ्यावरील विविध तीर्थस्थानांविषयी भरपूर माहिती उपलब्ध आहे. 'कौमारिक' खंडामध्ये मही नदीविषयी माहिती आढळते. त्यामध्ये आणि स्कंद पुराणात इंद्रद्युम्नाच्या कथेत मही सागराची उत्पती कशी झाली, याची माहिती आहे. तसेच 'विश्वमित्री माहात्म्य', 'कारवण माहात्म्य' यामध्ये तेथील तीर्थक्षेत्रांची माहिती आहे. भट्टाचार्य महाराजांना म्हणत, "हे सर्व काल्पनिक कसे मानायचे, त्यांचे केवढे तपशील दिले आहेत?"

"तुमची समस्या कोणती आहे?"

"पाश्चिमात्य शास्त्रज्ञांचे पूर्वग्रह, ही माझी समस्या आहे. त्यांना शब्द- प्रामाण्य समजतच नाही. मुसलमान आक्रमकांनी केलेल्या विध्वंसामुळे आणि नैसर्गिक कारणांमुळे आमच्या सर्व मंदिरांची आणि तीर्थक्षेत्रांची धूळधाण झाली आहे. हे शास्त्रज्ञ म्हणतात, "बाप दाखव नाही तर श्राद्ध कर." आम्हाला त्या जुन्या मंदिरांचे अवशेष दाखवा. आमच्या मंदिरांच्या मशिदी झाल्या. हे जिवंत अवशेष आहेत की, पण ते त्यांना चालत नाहीत. त्यांना दगड, विटा, धोंडे, नाणी वगैरे वस्तू पाहिजे असतात. मेसोपोटेमिया आणि इजिप्त येथे ते नशीबवान होते, म्हणून त्यांना तेथे

फॅरोहांची भूमिगत संपत्ती खूपच मिळाली. तसे भूमिगत पुरावे आपल्याला मिळतीलच असे नाही. याचा अर्थ ते पुरावे आम्ही दाखवू शकत नसलो तरी आमचे सर्व पौराणिक साहित्य हे कपोलकल्पित आहे, असे नाही.''

''भट्टाचार्य, सत्तेपुढे शहाणपण चालत नाही. आज पाश्चिमात्य शास्त्रास जगाची मान्यता आहे. आपण ते म्हणतात त्याप्रमाणे पुरावे गोळा केलेच पाहिजेत. माझी खात्री आहे, एक दिवस ते आपल्याला निश्चितच मिळतील. त्या वेळी हे शास्त्रज्ञ आपल्या साहित्यातील उल्लेखांना जरूर मान्यता देतील. कदाचित आपण त्या वेळी जिवंत नसू.''

''मलादेखील तशी थोडीशी आशा आहे. उदाहरणार्थ सलाटवाड्यामध्ये मिळालेल्या एका दानपत्रात वडपद्रक गावाचा उल्लेख आहे. राष्ट्रकूट वंशाच्या कर्कसुवर्णवर्ष नावाच्या राजाने वल्लभीहून आलेल्या भानू नावाच्या ब्राह्मणाला वडपद्रक गाव दिले होते. त्याचा ताम्रपट मिळाला आहे. अकोटक म्हणजे अकोटा गाव. जंबूवापिका म्हणजे जंबू बेट. ताम्रपटांप्रमाणे शिलालेखांचे वाचन करावे लागेल. प्राचीन नाण्यांचा, किल्ल्यांचा, मंदिरांचा, मशिदींचा आणि शिल्पांचा खूप अभ्यास करावा लागेल.''

''तो आपण सुरू ठेवावा. आपल्याला जी आर्थिक मदत लागेल, ती निःसंकोचपणे मागून घेत चला. पुण्यामुंबईची भांडारकर वगैरे तज्ज्ञ मंडळींच्या संपर्कात राहा आणि वेळ पडली, तर त्यांची अवश्य मदत घेत चला.''

### उ) नगररचना शास्त्र (टाऊन प्लॅनिंग)

**१) जुने चित्र** – सयाजीरावांच्या आधीचे बडोदे शहर हे धुळीचे, घाणेरडे आणि एकदम पिटुकले होते. त्या वेळी ते विकसित झाले नव्हते. त्या वेळेस शांत आणि सुरक्षित शहर राखणे, हे एकमेव ध्येय होते. स्वच्छ, नीटस आणि सुंदर शहरापेक्षा सुरक्षितता जास्त महत्त्वाची होती. चोरांनी रात्री हल्ला करू नये म्हणून, १५ ते १८ फूट उंच आणि दोन मैल लांब मोठी भिंत होती. त्या संरक्षक भिंतीच्या पश्चिमेला लेहरी, पूर्वेला पाणी, उत्तरेला चंपानेर आणि दक्षिणेस गेंडी असे चार दरवाजे आणि ५४ बुरूज होते. बुरुजांवर तोफा सज्ज ठेवलेल्या असत. एकंदर ५०० तोफा होत्या. पुढे त्यांचा काहीच उपयोग नसल्यामुळे सयाजीरावांनी त्या वितळवून टाकल्या. शहराची रचना बुद्धिबळाच्या पटाप्रमाणे केलेली होती. मध्यबिंदूवर मांडवीचा मनोरा होता. लोकांजवळ मनगटी घड्याळे नसत. त्यांना वेळ कळावी म्हणून मनोऱ्यावर चारी बाजूंना मोठाली घड्याळे होती. रात्री दहा वाजता तोफ वाजे, सर्व दरवाजे बंद केले जात आणि लोक सुखाने झोपी जात असत. सुरसागर तलावामध्ये नेहमी पाणी

तुडुंब राहावे म्हणून सरसिया तलावातील पाणी भूगर्भ मार्गाने सोडण्याची व्यवस्था होती. हळूहळू बडोद्याची वस्ती वाढू लागली. म्हणून भिंतीच्या बाहेर यापूर्वीच्या दोन राजांच्या नावाची फत्तेपुरा आणि आनंदपुरा ही उपनगरे निर्माण करण्यात आली. काही वर्षांनी त्यामध्ये आणखी दोघांची भर पडली. त्यांना भूतपूर्व दिवाणांची नावे देण्यात आली. बाबाजीपुरा आणि रावपुरा. तैनाती फौजेच्या राहण्यासाठी विश्वमित्री नदीच्या उत्तरेस फत्तेगंज तथा कँप हा विभाग निर्माण झाला. १८६० मध्ये बी०बी०सी०आय० रेल्वे आली. चार भिंतीतले शहर आणि रेल्वे स्टेशन यामध्ये मुद्दाम एका मैलाचे अंतर ठेवण्यात आले. हेतू हा की, पुढील पन्नास वर्षांमध्ये लोक तेथे वस्ती करतील. अपेक्षेपेक्षा ते अर्ध्या काळातच भरून निघाले. एवढेच नाही तर अलकापुरी आणि (अश्व शर्यतींचे मैदान) रेसकोर्स ही उपनगरेदेखील लोकांनी घरे बांधून भरून काढली. महाराजांनी युरोपमध्ये पॅरिस, लंडन, रोम, बर्लिनसारखी एवढी सुंदर सुंदर शहरे पाहिली की, त्यांना त्यांच्या घाणेरड्या, बेशिस्त आणि अस्ताव्यस्त वाढलेल्या बडोदे शहराची लाज वाटावी.

२) **नवे चित्र** – युरोपमध्ये फिरत असताना त्यांच्या असे लक्षात आले की, युरोपमधील मोठाले रस्ते सुंदर आहेत, कारण तेथील लोक शिस्त पाळणारे आहेत. येथे तसे हमरस्ते बांधता येतील; पण लोकांच्या नाकातील शेंबूड शिंकरण्याच्या, पान खाऊन थुंकण्याच्या, घरांमधून रस्त्यावर अन्न टाकण्याच्या आणि प्रातर्विधी रस्त्यावर उरकण्याच्या सवयींमध्ये कसा बदल घडवून आणायचा? म्हणून त्यांनी समाजशास्त्रज्ञांचा सल्ला घेण्यास सुरुवात केली. काळ्या गुलामांच्या सवयी बदलत नाहीत, असेच उत्तर त्यांना मिळत गेले. शेवटी त्यांना हवा तसा माणूस भेटला. १९१४ मध्ये त्यांनी कलकत्त्याच्या पॅट्रिक जेडल्स या समाजशास्त्रज्ञ आणि नगर-रचनाकाराला बोलावून घेतले आणि त्याला हे शहर एखाद्या युरोपीय राजधानी-प्रमाणे सुधरवून देण्याची विनंती केली. त्या वेळचे बडोदे शहर पाहून त्याला हसू आले. त्यामध्ये जातीप्रमाणे गल्लीबोळ (पोळ आणि फळीया) होते. उदाहरणार्थ पटेलांची अहमदाबादी पोळ, ब्राह्मणांची ब्रह्मपुरी, सुतारांचा सुतार फळिया, मुस्लिमांचा मोगलवाडा , नागरांचा नागरवाडा वगैरे. सुरक्षिततेसाठी हे सर्व बोळ बंद असत आणि तोंडाशी दिंडी दरवाजा असे. रात्री दहा वाजल्याची तोफ झाली की, या गल्लीबोळाचे दरवाजे बंद केले जात. त्यामुळे चोऱ्यांचे प्रमाण कमी असे. राजमहाल रोड, रावपुरा, बाबाजीपुरा, रमेशचंद्र दत्त रोड वगैरे आजचे राजरस्ते त्या वेळी गल्लीबोळ होते. जेडेल्सने साऱ्या शहराची पाहणी केली आणि महाराजांना मोठा अहवाल पुढीलप्रमाणे दिला. "हे सारे पोळ भरपूर रुंद करावे लागतील. त्यांची दोन्ही तोंडे उघडावी लागतील. आज येथे रहदारी फक्त बैलगाड्या, घोडागाड्या,

थोडे सायकलवाले आणि बहुसंख्य पादचारी यांची आहे. त्यामुळे पादचाऱ्यांसाठी दोन्ही बाजूला मोठाले पदपथ ठेवावे लागतील. या धुळीच्या रस्त्यांचे डांबरी सडकांमध्ये रूपांतर करावे लागेल. आज बडोद्यामध्ये दोनचार मोटारी रस्त्यांवर दिसतात; पण उद्या त्यांची संख्या वाढेल. आजच्या घोडागाड्या उद्या नसतील. त्याप्रमाणे ते रस्ते पक्के बांधावे लागतील. आज तुमचे रस्ते सार्वजनिक बांधकाम खाते बघते. नव्या सुधारणा करायच्या म्हणजे नवी योजना तयार करून रस्त्यांचे अलग खाते सुरू करावे लागेल. त्याचप्रमाणे लोकांसाठी बागा, कारंजी वगैरे उपयुक्त आणि लोकहिताच्या गोष्टींचा त्यामध्ये समावेश करावा लागेल.'' आपल्या अधिकाऱ्यांचा सक्त विरोध असतानादेखील त्यांनी जेडेल्सची योजना स्वीकारली. अधिकाऱ्यांचे म्हणणे असे होते की, रस्तारुंदी अशक्य आहे, स्वतःच्या मालकीची जमीन कोण सोडणार, त्यांना द्यायला पैसे कोठून आणणार, एक-दोन मोटारगाड्यांसाठी कशाला रस्ते रुंद करायचे? या रस्त्यांच्या देखभालीचे काय, तो खर्च कोण देणार? वगैरे. खरी गोष्ट अशी होती की, या अधिकाऱ्यांची त्या त्या गल्लीबोळात भाड्याने दिलेली घरे होती, त्यातून त्यांना खासगी कमाई होत असे. विरोध होता तो ती कमाई जाऊ नये म्हणून. महाराजांनी युक्ती केली. त्यांनी या आपल्या लोकांच्या नेत्यांशी जेडेल्ससाहेबांच्या भेटीगाठी घडवून आणल्या आणि बडोदे शहरामध्ये एक नवीन उत्साहाचे वातावरण निर्माण केले. बडोद्याच्या लोकांनी गोऱ्या देवदूताच्या साऱ्या अटी मान्य केल्या आणि अतिशय स्वस्त दरामध्ये महाराजांना त्या जमिनींची मालकी मिळून महाराजांचे बडोदे शहर सुंदर, स्वच्छ आणि राजधानीला शोभेल अशा शानदार नगरीचे स्वप्न साकार झाले.

ए) **स्वास्थ्य** – पौर्वात्य आणि पाश्चिमात्य आधुनिक वैद्यकाचा समन्वय साधण्यासाठी सयाजीरावांनी १८८८-८९ मध्ये मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजला 'क्लिनिकल मेडिसिन अँड फार्माकॉलॉजी' या विषयाच्या प्राध्यापकपदाच्या अध्यासन निर्मितीसाठी अनुदान दिले. मुंबईचे मराठे, त्रिभुवनदास गज्जर आणि मोतीभाई अमीन यांना त्यांनी कारेली बागेमध्ये जागा देऊन, औषधी काढे तयार करण्यासाठी उत्तेजन दिले. त्यामधूनच पुढे अलेंबिकचा औषधांचा कारखाना उभा राहिला. २९ जानेवारी १९३२ रोजी अलेंबिक केमिकल वर्क्सच्या रौप्य महोत्सवाच्या निमित्ताने महाराजांनी मोतीभाई अमीन यांनी दिलेल्या १५,००० रुपयांच्या रकमेच्या व्याजातून रसायनशास्त्राच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या देण्याचे जाहीर केले.

ऐ) **विमानशास्त्र** – १८९५ मध्ये संस्कृताचार्य आणि मुंबईच्या 'वेदविद्या प्रचारिणी'चे मंत्री शिवकर बापूजी तळपदे यांनी वेद आणि उपनिषदांच्या प्राचीन

संहितांच्या आधारे विमानाची रचना करून, त्या 'मरुत सखा' विमानाचे यशस्वी उड्डाण स्वतःच वैमानिक होऊन, डिसेंबर १८९५ च्या शेवटच्या आठवड्यात मुंबईच्या चौपाटीवर केले होते. विमान हजार फूट वर गेले आणि काही क्षणांतच ते खाली आले. त्यांच्यानंतर नऊ वर्षांनी राईट बंधूंनी अमेरिकेमध्ये पहिला विमानोड्डाणाचा प्रयोग केला. या अभूतपूर्व वैज्ञानिक सोहळ्याच्या साक्षीला असंख्य सामान्य मुंबईकरांसमवेत पोलीस अधिकारी, शेठ लालजी नारायण, भाऊच्या धक्क्याचे आनंदराव अजिंक्य वगैरे सुशिक्षित आणि सुसंस्कारित मान्यवर उपस्थित होते. सयाजीरावांनी तेथे आपला खास प्रतिनिधी पाठवला होता. (कॅ० बोडस आनंद जयराम, 'प्राचीन भारतीय विमानशास्त्र', मनोरमा, पृ० १३).

त्रेतायुगामध्ये शौनक ऋषींनी शौनकसूत्रांमध्ये पुष्पक, अजमुख, भ्राज, स्वज्योतिर्मुख, भेरुंड अशी पंचवीस वायुमार्गाने जाणाऱ्या मंत्रविमानांची यादी दिली आहे. गौतम ऋषींनी मणिभद्रकारिकेमध्ये ती बत्तीसपर्यंत वाढवली आहे. विज्ञान जाणणारे ऋषी काही कडू अनुभवानंतर कमी झाले वा लोप पावले. महाराजांना ही कल्पना कविकल्पना वाटली की काय, पण या योजनेला त्यांचा सक्रिय सहकार मिळू शकला नाही. म्हणून पं० शिवकर अहमदाबादेस गेले. तेथे केलेल्या भाषणामध्ये पन्नास हजार रुपयांच्या मदतीची मागणी परतफेडीच्या बोलीने जमलेल्या जनसमूहाला त्यांनी केली होती. त्यांना एक हजार रुपये देणारे पन्नास देणगीदार हवे होते. ते त्यांना मिळू शकले नाहीत. त्यांना ना राजाश्रय, ना लोकाश्रय. गिरगावच्या ड्यूकर लेनमध्ये शिवकरांच्या घरामधील माळ्यावर त्यांच्या विमानाचा सहा फूट लांब आणि चार फूट रुंद पक्ष्याच्या आकाराचा सांगाडा बरीच वर्षे धूळ खात पडला होता.

श्रीपाद दामोदर सातवळेकर हे तळपदे यांचे जे० जे० आर्ट स्कूलमधील विद्यार्थी. त्यांना तळपदे यांच्या वेदविद्येतील गूढ विद्येवरील विश्वास अनाठायी वाटे. तळपदे यांना त्या गूढ विद्येचे रहस्य आपल्याला सापडले आहे, असे वाटे. सूर्यकिरणाने पाण्यावर विजेचा स्पर्श होऊन, पाण्याचे विभाजन होते. त्यामधून हायड्रोजन वायू निर्माण होतो. तो वजनाने हलका असतो, म्हणून वर जातो. तळपदे यांच्या अपयशामुळे विमान संशोधनाची हिंदुस्थानमधील प्रगती तेथेच थांबली (केतकर, ग० वि०, दै० केसरी, २२ फेब्रुवारी १९५३). सयाजीरावांच्या मृत्यूनंतर १९४५ मध्ये जर्मन शास्त्रज्ञ राब आणि डोअरिंग विमानांच्या उत्पादनाचा प्रकल्प घेऊन प्रतापसिंगांकडे आले होते. त्या वेळी त्यांचे सीतामाई प्रकरण जोरात होते, म्हणून त्याचे महत्त्व त्यांच्या ध्यानी आले नाही. नाही तर बंगलोरऐवजी बडोदे शहर हे विमान उत्पादनाचे केंद्र झाले असते.

**क) मराठी टंकलेखन यंत्राची निर्मिती** – भुजंगराव मानकर (१८६३-१९४४) यांनी पिटमनप्रमाणे मराठीसाठी लघुलिपी तयार केली होती. टिळकांचा त्यांच्यावर वरदहस्त होता (टिळक, 'केसरी', ७ जानेवारी १८९६). १८९८ मध्ये सयाजी महाराजांना त्यांचा चांगला अनुभव आला. वाळकेश्वरच्या गायकवाडवाड्यामध्ये मकरसंक्रांतीचे भाषण महाराजांनी मराठीमधून केले. ते भुजंगरावांनी सयाजीरावांना सादर केले. ते मानकरांवर खुष झाले आणि म्हणाले, "हिंदुस्थानांत देवनागरी टंकलेखन यंत्र (टाईपरायटर) तयार करण्याची फार जरूर आहे. मी तुम्हाला त्यासाठी अमेरिकेमध्ये पाठवायला तयार आहे." मानकरांनी ते फारसे मनावर घेतले नाही, कारण त्या काळांत परदेशगमन निषिद्ध होते (वेलकर, प्रताप, महाराष्ट्राच्या उज्ज्वल इतिहासाची अक्षम्य उपेक्षा, मनोरमा, पृ० १२९).

**ख) औद्योगिक शिक्षण** – महाराजांचे या बाबतीत रामदासांच्या 'आधी केले, मग सांगितले' या उक्तीप्रमाणे वर्तन होते. त्यांनी कलकत्त्यामध्ये सांगितले, "औद्योगिक शिक्षणाकडे मी थोडेफार लक्ष दिले आहे. खुद्द बडोद्यामध्येच नव्हे, तर प्रांतांच्या शहरीसुद्धा औद्योगिक शाळा उघडून निरनिराळ्या उद्योगधंद्यांचे (गालिचे, सतरंज्या, कापड, सोनेरी जरीचे काम इत्यादीविषयी) शिक्षण देण्याची सोय मी केली आहे. प्रारंभी आम्हाला काही ठिकाणी अपयश आले, कारण काम करण्याची साधने योग्य असावी आणि काम शिकवणारे शिक्षक योग्य असावे, या तत्त्वांचा विसर आम्हास त्या ठिकाणी पडला होता." उच्च शिक्षण घेऊन आपल्या प्रजेचे भले करेल अशी त्यांची खात्री पटली, तरच ते त्याचा परदेशाचा सर्व खर्च करत. उकिडवे नावाच्या पुण्याच्या एका मास्तरने त्यांना खूप मोठा धडा शिकवला होता. "दोन दिवस विलंब लागला तरी काही बिघडत नाही; पण अगदी पहिल्या दिवसापासून साऱ्या अटी कागदावर कायदेशीर मांडल्याच पाहिजेत, म्हणजे भविष्यामध्ये रडायची वेळ येत नाही." याला एकमेव अपवाद क्रांतिकारकांना मदत. ती गुप्त असायची आणि तिसऱ्या व्यक्तीला अगदी महाराणींनादेखील - ते दान माहीत नसायचे. एका दलित पुढाऱ्याचे लंडनमधील प्रेमप्रकरण त्यांना खात्रीलायक सूत्राकडून समजल्यावर त्यांनी त्याला मिळणारी आर्थिक मदत थांबवली होती. याच्या उलट डॉ० श्रीधर व्यंकटेश केतकर यांना अमेरिकेमध्ये शिक्षणासाठी पैसे कमी पडतात, हे कळल्यावर त्यांना रक्कम वाढवून दिली होती!

। । ।

# १३



# मनोरंजन आणि सौंदर्यदृष्टी

**अ) सयाजीरावांचे संगीत प्रेम** – महाराजांनी एकदा म्हटले होते, ''एखाद्या देशाची संस्कृती काय तोलामोलाची आहे, हे तुम्हाला ठरवायचे असेल, तर त्या देशाच्या ललितकला विचारात घ्या... संगीत म्हणजे जीवनाला माधुरी आणि रमणीयता देणारी वल्ली आहे. मनाला मेणाहून मऊ करण्याची किंवा कठीण करण्याची जादू संगीताच्या अंगी असते. दयेचा पाझर फोडण्याचे, आनंदाचे किंवा दुःखाचे अश्रू झिरपायला लावायचे आणि वीरश्रीचा संचार करण्याचे सामर्थ्य संगीताच्या ठायी असते.'' त्यांनी पाहिले की, ''जीवनाचा संपूर्ण आनंद, जगण्याची सगळी मौज, माझ्या प्रजेला लुटता येत नाही... त्या न मिळण्याचे एक कारण आपल्या देशाची भौगोलिक परिस्थिती आणि आपल्या लोकांचे आर्थिक आणि औद्योगिक दैन्य... संगीतासारख्या कलेच्या सेवनामुळे आपल्या मनाची जी करमणूक होते आणि मनाला जे संजीवन मिळते, त्याच्या योगाने आपली इतर कामे अधिक चांगल्या प्रकारे करण्याचे बळ आपल्या अंगी स्फुरत असते. मनाला ताजेतवाने करण्याच्या अनेक साधनांपैकी संगीत हे एक साधन आहे...अशा उपयुक्त कलेला उत्तेजन द्यावे आणि प्रजेला संगीताची गोडी लावावी म्हणून माझ्या राज्यामध्ये शाळा काढून त्यांच्याद्वारा त्या कलेचा प्रसार करण्याची व्यवस्था मी केली आहे. चांगले शिक्षण घेतलेले आणि सत्पात्र शिक्षक या शाळांना दिले आहेत आणि आवश्यक अशा वाद्यादिक साहित्याचाही पुरवठा केला आहे'' (नेने वि० पां०, सयाजीराव यांची भाषणे, भाग २, सावळराम, १९३७, पृ० १७७-७८).

सयाजीराव वाचावीर नव्हते, ते कृतिवीर होते. त्यांच्या संगीत विभागामध्ये (कारखाना) सुरुवातीला मौलाबक्ष, फैझ महंमद आणि अल्लाउद्दिन हे गवई, इनायतखाँ सतारिया, जमालउद्दिनखाँ बीनकर, नासरखाँ पखवाजी आणि गुलाबसिंग हे तबलजी होते. कलावंतांची ही संख्या पुढे ४८ पर्यंत पोहचली. त्यामध्ये विख्यात गायक फैय्याजखाँ, ठुमऱ्या आणि कवाली गाणाऱ्या चंद्राबाई आणि छगनजान, दोन हिंदुस्थानी नर्तिका आणि दोन तंजावरी नर्तिका होत्या.

बडोद्याचा हिंदुस्थानी संगीताचा वाद्यवृंद (ऑर्केस्ट्रा) साऱ्या भारतभर प्रसिद्ध होता. त्यामध्ये सारंगी, जलतरंग, सुंद्री, सनई, दिलरुबा, सतार, व्हायोलीन, हार्मोनियम आणि तबला एवढी वाद्ये असत.

**आ) उस्ताद मौलाबक्ष** (१८३३-१८९६) – हे भिवानीचे उस्ताद गायनशाळेचे पहिले प्राचार्य म्हणून १८८६च्या फेब्रुवारीमध्ये महाराजांनी बडोद्यामध्ये आणले. त्यांचे प्रभुत्व कर्नाटक तसेच शास्त्रीय हिंदुस्थानी संगीतावर होते. फैयाझखाँ गायनशाळा या कल्पनेच्या विरुद्ध होते. संगीत ही ईश्वरी देणगी आहे, अशी त्यांची समजूत होती. यांच्या उलट हे उस्ताद स्वरलिपी (नोटेशन) लिहिणारे, संगीतावर पाठ्यपुस्तके लिहिण्यास मदत करणारे होते. त्यामुळे महाराजांचे आणि त्यांचे छान जमे. खुद्द महाराजांनी त्यांच्या मुलाला – अल्लाउद्दिनला – संगीत शिकण्यासाठी खूप उत्तेजन दिले. पाश्चिमात्य संगीत शिकण्यासाठी आणि पौर्वात्य व पाश्चिमात्य संगीतामध्ये समन्वय साधता आला, तर तो प्रयोग करून बघण्यासाठी त्याला युरोपलाही पाठवले! या संगीताच्या एकत्रीकरणाच्या (फ्यूजन) नादामध्ये तो बेकार राहू नये, म्हणून त्याला दरबारी गायकाची नोकरी सुद्धा दिली.

**इ) फैयाझखाँ साहेब** (१८८६-१९५०) – बडोद्यामध्ये छोटूशास्त्री ध्रुव नावाचे एक प्रकांडपंडित होते. त्यांच्या घराला 'ज्ञानमठ' असे म्हणत. या वेदशास्त्र संपन्न छोटूशास्त्रींनी कैक सभा जिंकल्या होत्या. त्यामुळे त्यांना फार मान असे. अशा या शास्त्रीबुवांचा फैय्याजखाँ यांच्याशी गाढ स्नेह होता. त्यांच्या वारंवार एकमेकांच्या घरी गाठीभेटी व्हायच्या. शास्त्रीबुवांना गायनाचा अत्यंत शौक. म्हणून त्यांच्या घरी खाँसाहेबांच्या संगीताच्या बैठकीही व्हायच्या. वेगवेगळ्या विषयातल्या या दोघांची दाट मैत्री होती.

ध्रुवांच्या मठामध्ये गावोगावचे विद्वान ब्राह्मण येत असत. त्यांचा योग्य तो सत्कार मठामध्ये आणि इतरांकडूनही होत असे. एकदा छोटूशास्त्री यांनी फैयाजखाँना निरोप धाडला की, तेलंगणातील अकरा विद्वान ब्राह्मण आले आहेत, तरी त्यांना गाणे ऐकवण्यासाठी खाँसाहेबांनी मठामध्ये त्यांच्या सोयीने यावे. खाँसाहेबांनी उलट निरोप धाडला की, गाणे माझ्याचकडे ठेवू. नाही तर अशा विद्वान ब्राह्मणांचे पाय माझ्या घरी तरी कधी लागणार? दिवस नक्की झाला, तेव्हा खाँसाहेबांनी काही ब्राह्मण मित्रांना त्या दिवशी सकाळी न चुकता येण्यास सांगितले. ते म्हणाले, ''येत्या रविवारी फार मोठे पाहुणे गाणे ऐकावयास येणार आहेत. तरी त्यांची सरबराई करण्यासाठी याल ना?'' ''जरूर येऊ'' ते म्हणाले. त्याप्रमाणे ते ब्राह्मण आल्यावर त्यांचे योग्य स्वागत करून खाँसाहेब सकाळी नऊ वाजता गायला बसले. छोटूशास्त्री स्वतः येऊ शकले नव्हते. गाणे उत्तम झाले आणि बारा वाजता

संपले. शास्त्रीमंडळी फार खुष झाली, कारण खाँसाहेब मनापासून सकाळची रागदारी गात होते.

गाणे संपल्यावर खाँसाहेबांनी मित्रांना खूण केली. त्यांनी लगेच एका बाजूचे जाजम काढले आणि अकरा पाट मांडले. पाठ टेकावयासही प्रत्येकास पाट होताच. नंतर उत्तम मसाल्याचे दूध चांदीच्या पेल्यामध्ये त्यांना दिले. त्याचबरोबर अकरा पत्रावळींवर भरगच्च फळे आणि मिठाई वाढली. खाँसाहेब समोरच बसले होते. प्याले रिकामे झाले की, मित्रांना आणखी दूध वाढण्यास सांगत. हा फराळ संथपणे चालू असताना खाँसाहेब म्हणाले, ''छोटूशास्त्री माझे मोठे बंधू आहेत. कारण आम्ही बडोदे शहरामध्ये आल्यापासून आम्हास सतत त्यांचा आधार आहे. आपण मंडळींनी माझ्यासारख्या गरिबाच्या घरी येऊन, माझे घर पवित्र केले आहे. आपले आशीर्वाद असावेत.'' खाँसाहेबांचे बोलणे मोठे मार्मिक आणि दरबारी थाटाचे असे. शेवटी प्रत्येक ब्राह्मणाला एक रुपया दक्षिणा आणि ओंजळभर फुले त्यांनी दिली. नंतर गुडघ्यात वाकून आणि डोके जमिनीवर ठेवून नमस्कार केला.

ब्राह्मण खुष झाले आणि म्हणाले, ''खाँसाहेब, आपण सामवेदांचा सांभाळ केला आहे, म्हणजे आपण आमच्यापैकीच एक आहात. ईश्वर आपणास उदंड आयुष्य आणि कीर्ती देवो'' (डॉ० गोवंडे, गं० कृ०, स्मृति विहार, १९७५, पृ० २८). धन्य फैय्याज खाँ आणि धन्य ते ब्राह्मण!

**ई) सौ० लक्ष्मीबाई जाधव** – या पुष्कळ वर्षांपासून दरबारगायिका म्हणून ओळखल्या जात असत. त्या अल्लादियाखाँ साहेबांच्या शिष्या होत्या. त्यांच्या घरावरून जाताना त्यांचा चाललेला रियाज अष्टौप्रहर ऐकू येत असे. शहरातील कोणाचे त्यांच्या घरी येणे जाणे क्वचितच होत असे आणि अंमलदारांचे तर मुळीच नाही. त्यामुळे श्रीमंत चिमणाबाईसाहेब गायकवाड यांचा लक्ष्मीबाईंवर खूप लोभ असे. त्यांचे गाणे फार खानदानी असून, दरबारगायिकेच्या दर्जाला शोभून दिसे. त्या काळी ब्राह्मण मुली नाटक, सिनेमा आणि नृत्यामध्ये नुकत्याच भाग घेऊ लागल्या होत्या. ताईंना हे पटत नसे. त्या आपली नाराजी अनेक वेळा बोलून दाखवत असत (घाटे, विठ्ठलराव, दिवस असे होते, मौज, १९९८, पृ० १६२). बाईंनी राजकवी चंद्रशेखर यांची 'हृदयी गुलाब फुलला' ही कविता एच० एम० व्ही० या रेकॉर्ड कंपनीसाठी गायली आणि राजकवींना अमर केले!

**उ) हिराबाई बडोदेकर** – पु० ल० देशपांडे यांनी त्यांची थोरवी थोडक्यात वर्णिली आहे. ''दारीच्या तुळशीवरून आलेल्या झुळकीने तुळशीच्या मंजिऱ्यातून निसटलेला सुगंध आणावा तसे घराबाहेरचे गाणे हिराबाईंनी मोठ्या शालीनतेने स्वयंपाकघरात आणले.'' त्यांना सयाजीरावांनी खूपच मदत केली होती.

**इ) अखिल भारतीय संगीतसभा** — भातखंड्यांवर महाराजांचा फार लोभ होता. दोघांचा हिंदुस्थानी संगीताबरोबर पाश्चिमात्य संगीताप्रमाणे स्वरलिपीवर (नोटेशन्स) खास आग्रह होता. भातखंडे साऱ्या भारतभर हिंडून दुर्मीळ रागांच्या चिजा गोळा करत होते. महाराजांनी त्यांना एक जवळचा रस्ता दाखवला. २० ते २५ मार्च १९१६ या काळामध्ये महाराजांनी दरबार हॉलमध्ये अखिल भारतीय संगीत सभा भरवली. त्या प्रसंगी बड्या मंडळींमध्ये उदेपूरचे झकरूद्दीनखाँ, अलवरचे मुश्रफखाँ, टोंकचे गुलाम हुसेनखाँ, जयपुरचे कल्लनखाँ आणि अली हुसेनखाँ, इंदूरचे इमदादखाँ वगैरेंचा समावेश होता. सभेचे अध्यक्षस्थान अकबरपूरचे ठाकूर नबाबअली यांनी भूषवले होते. महाराज भातखंड्यांना म्हणाले, "गंगा दाराशी आली आहे. तुम्हाला पाहिजे तेवढ्या दुर्मीळ चीजा जमा करा या लोकांपासून." सयाजीरावांच्या काम करण्याच्या विशिष्ट शैलीचा स्पर्श या संगीत सभेला होता. मुंबई इलाख्यातील नागरी सेवेचे गायनप्रेमी श्री० क्लेमंट यांनी या सभेमध्ये 'हिंदी गायनपद्धतीची सुरावट' या विषयावर एक प्रबंध वाचला. इतरही अनेक गुणीजनांनी विद्वत्तापूर्ण निबंध वाचले आणि ती सभा गाजवली. भातखंड्यांना तर स्वर्ग दोन बोटे वर उरला होता. महाराजांनी भातखंड्यांना 'हिंदुस्थानी संगीत क्रमिक पुस्तकमाला' (भाग १ ते ४) प्रसिद्ध करण्यासाठी खूप मदत केली. नामांकित गवयांच्या उत्कृष्ट चिजा स्वरलिपीसकट त्यामध्ये दिल्या आहेत. आजही संगीत पाठशाळांमधून ती क्रमिक पुस्तके म्हणून वापरली जातात. 'संस्कृत लक्ष संगीत' आणि 'संस्कृत अभिनव राग मंजिरी' या भातखंडे यांच्या दोन पुस्तकांना महाराजांनी उदार हस्ते अनुदान दिले.

**ए) संगीत महाविद्यालय** — फैय्याजखाँसाहेबांनी असे महाविद्यालय काढता येत नाही, असे मत सांगितले; पण त्याने महाराज नाउमेद झाले नाहीत. महाविद्यालयाच्या अभ्यासक्रमाच्या बाबतीत भातखंडे यांनी खूपच मदत केली. संगीत हे शास्त्र आहे आणि ते शास्त्रीय पद्धतीनेच शिकवले गेले पाहिजे, यावर दोघांचे एकमत होते. वाद्यांची निर्मिती आणि दुरुस्ती शास्त्रीय पद्धतीनेच झाली पाहिजे, यावर दोघांचा कटाक्ष होता. महाराजांच्या मनात संगीत महाविद्यालयात किंवा कलाभवनात वाद्यनिर्मिती आणि दुरुस्तीचे प्रशिक्षण द्यायची सोय सुरू करायची होती. "जर्मनीमध्ये जाऊन तेथे हे शास्त्र कसे विकसित झाले आहे ते पाहून या." असे त्यांनी बऱ्याच तरुणांना सांगितले; पण त्यासाठी कोणी फारसा उत्साह दाखवला नाही. याचे कारण परदेशगमनावरील बंदी. त्यानंतर जी 'शुद्धी' (प्रायश्चित्त) व्हायची त्यासाठी ५०० ते ८०० रुपये खर्च यायचा! या सिंधूबंदीने सयाजीरावांना हतबल केले.

**औ) संगीत सभा** – सामान्य माणसाच्या कानांवर नेहमी चांगले संगीत पडत गेले तर तो तानसेन नाही तरी कानसेन निश्चित होईल, असे महाराजांना वाटे. त्या काळी सामान्य माणसाला संगीत ऐकण्याची सोय नव्हती. आकाशवाणी नव्हती किंवा दूरदर्शन नव्हते. ग्रामोफोनदेखील बऱ्याच उशिरा आला. म्हणून महाराजांनी पर्वताला महंमदाजवळ नेण्याचे ठरवले. दर सोमवारी सायंकाळी दोन तास ज्युबिली बागेमध्ये आणि मंगळवारी सूर्यनारायण बागेमध्ये असे संगीताचे नियमितपणे कार्यक्रम त्यांनी सुरू केले. कमाठी बागेमध्ये दर रविवारी सायंकाळी रसिकांना बँडस्टँडवर पाश्चिमात्य संगीत ऐकावयास मिळत असे. त्यामुळे बडोदेकरांचा इतर प्रांतीय संगीतप्रेमी लोकांना हेवा वाटे!

**क) नृत्य** – प्रसिद्ध अणुशास्त्रज्ञ साराभाई यांच्या दाक्षिणात्य पत्नी मृणालिनी साराभाईंचा दावा आहे की, त्यांनी दाक्षिणात्य नृत्य प्रथम गुजराथेत आणले. हा दावा खरा नाही. सयाजीरावांच्या पहिल्या विवाहामध्ये तंजावरहून काही नर्तिका प्रथम बडोदा येथे आल्या होत्या. सयाजीरावांचा नृत्यातील रस एवढा जुना आहे. तेव्हापासून प्रत्येक दरबाराची सुरुवात पहिल्यांदा तंजावरी आणि नंतर हिंदुस्थानी नृत्याने होऊ लागली. या मनोरंजनाच्या कार्यक्रमानंतर पानसुपारीचा कार्यक्रम सुरू होई. भरतनाट्यम, मणिपुरी आणि मोहिनीअट्टमसारख्या अन्य प्रकारांना महाराजांनी राजाश्रय दिला. ननबा आणि बिचवा या दोन बहिणी साऱ्या हिंदुस्थानभर बडोद्याच्या राजनर्तिका म्हणून गाजलेल्या होत्या. नृत्यशिक्षणास राजाश्रय दिल्याबद्दल खुद्द रवींद्रनाथांनी सयाजीरावांची पाठ थोपटली होती. तंजावरकरांची नृत्याची खासगी शिकवणी अजूनही चालते.

**ख) नाटके** – महाराज आणि दुसऱ्या चिमणाबाई यांना नाट्यसंगीत भलतेच प्रिय होते. प्रत्येक नाटक कंपनी बडोद्यामध्ये प्रयोग करायला यायची. कारण त्यांना माहीत होते की, आपल्याला राजमहालामध्ये शाही आमंत्रण तर मिळेलच; पण घसघशीत बक्षिसीदेखील प्राप्त होईल. टिळकांनी नारायणराव राजहंस यांना 'बालगंधर्व' ही पदवी दिली; तर महाराजांनी त्यांना १९१३ पासून ५,००० रुपयांचे वर्षासन बांधून दिले. बालगंधर्वदेखील त्यांच्या जाहिरातींच्या पत्रकावर आणि फलकांवर बडोद्याच्या राजाश्रयाचा कृतज्ञतापूर्वक खास उल्लेख करत असत. १९१९ मध्ये राजमहालातील छोट्या नाट्यगृहामध्ये 'एकच प्याला'चा प्रयोग झाला. महाराजांचे सर्वच राजपुत्र एकजात सुधाकर. गणपतरावांनी सुधाकराची आणि बालगंधर्वांनी सिंधूची अशी बहारदार भूमिका केली की, महाराजांनी वर्षासनाखेरीज एक हजार रुपये अधिक देण्याचा हुकूम दिला. एकदा महाराजांबरोबर राजा रविवर्मा गंधर्व कंपनीचे 'शाकुंतल' नाटक पाहावयास आले

होते. राजा रविवर्मा हे माधवराव पाटणकर या नटाच्या सौंदर्यावर एवढे भाळले की, त्यांनी माधवरावांना 'गंगावतरण' आणि 'विश्वामित्र आणि मेनका' या चित्रांमध्ये त्यांचे चित्रण करून त्यांना अमर केले.

**ग) चित्रकला** – महाराजांच्या १८८७ सालच्या युरोपच्या पहिल्या सफरीने त्यांच्यामध्ये अचानक बदल घडला. त्यांच्यामधील साहित्य, संगीत, शिल्प आणि चित्रकला यांचे सुप्त प्रेम एकदम उफाळून आले. याचे कारण या सफरीमध्ये पौर्वात्य डोळ्यांनी त्यांनी पाहिलेले पाश्चिमात्य कलाविश्व, त्यांच्या त्या वेळच्या लिहिलेल्या दैनंदिन्या (डायऱ्या) आणि अधिकाऱ्यांना लिहिलेली पत्रे आजही त्याची साक्ष देतात.

**अ) देशी चित्रकार**

**१) राजा रविवर्मा** – रोममधील सेंट पिट्सबर्गच्या चर्चमध्ये महाराजांनी 'बायबल'मधील प्रसंगावर आधारित मायकेल एंजेलोसारख्या चित्रकारांची भिंतभर किंवा छतावरची मोठाली चित्रे पाहिली. तेव्हापासून आपल्याकडे आपल्या संस्कृतीला साजेशी अशी मोठमोठी चित्रे असावीत, असे त्यांना वाटू लागले. म्हणून राजा रविवर्मा या त्रावणकोर राजाच्या चुलत भावाची सयाजीरावांनी नेमणूक केली आणि भरपूर बिदागी देऊन पुढील पौराणिक प्रसंगांवरील मोठ्या आकाराची चित्रे तयार करून घेतली. श्रीरामाचा विवाह प्रसंग, श्रीकृष्णाची दृष्ट, गंगा आणि शंतनू, कारागृहातून वसुदेव श्रीकृष्णाला घेऊन निघालेला, मत्स्यगंधा, विश्वामित्र-मेनका, कीचक आणि सैरंध्री, हरिश्चंद्र तारामतीच्या वधास संमती देतो, राधामाधव, भरत, कंस आणि माया, यतीवेशातील अर्जुन व सुभद्रा, नलदमयंती आणि द्रौपदी वस्त्रहरण. ही अप्रतिम चित्रे अजून ताजी वाटतात.

**२) बुधवारकर** – त्यांना युरोपमध्ये उच्च शिक्षणासाठी महाराजांनी धाडले आणि नंतर कलाभवनाचे प्रमुख नेमले. राजमहालामधील वस्त्रपरिधान करणाऱ्या स्त्रीचे त्यांनी रेखाटलेले चित्र पाहिले की, कोणीही त्यावर भाळून जाईल.

**३) फैझी रहेमान** – यांना १९११ ते १९१५ या काळात नेमणूक करून त्यांच्याकडून १५ तसबिरी करून घेतल्या. त्यामध्ये सहा राजकुटुंबीयांची आहेत. इतर भूलभुलावण, स्वामी नारायण मंदिर, विश्वामित्री नदीवरील कामनाथ मंदिर, सुरसागराची पश्चिम बाजू वगैरे निसर्गचित्रे आहेत.

आ) विदेशी चित्रकार

**१) व्हॅन (फौं) डाईक** – यांची दुर्मीळ चित्रे बडोद्यामध्ये आहेत.

**२) स्पिलमन** – हा कला समीक्षक होता आणि महाराजांच्या वतीने बडोद्याच्या संग्रहालयासाठी त्याने एकापेक्षा एक सुंदर पाश्चात्य चित्रांची खरेदी केली. त्या चित्रांसाठी यथानुकूल एक नवीन दालन ३ मार्च १९२१ रोजी उघडण्यात आले. त्याची प्रकाशयोजना आणि सजावट डिब्डिन आणि कॅ० हाईम या तज्ज्ञांकडे सोपवली होती.

**३) फेलिसी** – लक्ष्मीविलास राजमहालामध्ये राजमहालाच्या मुख्य जिन्यावर महाराणींचे सुंदर तसबीर (पोट्रेट) आहे. या कलेच्या दृष्टीने बडोदे हे सर्वात श्रीमंत शहर आहे.

**४) इतर** – बॉनिफेझियोचे – टिशिअनचे पीटर मार्टीरचा मृत्यू. हॉलंडच्या रोमरस्वाल, हेरिक द ब्लेस, राईकहार्त आणि डाईकमांस यांची चित्रे.

सर जोशुआ रेनॉल्ड्स, सर टॉमस लॉरेंस, लॉर्ड फ्रेडरिक लायटन, सर जॉन मिल, सर एडवर्ड पॉयंटर वगैरे श्रेष्ठ इंग्रज कलाकारांची चित्रे.

घ) शिल्पकला

अ) देशी शिल्पकार

**१) फणिंद्रनाथ बोस** – यांना महाराजांनी १९१४ आणि १९२४ मध्ये खास बोलावून आणि राजाश्रय देऊन, त्यांच्याकडून लहानमोठे पुतळे बनवून घेतले. त्यांच्या कलेसाठी त्यांना 'सयाजी पदक'देखील दिले.

**२) महादेव काशीनाथ कोल्हटकर** – यांचे वडील बडोद्यामध्ये तुरूंगाधिकारी होते. विश्वामित्री नदीवरील फत्तेसिंगरावांचा पुतळा त्यांच्या कलेची आजही साक्ष देतो. राजमहालातील दरबार दिवाणखान्यामध्ये त्यांच्या ४-५ कलाकृती आणि संग्रहालयामध्ये ३ कलाकृती आहेत. नवसारीमधील पूर्णाकृती सयाजीरावांचा पुतळा यांनीच निर्माण केला आहे.

**३) र० कृ० फडके** – हे मूळचे वसईचे. यांच्याजवळ ओतकामाची साधने नव्हती. ते ती कोल्हटकरांकडून तयार करवून घ्यायचे.

**४) रा० ब० म्हात्रे** – कमाठी बागेमध्ये शिवाजी महाराजांचा पूर्णाकृती अश्वारूढ पुतळा आहे. तो पुतळा त्यांनी प्रिपरेटरी मिलिटरी स्कूलसाठी तयार केला होता; पण पुतळा तयार करण्यासाठी विलंब झाल्यामुळे तो नुसता पडून होता. एवढा देखणा शिवाजीचा पुतळा अन्यत्र कोठेही दिसत नाही.

**५) विनायक पांडुरंग करमरकर** – खंडेराव महाराजांचा बाजारामध्ये मार्केटसमोर असलेला पूर्णाकृती संगमरवरी पुतळा, करमरकर यांनी तयार केला.

**६) कृष्णराव चव्हाण** – हे कोल्हटकरांकडे मदतनीस होते. कीर्तिस्तंभावरील तीन सिंह त्यांनी निर्माण केले. दरबार दिवाणखान्यामध्ये (हॉल) त्यांच्या काही कलाकृती आहेत. बडोदे संस्थानच्या विलीनीकरणानंतर ते गणपतीच्या मूर्ती तयार करू लागले.

**आ) विदेशी शिल्पकार**

**१) एडवर्ड स्लोन** – कमाठी बागेच्या तोंडाशी असलेला पूर्णाकृती अश्वारूढ सयाजीरावांचा पुतळा दृष्ट लागण्यासारखा तयार केला आहे. लोक सयाजीराव विसरले. आज 'काळा घोडा' म्हणून हे स्थान प्रसिद्ध आहे.

**२) फेलिसी** – त्यांची कला पाहावयास कुठून कुठून लोक येत असतात.

**३) जॉर्ज फर्मटन** – रोम शहरामध्ये रॉम्युलस आणि रीमा लहान होते, तेव्हा एका लांडगीने स्तनपान करवून त्यांना लहानाचे मोठे केले. जॉर्ज फर्मटन यांनी या प्रसंगावर आधारित तयार केलेला हा पुतळा त्या संग्रहालयामधील एक अप्रतिम पुतळा आहे.

**४) आल्बर्ट टाफ्ट** – सयाजीरावमहाराजांचा पुतळा यांनी तयार केला.

५) जपानी कलाकाराची बुद्धाची एक शांत आणि पवित्र मूर्ती ज्युबिली बागेमध्ये आहे.

**छ) कीर्ती मंदीर (हॉल ऑफ फेम)**

वेस्ट मिन्स्टर ॲबे पाहून सयाजीराव महाराजांची तब्येत खुष झाली होती. आपल्या पूर्वजांचे अशाच पद्धतीचे स्मारक करण्याचे त्यांनी ठरवले. इंग्रजी आणि हिंदू पद्धतीचे मिश्रण करून एक नवा प्रयोग कीर्ती मंदिराच्या स्वरूपात त्यांनी केला. दुर्दैवाने नादान वारस मिळाल्यामुळे ती कल्पना त्यांच्यानंतर उत्साहाने कोणी पुढे चालवू शकले नाही. त्यांच्या मूळ कल्पनेप्रमाणे त्या वास्तूशेजारी वा पिछाडीस चार मजली इमारतीमध्ये बडोद्यामधील सुप्रसिद्ध गायक, वादक, लेखक, योद्धे, नट वगैरेंचे स्मारक तेथे उभे करावयाचे होते. फत्तेसिंगरावांना मी तशी सूचनावजा विनंती केली होती. कृष्ण मेननने त्यांना इतके रडवले होते की, कोणाचीच सूचना स्वीकारायच्या ते मनःस्थितीत नव्हते. नंतर तर त्यांचा सालियाना आणि 'हिज हायनेस' ही पदवी या दोघांनाही ते पारखे झाले. रणजितसिंग विरूद्ध संग्रामसिंह यांच्या मालमत्तेसाठी कोर्टकचेऱ्या सुरू झाल्यावर मी ओळखले, 'खेल खतम', नेक्स्ट शो नेव्हर. चूप मरो."

### छ) संग्रहालय (म्युझियम)

जगातील सर्वोत्तम संग्रहालयाच्या यादीमध्ये बडोद्याच्या संग्रहालयाचा समावेश होतो. सालारजंग संग्रहालय हे एका श्रीमंत सरदाराचे संग्रहालय म्हणून ओळखले जाते; पण बडोद्याच्या संग्रहालयाचे स्वतःचे असे तत्त्वज्ञान आहे. महाराज युरोपमध्ये चांगल्या आणि सुंदर वस्तूंचा लिलाव होणार असेल, तर तेथे जातीने हजर राहात. त्यांच्या पदरी जगद्‌विख्यात कलासमीक्षक होते. त्यामुळे उत्कृष्ट पण दुर्मीळ चिजा कोठे मिळू शकतील, याचे ज्ञान त्यांना आपोआप होई. माझ्या सर्व नागरिकांना जग पाहण्याची संधी मिळणार नाही; पण जगातील सर्वोत्कृष्ट वस्तूंचे नमुने बडोद्यामध्येच त्यांना पाहायला मिळण्याची सोय करून देणे, हे मी माझे कर्तव्य समजतो, अशी त्यांची धारणा होती. ते पाहून माझ्या नागरिकांना अशाच 'सत्यं, शिवं आणि सुंदरम' वस्तू निर्माण करण्याची स्फूर्ती मिळावी असे त्यांचे तत्त्वज्ञान होते. हिटलरमुळे जसे अप्रत्यक्षपणे भारताला स्वातंत्र्य मिळाले, तसा काहीसा प्रकार या संग्रहालयाचा झाला. दुसऱ्या महायुद्धात गोएत्झ नावाचा जर्मन ज्यू इंग्रजांनी बंदी करून ठेवला होता. महाराजांनी त्याची बडोद्यामध्ये बदली करवून घेतली. त्याने रात्रंदिवस मेहनत करून या संग्रहालयाचा कायापालट केला. संग्रहालयाला स्वतःचे असे वेगळे तत्त्वज्ञान दिले, ओळख दिली. भारताचा सांस्कृतिक इतिहास शिकावयाचा असेल, तर हे संग्रहालय पाहायलाच हवे, म्हणून सोनिया गांधी वेळात वेळ काढून मध्यरात्रीपर्यंत हे संग्रहालय पाहात होत्या.

गोएत्झला देवकर नावाचा बॉटनीचा विद्यार्थी वारस म्हणून लाभला. तो मध्यप्रदेशचा. त्याच्या कर्तृत्वामुळे शिकागोच्या संग्रहालयामध्ये मी बडोद्याची एक सोन्याची शिवमूर्ती पाहिली. खरे म्हणजे त्याला तस्करी आणि ठकबाजी करण्याचे काहीच कारण नव्हते. तो निपुत्रिकच वारला. त्याच्या कर्तृत्वावर दिल्लीच्या 'ऑर्गनायझर'मध्ये मी १३ एप्रिल १९७४ आणि १४ डिसेंबर १९७४ च्या अंकात दोन मोठे लेख प्रसिद्ध केले. त्याचा परिणाम म्हणून बऱ्याच मोठ्या माशांना घरी बसावे लागले! हे लेख मला मालिनी हैदर या नावाखाली लिहावे लागले, म्हणून मी जिवंत राहू शकलो.

### ज) स्थापत्य

बडोदे हे उत्तमोत्तम इमारतींचे संग्रहालय समजले जाते. होमरूल चळवळीमुळे प्रसिद्धीस आलेल्या ॲनी बेझंट महाराजांना भेटायला बडोद्यास आल्या होत्या तेव्हा त्या बडोद्यामधील इमारतींचे संग्रहालय (म्युझियम ऑफ बिल्डिंग्ज) पाहून फार खुष झाल्या होत्या. या सर्व इमारती युरोपीय (विशेषतः इंग्रज) वास्तुविद्याविशारद आणि

अभियंत्यांनी बांधल्या आहेत. एक इमारत दुसऱ्यासारखी नाही. साऱ्यांची वसाहतींशी संबंधित वास्तुरचना (कलोनिअल आर्किटेक्चर) आहे. अपवाद फक्त तीन इमारतींचा आहे.

'पारशी अग्यारी' तळवलकरांनी बांधली. मेल ट्रेनिंग कॉलेज हे जाधव या एका स्थानिक अभियंत्याने बांधले आणि आजवा सरोवराचा बांध जगन्नाथ हाटे यांनी बांधला. युरोपीय वास्तुविशारद आणि तज्ज्ञांवर काम सोपवताना त्यांच्या नकाशामध्ये पूर्व आणि पश्चिम वास्तुविद्येचा संगम कसा होऊ शकेल, यावर ते भर देत. इंग्रजांनी त्याला इंडोसारसेनिक (गंगाजमनी) म्हटले. या स्थापत्यामध्ये महाराज एकदाच फसले.

लक्ष्मीविलास राजमहालाचे तोंड (फ्रंट) पश्चिमेकडे मूळच्या नकाशामध्ये होते. राजवाडा पूर्ण झाल्यावर हे लक्षात आले की, नेमके उलटे झाले आहे, तोंड पूर्वेकडे बांधले गेले. त्या वास्तुविशारद आणि अभियंत्याला एवढा धक्का बसला की, त्याने आत्महत्या केली! काही खास वास्तुविद्येच्या शोभिवंत इमारती पुढीलप्रमाणे - (पहिल्यांदा क्रमांक, इमारतीचे नाव, खर्च लाखात आणि सन)

(१) बडोदा कॉलेज (८.३०) १८८९, (२) मिडल स्कूल (१.४०), (३) फिमेल ट्रेनिंग कॉलेज (०.९०), (४) मेल ट्रेनिंग कॉलेज (१.१०), (५) म्युझियम (२.६०) १८८७-१८९४, (६) पिक्चर गॅलरी (१.६०), (७) कमाठी बाग व इतर बागा (११.२०) जानेवारी १८७९, (८) ज्युबिली बाग (०.५०) १९०६, (९) कलाभवन (५.५०)१८९०, (१०) किर्ती मंदिर (४.१०) २४ फेब्रुवारी १९३६, (११) लक्ष्मी विलास पॅलेस (५२.१०) १८८०-१८९० (१२) मकरपुरा (१२.८०), (१३) प्रताप विलास (१२.०), (१४) न्याय मंदिर (७.३०) १८९५-१९०४, (१५) खंडेराव मार्केट (१.४०) १९०६-१९०७, (१६) सेंट्रल जेल (७.७०), (१७) सयाजी जनरल हॉस्पिटल (६.८०) १८८६, (१८) वॉटर वर्क्स (४३.००), (१९) सायन्स इनस्टीट्यूट (६.३०), (२०) सेंट्रल लायब्ररी (१.९०) १९२२, (२१) बरोडा हायस्कूल (२.८०), (२२) ड्रेनेज (२५.००), (२३) मांडवी जीर्णोद्धार, (२४) म्युझिक कॉलेज १८९६, (२५) आजवा सरोवर (३४.४०) ८ जानेवारी १८८५ ला सुरू, (२६) जयसिंहराव लायब्ररी १८ फेब्रुवारी १८९२, (२७) किर्ती स्तंभ (०.६०) १ मार्च १८७७, (२८) कोठी कार्यालय (कलेक्टोरेट) १९१४-१९१७ आणि (२९) सेंट्रल रेकॉर्ड १९०७-१९१३.

### त) बागांचे आणि कारंज्यांचे शहर

**अ) बागा** – प्राचीन संस्कृत वाङ्मयातून वने आणि उपवने यांची सुंदर वर्णने आढळतात. रामाचा आणि पांडवांचा वनवास कोण विसरेल? बुद्धाचा जन्मच बागेमध्ये झाला. शकुंतलेचा आश्रम कसा विसरता येईल? इंग्रजांनी त्यांच्या 'फोडा आणि राज्य करा' या धोरणानुसार येथील उद्यानांचे सारे श्रेय 'ग्रँड मुघल्स'च्या पदरामध्ये टाकले आहे. महाराज तर खेडेगावामध्ये निसर्गाबरोबर वाढले. त्यांनी युरोपमधील बागा पाहिल्या आणि ते या बागकामाच्या शास्त्राचा शोध घेऊ लागले. त्यासाठी त्यांनी डोरिंजर हा फ्रेंच बागेचा तज्ज्ञ बडोद्यामध्ये आणला आणि त्याच्याकडून लक्ष्मीविलास राजमहालातील बागेचा विकास करवून घेतला. हळूहळू या शास्त्राचा उपयोग शहरातील इतर भागामध्येही फुफ्फुसे निर्माण करण्यासाठी केला. त्यातील मुख्य बागा–

(१) सयाजी बाग (११३ एकर) - सयाजी गंज, (२) लाल बाग, (३ एकर) रेल्वे क्रोसिंग जवळ, (३) हिरक बाग (११ गुंठे)- रेल्वे स्टेशनसमोर, (४) नवरोझ बाग (१.८ एकर) युनिव्हर्सिटीसमोर (५) सरदार बाग (६.६ एकर) वडीवाडी, साराभाईसमोर ,(६) सूर्यनारायण बाग (१.७ एकर) जीपीओ समोर, रावपुरा, (७) गाजरावाडी ९ एकर, (८) सरशिया बाग (१२ एकर), (९) सरशिया तलावपासे, (१०) केवडा बाग (२६ एकर)- शिया बागेजवळ, (११) केवडा बाग (अर्धा एकर)- शियाबागेजवळ, (१२) बदामडी बाग (१.२४ एकर) शिवाजी मार्ग (दांडीया बाझार), (१३) खंडेराव मार्केट बाग (१.३३ एकर) पॅलेस रोड, (१४) ज्युबिली बाग (३ एकर) अहमदाबादी पोळेच्या समोर १५, आझाद बाग (२ एकर) खारवा वाड, (१६) शास्त्री बाग (३ एकर) महादेव वाडी, (१७) बाग (१ एकर) प्रेमानंद हॉल, महादेव वाडी, (१८) वारसिया बाग (२ एकर) संत कव्हर कॉलनी, (१९) महर्षी बाग (२.५० एकर)- फत्तेगंज, (२०) सरोवर बाग (२२.२५ एकर) आजवा (कमाठी बागेनंतर क्र० २), (२१) निमेटा बाग (५ एकर) निमेटा फिल्ट्रेशन प्लांट (२२) नवा पुरा बाग (१.५ एकर) नवा पुरा मार्केट, (२३) मकरपुरा बाग (१ एकर) मकरपुरा गाव, (२४) माणेजा बाग (पाव एकर) माणेजा गाव (२५) नवी धरती बाग (१/८ एकर)- नागरवाडा, (२५) हरी ॐ नगर बाग (पाव एकर)- गोत्री रोड (२६) मोती बाग (पाव एकर)- राजमहाल कंपाऊंड, (२७) अटलादरा कंपोस्ट बाग (३.३० एकर)-अटलदरा, (२८) मही वॉटर वेल बाग (३ एकर)- वासद, (२९) छाणी जकातनाका बाग (४.२ एकर)-छाणी, जकात नाका, (३०) तरमध्ये सुएझ बाग (२.२० एकर)- तरमध्ये सुएझ, (३१) तरमध्ये हौ. बाग (३.३० एकर)- तरमध्ये, शरदनगर, (३२) हरणी हौ० बाग (१.३०

एकर)- हरणी रोड, (३३) यू०सी०ए० बाग (युनिव्हर्सिटी सी० अरविंद)- फत्तेगंज, पोस्ट ऑफिससमोर, (३४) शांतिनगर हौ० बाग (पाव एकर)- तरमध्ये, (३५) वाडी सुएझ बाग (३ एकर)- महादेव वाडी (३६) चंदन बाग (१ एकर) मांजलपूर, (३७) छाणी जकात नाका टापू (१.२ एकर)- छाणी, (३८) फत्तेगंज टापू (२.४ एकर)- फत्तेगंज विभागामध्ये, (३९) कारेली बाग (१ एकर)- कारेलीबाग विभागामध्ये.

**आ) कारंजी** – जी कथा बागबगिच्यांची, तीच कथा कारंजांची! पूर्वी बडोद्यामध्ये मुबलक पाण्याची सोय नव्हती. आजवा तलावातील पाण्याच्या उपलब्धतेमुळे सारे चित्रच बदलले. मोटर लावून ते पाणी वापरता येऊ लागले. तेव्हापासून हे शास्त्र जास्त विकसित झाले. सयाजीरावांनी बडोदा शहराची ओळख बागांचे आणि कारंजांचे शहर म्हणून जगाला करून दिली. काही प्रसिद्ध कारंजी

(१) हिंदुस्थान ब्राउन बोवरी कारंजे, फत्तेगंज, (२) हापी स्टँड कारंजे, सयाजी बाग, लिली तलावाशेजारी, (३) म्युझियम प्लॉट कारंजे, सयाजी बाग, (४) शिवाजी कारंजे, शिवाजी पुतळ्यासमोर, सयाजी बाग, (५) प्लॅनिटेरियम कारंजे, प्लॅनिटेरियमसमोर, सयाजी बाग, (६) बँक ऑफ इंडिया कारंजे, काळ्या घोड्यावर बसलेल्या सयाजीरावांच्या पुतळ्यासमोर, (७) फत्तेसिंगराव कारंजे, विश्वमित्री पूलासमोर, (८) मार्केट कारंजे, खंडेराव मार्केटच्या पूर्व दिशेला, (९) मार्केट कारंजे, खंडेराव मार्केटच्या उत्तर दिशेला, (१०) गांधी नगर कारंजे, गांधी नगर गृहासमोर, (११) स्वतंत्र कारंजे, न्याय मंदिरासमोर, (१२) रामचौक कारंजे, वाडी, टॉवरमागे, (१३) महादेव कारंजे, प्रेमानंद संस्कार केंद्रासमोर, महादेव तलाव, (१४) सुरसागर कारंजे, तलावातील जेट कारंजे, पाताळेश्वराजवळ, (१५) सुरसागर कारंजे हनुमान मंदिरासमोर, (१६) सुरसागर कारंजे, कोरान्ने (आता, शाह) क्लाससमोर, (१७) सुरसागर कारंजे, बोटिंग क्लबसमोर, (१८) सरशिया तलाव कारंजे, सरशिया तलावासमोर, वारशिया, (१९) लालबाग सर्कल कारंजे, लाल बाग, (२०) लालबाग शिंपला कारंजे लालबागेमध्ये, (२१) सूर्यनारायण कारंजे, सूर्यनारायण बागेमध्ये, (२२) सावन कारंजे, निमेटा उद्यानामध्ये, (२३) स्ट्रक्चर कारंजे, आजवा सरोवर उद्यानामध्ये, (२४) सायकल स्टँड कारंजे, आजवा, (२५) सिद्धनाथ कारंजे, सिद्धनाथ तलावाशेजारी.

। । ।

# १४



## गायकवाड परिवार

**अ) गायकवाड गोतावळा** – (बडोद्याचे राज्यकर्ते, राज्याचा काळ, पेशवे व नफा नुकसानीची वैशिष्ट्ये) (१) **पिलाजीराव** (१७२०-३२) (१२) (बाळाजी विश्वनाथ आणि बाजीराव १ले) कारभारी सुरेश्वर देसाई यांच्या दोन मुलींची अब्रू वाचवण्यासाठी बडोद्यावर स्वारी आणि मुस्लीम नबाबाच्या सत्तेचा अंत. चिडून शत्रूने डाकोर येथे मारेकरी घालून खून केला. (२) **दमाजीराव** (१७३२-६८) (३६) (बाजीराव १ले आणि माधवराव) १७४१ मध्ये भरूच बंदर घालवले. १७५१ मध्ये पुण्यावरच हल्ला केला; पण पुरंदरे बंधूंच्या हातून पराभव आणि लोहगडावर कैदी; समझौता आणि अहमदाबाद जिंकून गुजराथमधील मुस्लीम सत्ता संपवतात. १७५६ मध्ये खंबायतच्या नबाबाने अहमदाबाद घेतले. ते १७५८ मध्ये दमाजीरावांनी पुन्हा जिंकले. पानिपतावर १०,००० सैन्यासह गेले; पण जखमी दमाजीराव पळून परत बडोद्यामध्ये आले. मांडवीची भव्य इमारत बांधली (३) **गोविंदराव १ले** (१७६८-७१) (०३) (माधवराव) याने राघोबास मदत केली आणि कैदी झाला. (४) **सयाजीराव १ले** (१७७१-७८) (०८) (माधवराव, नारायणराव आणि बारभाई) (५) **फत्तेसिंगराव १ले** (१७७८-९०) (०३) (सवाई माधवराव आणि दुसरा बाजीराव व राघोबा) भरूच कायमचे इंग्रजांना मिळाले. (६) **मानाजीराव** (१७९०-९३) (०३) (दुसरा बाजीराव आणि राघोबा) (७) **गोविंदराव दुसरे** (१७९३-१८००) (०७) (दुसरा बाजीराव, राघोबा आणि कंपनी सरकार) (८) **आनंदराव** (१८००-१९) (१९) (दुसरा बाजीराव, राघोबा आणि कंपनी सरकार) पानिपतानंतर मराठा तरुण पिढी ठार झाल्यानंतर भाडोत्री अरब सैन्य बाळगले. अरबांनी दंगा करून राजाला १० दिवस कैदेत ठेवले. त्यांचा काटा काढण्यासाठी इंग्रजी तैनाती फौज आणली. आनंदरावांनी चिखली आणि सुरतचे २८ प्रांत जिंकून इंग्रजांना बक्षिस दिले! बडोद्याच्या रक्षणासाठी कंपनी सरकारने दिवाण रावजी आप्पाजी आणि सेनापती बाबाजी आप्पाजी यांच्याबरोबर ३ जून १८०२ रोजी करार केले. २८ डिसेंबर १८०८ रोजी सीताराम रावजींनी पाटण

आणि अहमदाबाद यांचा कबजा सोडला. **(९) सयाजीराव दुसरे** (१८१९-४७) (२८) (कंपनी सरकार) १८२० मध्ये एलफिन्स्टनची बडोदा भेट आणि गोड बोलून दहा अटींचा करार करून सयाजीरावांना गुलाम बनवले. माल्कम रेसिडेंट सर्वश्रेष्ठ. **(१०) गणपतराव** १८४७-५६ (०९) (कंपनी सरकार) **(११) खंडेराव** (१८५६-७०) (१४) (कंपनी सरकारचे लॉर्ड कॅनिंग, एल्जिन, लॉरेंस आणि मेयो) मुस्लीमनिष्ठ, इंग्रजनिष्ठ - स्वदेश आणि स्वधर्म यांचा घात. **(१२) मल्हारराव** (१८७०-७५) (०५) (मेयो आणि नॉर्थब्रुक) स्वदेश आणि स्वधर्म यांची निष्ठा म्हणून पदच्युती व मद्रास येथे हत्या. **(१३) सयाजीराव तिसरे** (१८७५-१९३९) (६४) (लॉर्ड नॉर्थब्रुक, लिटन, रिपन, डफरीन, लँसडोन, एल्जिन, कर्झन, दुसरा मिंटो, दुसरा हार्डिंग, चेम्सफोर्ड, रीडिंग, इर्विन, विलिंग्डन आणि लिनलिथगो) स्वदेश आणि स्वधर्म यांची निष्ठा. इंग्रजांकडून ओखा आणि द्वारका परत मिळवले! **(१४) प्रतापसिंह** (१९३९-४७) (०८) (नेहरू-पटेल) लफडीबहाद्दर; **(१५). फत्तेसिंह दुसरे** (१९४७-५२) (०५) (नेहरू-इंदिरा गांधी) दुर्दैवी. हाती काहीच लाभले नाही.

**आ) सयाजीराव (गोपाळ) गायकवाडांचा परिवार**

(१) जनक मातापिता – १. काशीराव (१८७७) तालमीचा नाद. २. उमाबाई ३ पुत्र (आनंद, गोपाळ आणि संपत) आणि ४ कन्या (भीमा, छिमा, ठमा आणि तुळसा)

(२) काका – १. गबाजीराव हे काशीरावांचे मोठे बंधू. ते शेवटपर्यंत कवळाणे गावातच राहिले. ते निपुत्रिक वारले. २. बाबूराव काशीरावांचे ते छोटे बंधू. त्यांचा मुलगा अवचितराव सेनेत सरनौबत होता. ३. उखाजीराव; ४. सखारामराव.

(३) बंधू १. आनंदराव (मृत्यू १९१७)- सर्वात थोरले बंधू. त्यांची सयाजीरावांनी बडोद्याच्या लष्करामध्ये जनरल म्हणून नेमणूक केली. लालसिंह, चंद्रसिंह आणि भद्रसिंह हे त्यांचे पुत्र. २. संपतराव (मृत्यू १९३४)- त्यांनी सयाजीरावांचे गृह मंत्रालय १९३१ पर्यंत सांभाळले. ते नायब सुबा (डे० कलेक्टर) या पदावर होते.

(४) पत्नी १. पहिल्या चिमणाबाई – तंजावरच्या सरदार मोहित्यांची कन्या लक्ष्मी (विवाह ६ जाने. १८८०, मृत्यू- ७ मे १८८५); २. दुसऱ्या चिमणाबाई- देवासच्या सरदार घाटगे यांची कन्या गजरा. (विवाह २८ डिसेंबर १८८५; मृत्यू १९६३)

(५) पुत्र-१ पहिल्या चिमणाबाई-फत्तेसिंहराव (१८८३-१९०८); त्यांचा पुत्र प्रतापसिंह (-१९६८; पदच्युत १२ एप्रिल १९५१); २. दुसऱ्या चिमणाबाई- तीन-

जयसिंगराव (१८८३-१९०८); त्यांचा पुत्र प्रतापसिंह (१८९०-१९११), आणि धैर्यशीलराव (१८९३-१९४०)

६. कन्या- १ पहिल्या चिमणाबाई- बजूबाई (जन्म १८८१) आणि पुतळाबाई (१८८२-८३); २. दुसऱ्या चिमणाबाई- इंदिरा राजे (पुढे कूचबिहारच्या महाराणी आणि जयपूरच्या गायत्रीदेवी या थोर महाराणींची आई) (१८९२-१९६८)

। । ।

# १५



## गृहसौख्य

**अ) तणाव** – महाराज स्वतंत्रपणे विचार करणारे होते. ते काटकसरी होते. ते कडक शिस्तीचे भोक्ते होते. कोणी वेळ पाळली नाही, तर ते चिडत. त्यांना व्यसनाचा तिटकारा होता. जग काय म्हणेल याची त्यांना फारशी तमा वाटत नसे; पण या गुणसमुच्चयामुळे ते 'महामानव' वाटत. सामान्य माणसांना त्यांची भीती वाटे. ते त्यांना टाळत. त्याच्या सर्व कुटुंबीयांमध्ये ते 'महामानव' होते, इतर मात्र सामान्य होते. यामुळे त्यांच्याशी सगळ्यांचे पटणे अवघड होते, नव्हे अशक्य होते. महाराजांचे दृश्य आणि अदृश्य व्याप आणि उद्योग फार. त्यामुळे त्यांचा स्वभाव थोडा तऱ्हेवाईक झाला होता. कदाचित लोकांना टाळण्यासाठी घेतलेला तो 'बुरखा' असू शकेल. त्यांच्या बायकामुलांना तरी तसे वाटे. राजे असाल तर लोकांसाठी; आमच्यासाठी तर नवरा वा पिताच आहात ना? सयाजीराजे आपली व्यथा मुलांना वा पत्नीला मोकळेपणाने सांगू शकत नसत. त्यांना वाटे, ही मंडळी मला समजून का घेऊ शकत नाहीत? कोणालाही आधी वेळ ठरवल्याशिवाय (अपॉईंटमेंट) ते भेटण्यास नकार देत; अगदी स्वतःच्या मुलांनादेखील काय काम आहे आणि किती वेळ ते घेणार? हे आधीपासून सांगावे लागे. मुलगे, सुना, लेकी, आप्त भोजनास वगैरे येऊन त्या प्रसंगाने आपला मतलब बोलू लागत. हा भोंगळ प्रकार त्यांनी बंद केला. मुलांना सुद्धा बापाशी एकदम वाटेल तेव्हा बोलण्याची मनाई होती (सरदेसाई गो० स०, 'सयाजीराव यांच्या सहवासात', पृ० ६४).

गृहसौख्याच्या बाबतीत सयाजीराव नेहमीच असमाधानी आणि असंतुष्ट होते. याची पूर्ण कल्पना ज्योतिषांनी ते दत्तक जायच्या वेळी त्यांना दिली होती. "परमदयाळू आणि परमन्यायी परमेश्वर एका माणसाला एका जन्मामध्ये सर्व काही देत नाही. तो काही तरी बाकी ठेवतोच. त्याने असे नाही केले, तर स्वार्थी, अहंकारी आणि महत्त्वाकांक्षी माणूस परमेश्वराशीच स्पर्धा करेल." (नेने म० पां०, यांच्या आठवणीतून). या तेलंगी ब्राह्मणास कर्णपिशाच्च प्रसन्न होते असे म्हणतात.) येथे एक गोष्ट खास सांगितली पाहिजे. सयाजीराव नेहमीच एका प्रचंड तणावाखाली

वावरत. त्यांना सतत दुहेरी भूमिका 'साकारावी' नव्हे, 'जगावी' लागे. एक भूमिका देशभक्त आणि राष्ट्रवादी क्रांतिकारकाची. त्या भूमिकेमध्ये सामान्य इंग्रजांशी नाही, तर साम्राज्यवादी इंग्रजी राजकर्त्यांशी आणि त्यांचा दुरावा होता, विरोध होता. दुसरी भूमिका वरवर वाटणाऱ्या इंग्रजनिष्ठ, साम्राज्यनिष्ठ आणि 'परमेश्वर राजाचे रक्षण करो' (गॉड सेव्ह द किंग) असे म्हणणाऱ्या हिंदी संस्थानिकाची. यापैकी पहिली भूमिका सयाजीरावांची आवडती होती, तर दुसरी बिलकूल नावडती होती.

कुटुंबातील सभासदांना त्यांची ही मानसशास्त्रीय पार्श्वभूमी समजणे अवघड होते, कारण ती सामान्य माणसे होती. आपले वडील असामान्य आहेत, हे जाणण्याची त्यांची बौद्धिक कुवत नव्हती. आपण त्यांचे चांगले वारस म्हणून या जगामध्ये चमकून दाखवू, अशी त्यांना जिद्दही नव्हती आणि त्यामध्ये रसही नव्हता. त्यांना हरबऱ्याच्या झाडावर चढवायला आजूबाजूला बरीच स्वार्थी मानकरी मंडळी वावरत होती. काही खालील उदाहरणे ही संकल्पना स्पष्ट करतील.

(१) धैर्यशीलराव हे महाराजांचे शेंडेफळ. त्याला दिलेले पैसे नेहमीच कमी पडत असत. त्याने उधळपट्टी करू नये म्हणून 'हा पैसा जनतेचा आहे, आपण केवळ त्याचे विश्वस्त आहोत आणि आपण काटकसरीने राहिले पाहिजे', असे महाराज त्याला सारखे बजावत असत. तेव्हा महाराजांना हा सुनवत असे "महाराज, मी राजपुत्र आहे. मला माझ्या राजपुत्राच्या प्रतिष्ठेप्रमाणे राहावे लागते. आपली गोष्ट वेगळी आहे, लहानपणी आपण राजपुत्र नव्हता" (E. L. Totten ham, His Highness of Hindostan, p.234).

(२) जयसिंगराव धैर्यशीलपेक्षा मोठा. त्याने बापावर आरोप केला की, "आता आम्ही मोठे झालो आहोत. आम्हाला लहान मुलासारखे वागवायचे आता सोडून द्या. आम्हाला आमचे बरे वाईट कळते" (Prof. Kamdar, M. Gaekwad of Baroda, Sayajirao III, unpublished MSS, Chapter 6 (1967)). बापाने डोके शांत ठेवले आणि मुलाला एक पत्र लिहून समजावले, "तुमचे आमचे विचार एकमेकांशी जुळणारे नाहीत. आमच्याही काही चुका होत असतील, नाही असे नाही, पण त्यांच्या मागील आमचे उद्दिष्ट तुम्ही मुले समजून घ्यायचा प्रयत्न का करत नाही? मी तुम्हाला एक मैत्रीपूर्ण पत्र लिहिले; पण तुम्ही त्याचे उत्तरदेखील पाठवण्याची तसदी घेतली नाही. आपण एकत्र बसून ज्या समस्या असतील, त्यावर चर्चा करू आणि गाडी रुळावर आणू. मी त्यासाठी उत्सुक आहे. मी रागावलो आहे, ही कल्पना पहिल्यांदा मनातून काढून टाका." असे एकत्र येऊन चर्चा करण्याचे भाग्य मुलांनी बापाला कधी दिलेच नाही.

(३) फत्तेसिंगराव हा सर्वांत थोरला पुत्र; पण पहिल्या चिमणा-बाईसाहेबांचा. आपल्या एकाही मुलाला गादी मिळणार नाही, हे दुसऱ्या चिमणाबाईंना समजून चुकले होते. फत्तेसिंगराव मरण पावल्यावर सवतीमत्सर जागृत झाला, तर प्रतापसिंह या लहानग्या राजपुत्राच्या जिवास धोका होता हे धूर्त बापाने ओळखले होते. प्रो० मॅकडोनाल्ड यांनी इंग्लंडहून कळवले की, फत्तेसिंगरावास पैशाची उधळपट्टी करण्याची सवय लागली आहे. लगेच पित्याने त्यास परत बडोद्यात बोलावून घेतले. १९२० मध्ये परदेशी असलेल्या मुलास दरमहा ५०० रुपये खर्चासाठी सयाजीराव धाडीत असत. हसित ह० बुच, महाराजा सयाजीराव त्रिजा, पृ० १४६). म्हणून त्याची रवानगी लालबाग राजमहालामध्ये केली होती. त्याला आपल्या खास विश्वासामधल्या खाशेराव जाधवांच्या ताब्यामध्ये दिले होते आणि त्यांना बजावले होते, "हा आपला मुलगा आहे असे समजा. कोणी काहीही त्याला खायला वा प्यायला दिले, तर त्याची आपण आधी चव घ्यायची, वाट पाहायची आणि मगच राजकुमाराने ते घ्यायचे. मी काय म्हणतो ते समजले ना?"

खाशेरावांनी आपले वचन शेवटपर्यंत पाळले. या चव घेण्याच्या प्रक्रियेत या विश्वासू सेवकाचा प्राण गेला! सयाजीरावांच्या मनाची स्थिती कशी झाली असेल? आपलेच दात आणि आपलेच ओठ! (सुभद्राबाई पगार या खाशेरावांच्या कन्येने सांगितलेल्या आठवणी).

(४) छोटे सरकार धैर्यशीलराव म्हणजे उद्धटपणाची परिसीमा होती; पण बापाला सरळ पत्र लिहण्याची त्यांची हिंमत नव्हती. आपल्याला जे सांगायचे ते तो आपल्या इंदिरा या बहिणीमार्फत त्यांना कळवी. ती आता कूचबिहारची महाराणी झाली होती! या भ्याडपणाचा महाराजांना संताप येत असे. अशा एका पत्राला सयाजीरावांनी इंदिरेला सणसणीत जबाब दिला. "धैर्यशील असा का वागतो, ते मला समजेनासे झाले आहे. चैनबाजी आणि उडाणटप्पूपणा याशिवाय आयुष्यामध्ये त्याने काय केले आहे? या जगामध्ये प्रत्येकाची स्वतःची, कुटुंबाची, राष्ट्राची आणि समस्त मानव जातीची काही जबाबदारी व काही कर्तव्ये आहेत आणि ती पार पाडायची असतात. हे त्याला का समजत नाही? स्वार्थ आणि राजपुत्राचा अहंकार त्याला बरोबर समजतो. आम्ही काही त्यांचे शत्रू नाही."

(५) मुले सयाजीरावांना दुरावली होती, ही वस्तुस्थिती होती. ती बापाशी फटकून वागत असत. हे उघड गुपित जगाला समजले होते. या मुलांच्या शिक्षणासाठी बापाने केवढ्या खस्ता खाल्ल्या होत्या! पण त्यांना तसले राष्ट्रवादी शिक्षण नकोच होते! ही सयाजीरावांची मोठी खंत होती. सयाजीराव 'महाराज' होते. त्यांचे प्रशिक्षण फार वेगळ्या पद्धतीने झाले होते. फार थोर मंडळींनी त्यांना

शिस्त, चारित्र्य, देशभक्ती, श्रद्धा, परंपरा, स्वदेश आणि स्वधर्म या सर्वांचे धडे दिले होते. याउलट त्यांचे चिरंजीव. दोघांमध्ये पिढ्यांचे अंतर होते, नव्हे मोठी दरी होती. सयाजीराव म्हणत, त्यांना 'भरपूर आणि लवकर' (टू मच व टू सून) सर्व मिळाले आहे. त्यामुळे ते सुख त्यांना बोचते. सहन करता येत नाही. म्हणून बापालाच शहाणपणा शिकवायचा त्यांचा उद्योग. चमच्यांनी केलेल्या फाजील स्तुतीमुळे ही मुले पार बिघडून गेली होती. त्यांना स्वजन, स्वदेश, स्वधर्म आणि स्वभाषा यांच्याविषयी यत्किंचितही आस्था नव्हती. त्याविषयी सयाजीराव मुलांशी जेवढे जास्त बोलत, तेवढी तेवढी ती मुले त्यांच्यापासून जास्त जास्त लांब जात.

(६) सयाजीरावांना जळीस्थळी राजकारण दिसत असे. लग्न ही साऱ्या दक्षिणी संस्थानिकांना एका मोठ्या कुटुंबामध्ये सामावून घेण्यासाठी आलेली सुवर्णसंधी. त्यांना कोल्हापूर आणि ग्वाल्हेर संस्थानाशी विवाहसंबंधांनी जोडून घ्यायचे मोठे स्वप्न होते. भावी स्वातंत्र्याच्या लढ्यामध्ये ते खूप मदतरूप ठरेल, असे त्यांचे राजकीय गणित होते. बापाच्या स्वप्नासाठी क्षत्रियाच्या मुलीने थोडा त्याग केला तर हरकत नसावी.

खरे म्हणजे हिंदुस्थानाच्या इतिहासामध्ये तशी परंपराच आहे. त्यांनी चिमणाबाईंना ते पटवले. त्याही म्हणू लागल्या "आपले वचन गेले आहे, तर इंदिरेने शिंदे महाराजांशीच लग्न लावले पाहिजे." रियासतकार सरदेसाई यांच्यामुळे आपले हे राजकीय गणित फसले, अशी त्यांची समजूत होती. त्यामुळे शेवटपर्यंत सरदेसाई यांच्यावर त्यांचा राग होता. सरदेसाई यांच्या पाठिंब्यामुळे इंदिरेने ग्वाल्हेरच्या बीजवर शिंद्यांशी लग्न करायला साफ नकार दिला. त्यांना पत्र लिहून तसे कळवले आणि पळून जाऊन तिने कूचबिहारच्या राजाच्या भावाशी लग्न केले. सुदैवाने राजा अचानक मरण पावला आणि गादी भावाला आणि इंदिरेला मिळाली. महाराजांचे राजकीय स्वप्न थोडे तरी यशस्वी झाले. डोके शांत ठेवून त्यांनी परिस्थितीशी कसेबसे जुळवून घेतले. इंदिराराजे यांची मुलगी म्हणजे गायत्रीदेवी. ही पुढे सुप्रसिद्ध जयपूरची महाराणी झाली.

(७) इंदुमती ही फत्तेसिंगरावांची मुलगी. तिचे कोल्हापूरच्या महाराजांबरोबर लग्न लावून द्यायचा विचार सयाजीरावांच्या मनामध्ये घोळत होता. कोल्हापूरकरांनी मागितलेल्या हुंड्यावरून लग्न फिसकटते की काय असे वाटू लागले. महाराजांनी राणोजी शिरगावकर या मध्यस्थाला सांगितले की, "हा हुंडा अवाच्या सवा आहे!" राणोजींनी महाराजांना सुनावले, "मागे लग्नामध्ये खंडेरावांनी चार लाख रुपये केवळ रेल्वे भाड्यासाठी खर्च केले होते." महाराजांनी राणोजींना कसे पटवले ते परमेश्वर जाणे; पण त्यांनी घासाघीस करून ती रक्कम कमी करवून घेतली आणि

शेवटी एकदाचे लग्न पार पाडले. इंदुमतीला जन्मभर "तुझा बाप चिक्कू आहे" असे ऐकून घ्यावे लागले!

**आ) संकटांची मालिका** – १९०८ मध्ये त्यांचा मोठा राजपुत्र, वारस आणि पहिल्या चिमणाबाईची एकुलती एक निशाणी – फत्तेसिंह – मृत्यू पावले. त्यानंतर दिल्लीचे माफी प्रकरण गाजले. त्यास ना० गोखले कारणीभूत झाले. एवढा अपमान आजवर त्यांनी कधीच सहन केला नव्हता. तेव्हापासून महाराजांचे हसणे-खिदळणे सर्व बंद झाले आणि ते उत्तरोत्तर एकलकोंडे होत गेले.

/ / /

# १६



# सयाजीरावांचे राजकीय वारस

**अ) हिज हायनेस प्रतापसिंह** (१९१५-१९६८, राजा १९४०-१९५२) व **हर हायनेस सौ० शांतादेवी** आणि **सौ० सीतादेवी**

वयाच्या ७६ व्या वर्षी सयाजीराव वारले आणि प्रतापसिंह या त्यांच्या नातवाचा राज्यारोहण समारंभ मोठ्या थाटामध्ये साजरा झाला. प्रतापसिंहाना बहुधा सिझोफ्रेनियाचा विकार असावा. दोन बायका, दोन घरे, दोन मने, सर्व काही दोन दोन. २ सप्टेंबर १९४७ रोजी त्याने सरदार पटेलांना स्वतःच्या हस्ताक्षरामध्ये पत्र लिहून कळवले की, जुनागढ राज्य खालसा करण्यासाठी आपल्याला लष्करी मदतीची जरूर लागली, तर ती द्यायला आपण केव्हाही तयार आहोत. सरदारांजवळ साऱ्या भारत सरकारची सेना हाती असल्यामुळे, अर्थातच त्यांनी प्रतापसिंहांची मदत घेतली नाही; पण त्यांना त्यांच्या देशनिष्ठेचे कौतुक वाटले. प्रतापसिंहांची उडी मोठी होती. आता त्यांना साऱ्या गुजराथचे नरेश व्हायचे होते. ही बहुधा सीतामाईंची महत्त्वाकांक्षा असावी. वल्लभभाईंनी त्याला बजावले, ''ही महत्त्वाकांक्षा तुम्हाला खड्ड्यामध्ये टाकणारी ठरेल.'' पण प्रतापसिंह ही धोक्याची घंटा ऐकण्याच्या मनःस्थितीत नव्हते. सरदारांनी प्रतापसिंहांना लोकशाहीने आपण राज्य करावे, अशी सूचना केली. तीही या राजाने धुडकावून लावली.

'कामातुराणां न भयं न लज्जां।' १९५० च्या उन्हाळ्यामध्ये दुखावलेल्या या राजे मंडळींनी विंध्य प्रदेशातील नागोदच्या जंगलामध्ये शिकारीचा एका आठवड्याचा कार्यक्रम ठरवला. बडोदे, कोल्हापूर, विलासपूर, सांडूर, पन्ना, छत्रपूर, लुणावडा व जोधपूर यांचे राजे आणि उर्दू येणाऱ्या कॅनडा मधील एका गृहस्थांनी व त्यांच्या सुंदर पत्नीने तेथे आपली हजेरी लावली. बेसावध प्रतापसिंहाने तेथे केंद्र सरकारची दादागिरी आपण खपवून घेता कामा नये, अशा अर्थाचे भाषण केले. त्या शिकारीच्या निमित्ताने जमलेल्या मैफलीचा सारा वृत्तान्त केंद्रीय हेर खात्याने नव्या दिल्लीला कळवला. १९५०च्या डिसेंबरमध्ये ताजमहाल हॉटेलमध्ये राजांच्या बऱ्याच बैठकी झाल्या आणि राजे मंडळींचे एक मंडळ स्थापण्यात आले. प्रतापसिंह

गायकवाडांना १९५१च्या फेब्रुवारीमध्ये त्याचे प्रमुख करण्यात आले. या राजाने सल्लागार म्हणून कोणास शोधावे? रफी अहमद किडवाई. नेहरूंचे सर्वांत जवळचे स्नेही आणि सरदारांचे शत्रू. सरदार त्यांना 'रफियन' म्हणत. काश्मीर प्रकरणापासून साऱ्या हिंदू राजांची नेहरूंना आधीच चीड होती. किडवाईंनी सांगितलेल्या खऱ्या-खोट्या गोष्टींमुळे या चिडीचे द्वेषामध्ये रूपांतर झाले. आधीच मर्कट, त्यातून मद्य प्याला.

प्रतापसिंहांची तशी गत झाली. सीतामाईंच्या प्रेमाने आंधळे आणि पागल झालेल्या या राजाजवळ स्वतंत्रपणे विचार करायला वेळ आणि बुद्धी कोठे होती? त्याच्या अवतीभवती स्वार्थी आणि चहाडखोर चमच्यांची चांडाळचौकडी होती. त्या जातीय बदमाषांनी प्रतापसिंहांना हरबऱ्याच्या झाडावर चढवले आणि त्या मूर्खांच्या नादी लागून व समोर सरदार पटेलांसारखा पोलादी पुरुष आहे, याचे भान न ठेवता या सीतामाईच्या रामाने भारत सरकार विरूद्ध बंड पुकारले. २३ लाखांच्या प्रिव्ही पर्सच्याऐवजी त्याने आपल्याला दोन बायका असल्यामुळे, "ती ५० लाखांची करा", असा हट्ट धरला. या एका वक्तव्याने आपण आपल्या थोर आजोबांची सारी अब्रू धूळीला मिळवतो आहोत, याचेही या अविवेकी राजाला भान राहिले नाही. भारत सरकारने त्याला थोड्याच काळात पदच्युत केले आणि त्याच्या जागी फत्तेसिंह या १३ वर्षांच्या नवख्या राजपुत्राला नवा राजा म्हणून जाहीर केले. प्रतापसिंहांसाठी बडोद्यातील एकानेही अश्रू ढाळले नाहीत. नागोदचा शिकारी स्वतःच चहाडखोर चमच्यांचा शिकार बनला.

२) **हिज हायनेस फत्तेसिंहराव** (१९३०-१९८८, राज्यावर १९५२-१९७६) हे दुर्दैवी हुमायुनाचे दुसरे हिंदू अवतार! जन्मापासून दुर्दैव त्यांच्या पाठीमागे हात धुऊन लागले. लक्ष्मीविलास राजमहालात राजकुमारांसाठी असलेल्या शाळेमध्ये (प्रिन्स स्कूल) त्यांचे शिक्षण झाले. बडोद्याचे राजकारण सावत्र आईमुळे एवढ्या झपाट्याने बदलत गेले की, त्यांची केंब्रिज येथे उच्च शिक्षण घ्यायला जायची संधी कायमची हुकली. लहानपणापासून त्यांच्या कानांवर दोनच गोष्टी पडायच्या – पित्याची लफडी आणि 'बिच्चारा' राजपुत्र. राजा होण्याचे प्रशिक्षण त्यांना जरूर लाभले; पण राजा बनण्याचे भाग्य त्यांच्या नशिबी नसल्याने त्या प्रशिक्षणाचा काय उपयोग? ते क्रिकेट उत्तम खेळत. त्यांच्या नेतृत्वाखाली भारतीय संघ एकदा इंग्लंडला गेला होता. त्या वेळी इंग्लंड विरूद्ध भारत जिंकणे अशक्य कोटीतली गोष्ट होती. १९५१ मध्ये ते श्री महाराजा सयाजीराव विद्यापीठाचे कुलगुरू झाले. ते विनोदाने म्हणत, "एक मॅट्रिक पोर केवढे भाग्यवान! तो 'द्वीपदवीधारक' आणि 'विद्यावाचस्पती' या पदवीच्या प्रमाणपत्रावर कुलगुरू या नात्याने सह्या करतो."

एवढे भाग्य सोडले, तर फत्तेसिंहरावांच्या जीवनात सुदैवी म्हणता येईल, असे काही विशेष घडले नाही. जोधपूरच्या उच्च राजपूत कुळातील राजकन्या त्यांना राणी म्हणून लाभली; पण त्यांना संततीसुख कधीच मिळाले नाही. त्यामुळे फत्तेसिंगराव कायम उदास असत. त्यांच्या डोळ्यांसमोर बापास काँग्रेसवाल्यांनी पदच्युत केले म्हणून काँग्रेसवाल्यांविरुद्ध मनातल्या मनात विलक्षण चीड होती; पण ती व्यक्त करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी नव्हते. आपण केवळ शोभेचा राजा आहोत, आपल्याला स्वातंत्र्य वा सत्ता काही नाही, हे त्यांना चांगले माहीत होते. ते खासदार म्हणून बडोद्याहून हसत निवडून आले. नेहरूंनी त्यांना डिफेन्स सेक्रेटरी म्हणून नेमले; पण त्यांची गाठ पडली ती साम्यवादी आणि राजेमहाराजांचे कट्टर विरोधी असलेल्या कृष्ण मेनन या संरक्षणमंत्र्यांशी. ते फत्तेसिंहांना कधी पहाटेस बोलावत, तर कधी मध्यरात्री. 'मिस्टर प्रिन्स' म्हणून त्यांना एवढे बोलत आणि शिव्या देत की, महाराज घरी येऊन चक्क रडत. १९६२ मध्ये भारतीय सेनेचा चीनने पराभव केला आणि फत्तेसिंहराव संरक्षण मंत्री मेनन यांच्या कचाट्यातून कायमचे सुटले.

आपल्या कामाची कोणास गरज नाही, अशी त्यांची खात्री पटली. वरळीच्या उत्तम दर्जाच्या इमारतीमध्ये (गेस्ट हाऊस) त्यांच्या मालकीचा एक संपूर्ण मजला होता. ते आणि त्यांचा विश्वासू सेवक महंमद सारा दिवस व्हिस्की पीत बसलेले असत. फत्तेसिंहांना डिप्रेशनने जबरदस्त ग्रासलेले होते. त्यांचा त्यावर स्वतःचा इलाज म्हणजे आणखी पीत राहणे. मोरारजीभाईंकडे सयाजीराव ट्रस्टची कसलीशी बैठक होती. वीज नव्हती, म्हणून लिफ्ट सुरू नव्हती. मातोश्री शांताबाई वर गेल्या नाहीत. त्या तशाच घरी परतल्या. फत्तेसिंहांची मनाची पट्टी वरच्या सुरामध्ये लागलेली असल्याने, ते सहा मजले जिन्याने वर चढून गेले. दुसऱ्या दिवशी (१ सप्टेंबर १९८८) हृदय विकाराच्या धक्क्याने ते मरण पावले.

१९६० मध्ये फत्तेसिंहांनी दिल्लीचा एवढा धसका घेतला की, त्यांनी खासदारकी नाकारली आणि ते गांधीनगर विधानसभेमध्ये आमदार झाले. खरे म्हणजे ते मुख्यमंत्री व्हायचे; पण तेथील राजकारणी एवढे विनोदी की, त्यांनी फत्तेसिंहांना मंत्री केले, पण खाती दिली ती कुटुंब नियोजन, आरोग्य आणि तुरुंगाची. १९६१ मध्ये राजकारण एवढे बदलले की, आपण काय करावे तेच त्यांना कळेना. काँग्रेसचा त्यांनी राजीनामा दिला आणि स्वतंत्रपणे निवडणूक लढवून ते पुनश्च दिल्लीमध्ये खासदार झाले. तेथील राजकारणी तर आणखी विनोदी. त्यांनी त्यांना शिक्षण आणि समाज कल्याणसारख्या एका निरुपद्रवी समितीचे सदस्य केले.

त्यांची चार पुस्तके प्रसिद्ध आहेत (१) 'पॅलेसेस ऑफ इंडिया' (१९८०), (२) 'रिलिजियस श्राईन्स ऑफ इंडिया', (३) 'स्टेटस ऑफ इंडियन वुमन ओव्हर द एजेस', आणि (४) 'प्रिन्स अँड द मॅन – सयाजीराव (३रे) गायकवाड'. अर्थात सर्वच पुस्तके त्यांच्या नावाने दुसऱ्यानेच लिहिली होती. शेवटचे काम माझ्याकडे आले होते. एका अटीवर सयाजीराव पण मायनस क्रांती, असे लेखन करायचे. काँग्रेसच्या दृष्टिकोनातून सयाजीरावांची 'सॅनिटाइज्ड' एडिशन किंवा व्हर्जन. का, तर म्हणे काँग्रेसच्या 'सत्य आणि अहिंसेच्या राजकारणामध्ये हिंसेला, म्हणजे क्रांतीला स्थान नाही.'' ''मग टिळक कोण होते?'' उत्तर मिळाले, ''त्यांना शेवटपर्यंत काँग्रेस अध्यक्ष कोठे होता आले?'' फत्तेसिंहराव काँग्रेसचे खासदार होते. मी ते काम चक्क नाकारले. एवढे धडधडीत असत्य लिहायचे तेही 'सत्यमेव जयते' म्हणणाऱ्या स्वराज्यामध्ये? माझ्या स्वभावाच्या ते विरुद्ध होते.

३) **मिस्टर रणजितसिंहराव** (राज्यावर कधीच आले नाहीत.) एकदम सरळ आणि सज्जन गृहस्थ आणि कलावंत. व्यक्तिचित्रण उत्तम रीतीने सादर करणारा चित्रकार (पोर्ट्रेट पेंटर) आणि शास्त्रीय संगीत गायक. काँग्रेस पक्षाच्या दबावाखाली आणि पूर्वजांच्या कीर्तीमुळे दोनदा खासदार म्हणून निवडून आले. शंकरसिंग वाघेलांनी भाजपमध्ये आलात तर मुख्यमंत्री करू असे जबरदस्त आश्वासन दिले होते, पण यांनी सांगितले, ''मला काँग्रेस सोडायची नाही.'' त्यांनी हो म्हटले असते तर 'द ज्यूर' हे मुख्यमंत्री व 'द फॅक्टो' मुख्यमंत्री शंकरसिंग आज राज्य करत असते. विठ्ठलराव गाडगीळ आणि माझ्या अथक परिश्रमामुळे त्यांच्या पणजोबांचे म्हणजेच सयाजीरावांचे टपाल तिकीट राजीव गांधी यांनी लक्ष्मीविलास राजमहालाच्या दरबार दिवाणखान्यामध्ये (हॉल) प्रकाशित केले. गुजराथ काँग्रेसचे अध्यक्षपद भूषवण्याची त्यांची फार इच्छा होती; पण गुजराथी-मराठी वादामुळे ते शक्य झाले नाही. त्यांचा सुपुत्र राजमहालामध्ये 'गोल्फ क्लब' चालवतो. लोककल्याणामध्ये त्यांना रस नाही. सध्या त्यांचा सारा वेळ कोर्टकचेऱ्यांमध्ये जातो. संग्रामसिंह या भावाला मालमत्तेमधील हिस्सा पाहिजे! या कलावंत आणि गायक राजाला न्यायालयातील वातावरण जराही पसंत नाही, पण करता काय? संग्रामसिंहाची पत्नी खूपच महत्त्वाकांक्षी आहे. हाय रे किस्मत, लेकिन तूने पिही नही!

। । ।

# १७



## उपसंहार

भारतीय संस्थानांचा इतिहास बघितला तर साधारणतः संस्थानिकांविषयी भारतीयांना फारसे प्रेम वा आदर दिसत नाही. भारतामध्ये साधारणतः ६०० संस्थाने होती. त्यातील काही तर नगण्य होती. १९४७-४९ या काळात तनखे (प्रिव्ही पर्स) घेणारी संस्थाने २८४ होती. मिलिटरी सॅल्यूट म्हणजे लष्करी मानवंदना मिळणारी राज्ये अशा ८३ संस्थानांना ११ किंवा जास्त तोफांचा मान मिळे. २१ तोफांचा मान हैदराबाद, ग्वाल्हेर, म्हैसूर, कश्मीर आणि बडोदा या संस्थानांना मिळे. अगदी तार्किक दृष्टीने विचार केला, तर जास्तीत जास्त देशद्रोह करणाऱ्यांना इंग्रजांकडून सर्वात मोठा लष्करी मान मिळे (People, Princes and paramadent power, (ed) Robin Jeffrey, OUP, 1978, Appendix, p.389-90). १९३१ मध्ये या मोठ्या संस्थानांची एकंदर लोकसंख्या ७ कोटी होती. गंमत ही की, नानासाहेब पेशवे, जफर आणि रणजितसिंग या तिघा खऱ्या सत्ताधाऱ्यांना हा मान नाकारला गेला. मान त्यांच्या दुय्यम सरदारांना दिला गेला. कालाय तस्मै नमः !

भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या सभासदांना संस्थानांविषयी फारसा विश्वास वा आदर नव्हता. हरिपुरा काँग्रेस अधिवेशनामध्ये प्रथमच संस्थानी प्रजेला नैतिक पाठिंबा आणि सहानुभूती (moral support and sympathy) चा ठराव पारित करण्यात आला. काँग्रेसच्या नावाने संस्थानांमध्ये लोकशाही व्यवस्था असावी, अशी कोणीही चळवळ करू नये, असाही ठराव पारित करण्यात आला. कारण भोपाळ, हैदराबाद, जुनागढ वगैरे मुस्लीम संस्थानिक या जन्मी त्याला होकार देणार नाहीत, हे काँग्रेसवाल्यांना स्पष्टपणे माहीत होते. तशी चळवळ (एप्रिल-जुलै १९३९) भागानगरच्या हिंदू प्रजेने सुरू केली आणि तिला हिंदुमहासभेने पाठिंबा दिला होता. काँग्रेसचा त्या सत्याग्रहास विरोध होता. सत्याग्रहास आणि विरोध? पण तो होता, हे सत्यं आहे.

या पार्श्वभूमीवर बडोदे संस्थान आणि त्याचे तिसरे सयाजीराव गायकवाड हे राज्यकर्ते उठून दिसतात. आज २०१० मध्ये केंद्रीय मंत्री सिब्बल हे सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची गोष्ट करत आहेत आणि एखादी मोठी क्रांती घडवून आणत असल्यासारखे श्रेय उपटू पाहत आहेत. सयाजीरावांनी १०६ वर्षांपूर्वी, म्हणजे १९०६ मध्ये सर्वप्रथम बडोद्यामध्ये (व देशामध्ये) केवळ हा कायदा तर केलाच, पण यशस्वीपणे अंमलातही आणला! त्यांना त्याचे श्रेय द्या ना. पण नाही, चिनी भाषेमध्ये एक म्हण आहे, एक जण खुर्ची तयार करतो आणि दुसरा त्यामध्ये बसण्याचे श्रेय उपटतो!

पंडित नेहरू यांनी स्वातंत्र्य मिळाल्यावर एक समिती स्थापून हिंदी भाषेला राष्ट्रभाषेचा मान जाहीर केला. आज २००९ मध्ये हिंदी भाषा ही नावडत्या राणीसारखी कोपऱ्यामध्ये बसून आहे. लोकसभा असो का राज्यसभा असो, शासनाची आवडती राणी आज इंग्रजीच आहे. या देशामध्ये असे राष्ट्रपती होऊन गेले की, ज्यांना हिंदी भाषासुद्धा नीट येत नव्हती! त्या उलट सयाजीरावांनी १९२६ मध्ये शाळेमध्ये हिंदी ही 'अनिवार्य भाषा' म्हणून जाहीर केली होती आणि ती योजना यशस्वीही झाली होती.

दलितोद्धार, दलितांचे मोफत शिक्षण, त्यांची मोफत वसतिगृहे, मोफत आणि सक्तीचे स्त्रियांना शिक्षण, फार काय ऑलिम्पिकचे खेळ या सर्व बाबतीत सयाजीरावांच्या प्रगतीशील धोरणांविषयी अशीच तुलना करता येईल. आज २०११मध्ये जग बरेच पुढे गेले आहे. मागे वळून पाहताना आपल्याला चार प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतील.

१) सयाजीराव इतर संस्थानिकांपेक्षा वेगळे का होते?

२) अवतारी पुरुष म्हणावे अशी या राजाची योग्यता होती. त्यांच्यामध्ये ही अद्‌भुत शक्ती कोठून आणि कशी आली? आणि इतरांमध्ये ती का येऊ शकली नाही?

३) एवढ्या प्रदीर्घ कारकिर्दीमध्ये सयाजीरावांनी काय काय साधले?

४) त्यांचे आजच्या व्यवस्थापन शास्त्रानुसार 'स्वॉट ॲनलिसीस'

**१) सयाजीरावांचे वेगळेपण**

बडोद्याचा इतिहास वरवर जरी चाळला, तरी असे सहज लक्षात येईल की, सयाजीरावांच्या आधी आणि नंतर बडोदे संस्थानामध्ये सगळा सावळागोंधळ होता, सारा आनंदीआनंद होता. त्याची तुलना फक्त शिवाजी महाराजांच्या आधीच्या काळातील वतने सांभाळणाऱ्या स्वार्थी मराठे सरदारांशी करता येईल. मराठ्यांच्या

या मानसिकतेचा परदेशी मुसलमान राज्यकर्त्यांनी पुरेपूर फायदा उठवला. इंग्रजांनी नेमके तेच केले. सयाजीरावांनी त्याला लगाम घालण्याचा प्रयत्न केला.

१८६३ ते १९३९ म्हणजे पुरी शहात्तर वर्षे आणि ५२ दिवसांची ही त्यांची जीवनयात्रा. लहानशा आणि मागासलेल्या कवळाणे या खेडेगावापासून ते युरोपातील कोणत्याही राजधानीला टक्कर देऊ शकेल, अशा नितांत सुंदर, रमणीय आणि आधुनिक बडोदे शहरापर्यंत, निश्चितता आणि अनिश्चितता, अनुकूलता आणि प्रतिकूलता या दोन बिंदूंमध्ये सदैव हेंदकाळत राहणारी खडतर जीवनयात्रा. अत्यंत कठीण, अत्यंत असुरक्षित, अत्यंत जबाबदारीची आणि अत्यंत गुंतागुंतीची अशी ही जीवनयात्रा. त्यांच्या बरोबरीचे अनेक संस्थानिक आले आणि गेले. संस्थानिक म्हणजे राजा आणि राजा म्हणजे सत्ता आणि संपत्ती यांचे माहेरघर. सत्ता आणि संपत्ती असल्यावर औद्धत्य आणि व्यसनांनी मागे का राहावे? पण काळाच्या उदरामध्ये ते राजेही गेले, त्यांची तथाकथित सत्ताही गेली आणि चंचल लक्ष्मीने त्यांच्याकडे पाठही फिरवली. या सर्वांच्या जीवनयात्रांना एक यात्रा अपवाद ठरली, ती या बडोद्याच्या तिसऱ्या सयाजीरावांच्या अशांत, असामान्य आणि अद्‌भुत जीवनयात्रेची.

राज्यकारभाराच्या, लोकमतांवर योग्य ते नियंत्रण ठेवून सत्ता गाजवण्याच्या बाबतीत सयाजीरावांचा हात धरणारे कर्ते पुरुष इंग्रजी शासनातदेखील बोटांवर मोजण्याएवढे होते. हिंदी संस्थानांमध्ये तर विचारावयास नको. त्यांनी आपल्या प्रजेला भरभरून प्रेम दिले. आपली प्रजा इंग्रजांच्या अमलाखाली असलेल्या हिंदुस्थानी प्रजेपेक्षा जास्त ज्ञानी, जास्त प्रशिक्षित आणि जास्त सुदृढ असावी, हे त्यांचे स्वप्न होते. ते साकार करण्यासाठी त्यांनी अनंत कष्ट उपसले. प्रजेने चांगले लोक पाहावेत, ऐकावेत म्हणजे त्यांना आपणही तसे व्हावे अशी स्फूर्ती मिळेल, अशी त्यांची धारणा होती. म्हणून डॉ० सर्वपल्ली राधाकृष्णन, अहिताग्नी राजवाडे, पांगारकर, शंकराचार्य, ॲनी बेझंट, रवींद्रनाथ ठाकूर, मार्क ट्वेन, रुडयार्ड किपलिंग वगैरे थोर लोकांना त्यांनी व्याख्यानांसाठी बडोदा येथे आपले स्वतःचे पाहुणे म्हणून बोलावले. असा लोकशिक्षणाचा ध्यास असलेला दुसरा संस्थानिक दाखवणे अवघड आहे.

इंदूर संस्थानचे शिवाजीराव होळकर हे सयाजीराव गायकवाडांप्रमाणेच इंग्रजी वसाहतवादाच्या विरोधी होते. इंग्रज रेसिडेंटने त्यांना सतावण्यास सुरुवात केली. ते पहिलवान होते. १९०३ मध्ये त्यांनी रेसिडेंटला मार मार मारले आणि स्वतःची पदच्युती ओढवून घेतली. त्यांच्या वारसाला – तिसऱ्या तुकोजीरावांना – बावला केसमुळे तीच शिक्षा झाली.

या पार्श्वभूमीवर बडोदे संस्थान आणि त्याचे तिसरे सयाजीराव गायकवाड हे राज्यकर्ते उठून दिसतात. आज २०१० मध्ये केंद्रीय मंत्री सिब्बल हे सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची गोष्ट करत आहेत आणि एखादी मोठी क्रांती घडवून आणत असल्यासारखे श्रेय उपटू पाहत आहेत. सयाजीरावांनी १०६ वर्षांपूर्वी, म्हणजे १९०६ मध्ये सर्वप्रथम बडोद्यामध्ये (व देशामध्ये) केवळ हा कायदा तर केलाच, पण यशस्वीपणे अंमलातही आणला! त्यांना त्याचे श्रेय द्या ना. पण नाही, चिनी भाषेमध्ये एक म्हण आहे, एक जण खुर्ची तयार करतो आणि दुसरा त्यामध्ये बसण्याचे श्रेय उपटतो!

पंडित नेहरू यांनी स्वातंत्र्य मिळाल्यावर एक समिती स्थापून हिंदी भाषेला राष्ट्रभाषेचा मान जाहीर केला. आज २००९ मध्ये हिंदी भाषा ही नावडत्या राणीसारखी कोपऱ्यामध्ये बसून आहे. लोकसभा असो का राज्यसभा असो, शासनाची आवडती राणी आज इंग्रजीच आहे. या देशामध्ये असे राष्ट्रपती होऊन गेले की, ज्यांना हिंदी भाषासुद्धा नीट येत नव्हती! त्या उलट सयाजीरावांनी १९२६ मध्ये शाळेमध्ये हिंदी ही 'अनिवार्य भाषा' म्हणून जाहीर केली होती आणि ती योजना यशस्वीही झाली होती.

दलितोद्धार, दलितांचे मोफत शिक्षण, त्यांची मोफत वसतिगृहे, मोफत आणि सक्तीचे स्त्रियांना शिक्षण, फार काय ऑलिम्पिकचे खेळ या सर्व बाबतीत सयाजीरावांच्या प्रगतीशील धोरणांविषयी अशीच तुलना करता येईल. आज २०११मध्ये जग बरेच पुढे गेले आहे. मागे वळून पाहताना आपल्याला चार प्रश्नांची उत्तरे शोधावी लागतील.

१) सयाजीराव इतर संस्थानिकांपेक्षा वेगळे का होते?

२) अवतारी पुरुष म्हणावे अशी या राजाची योग्यता होती. त्यांच्यामध्ये ही अद्‌भुत शक्ती कोठून आणि कशी आली? आणि इतरांमध्ये ती का येऊ शकली नाही?

३) एवढ्या प्रदीर्घ कारकिर्दीमध्ये सयाजीरावांनी काय काय साधले?

४) त्यांचे आजच्या व्यवस्थापन शास्त्रानुसार 'स्वॉट ॲनलिसीस'

**१) सयाजीरावांचे वेगळेपण**

बडोद्याचा इतिहास वरवर जरी चाळला, तरी असे सहज लक्षात येईल की, सयाजीरावांच्या आधी आणि नंतर बडोदे संस्थानामध्ये सगळा सावळागोंधळ होता, सारा आनंदीआनंद होता. त्याची तुलना फक्त शिवाजी महाराजांच्या आधीच्या काळातील वतने सांभाळणाऱ्या स्वार्थी मराठे सरदारांशी करता येईल. मराठ्यांच्या

या मानसिकतेचा परदेशी मुसलमान राज्यकर्त्यांनी पुरेपूर फायदा उठवला. इंग्रजांनी नेमके तेच केले. सयाजीरावांनी त्याला लगाम घालण्याचा प्रयत्न केला.

१८६३ ते १९३९ म्हणजे पुरी शहात्तर वर्षे आणि ५२ दिवसांची ही त्यांची जीवनयात्रा. लहानशा आणि मागासलेल्या कवळाणे या खेडेगावापासून ते युरोपातील कोणत्याही राजधानीला टक्कर देऊ शकेल, अशा नितांत सुंदर, रमणीय आणि आधुनिक बडोदे शहरापर्यंत, निश्चितता आणि अनिश्चितता, अनुकूलता आणि प्रतिकूलता या दोन बिंदूंमध्ये सदैव हेंदकाळत राहणारी खडतर जीवनयात्रा. अत्यंत कठीण, अत्यंत असुरक्षित, अत्यंत जबाबदारीची आणि अत्यंत गुंतागुंतीची अशी ही जीवनयात्रा. त्यांच्या बरोबरीचे अनेक संस्थानिक आले आणि गेले. संस्थानिक म्हणजे राजा आणि राजा म्हणजे सत्ता आणि संपत्ती यांचे माहेरघर. सत्ता आणि संपत्ती असल्यावर औद्धत्य आणि व्यसनांनी मागे का राहावे? पण काळाच्या उदरामध्ये ते राजेही गेले, त्यांची तथाकथित सत्ताही गेली आणि चंचल लक्ष्मीने त्यांच्याकडे पाठही फिरवली. या सर्वांच्या जीवनयात्रांना एक यात्रा अपवाद ठरली, ती या बडोद्याच्या तिसऱ्या सयाजीरावांच्या अशांत, असामान्य आणि अद्‌भुत जीवनयात्रेची.

राज्यकारभाराच्या, लोकमतांवर योग्य ते नियंत्रण ठेवून सत्ता गाजवण्याच्या बाबतीत सयाजीरावांचा हात धरणारे कर्ते पुरुष इंग्रजी शासनातदेखील बोटांवर मोजण्याएवढे होते. हिंदी संस्थानांमध्ये तर विचारावयास नको. त्यांनी आपल्या प्रजेला भरभरून प्रेम दिले. आपली प्रजा इंग्रजांच्या अमलाखाली असलेल्या हिंदुस्थानी प्रजेपेक्षा जास्त ज्ञानी, जास्त प्रशिक्षित आणि जास्त सुदृढ असावी, हे त्यांचे स्वप्न होते. ते साकार करण्यासाठी त्यांनी अनंत कष्ट उपसले. प्रजेने चांगले लोक पाहावेत, ऐकावेत म्हणजे त्यांना आपणही तसे व्हावे अशी स्फूर्ती मिळेल, अशी त्यांची धारणा होती. म्हणून डॉ० सर्वपल्ली राधाकृष्णन, अहिताग्नी राजवाडे, पांगारकर, शंकराचार्य, ॲनी बेझंट, रवींद्रनाथ ठाकूर, मार्क ट्वेन, रुडयार्ड किपलिंग वगैरे थोर लोकांना त्यांनी व्याख्यानांसाठी बडोदा येथे आपले स्वतःचे पाहुणे म्हणून बोलावले. असा लोकशिक्षणाचा ध्यास असलेला दुसरा संस्थानिक दाखवणे अवघड आहे.

इंदूर संस्थानचे शिवाजीराव होळकर हे सयाजीराव गायकवाडांप्रमाणेच इंग्रजी वसाहतवादाच्या विरोधी होते. इंग्रज रेसिडेंटने त्यांना सतावण्यास सुरुवात केली. ते पहिलवान होते. १९०३ मध्ये त्यांनी रेसिडेंटला मार मार मारले आणि स्वतःची पदच्युती ओढवून घेतली. त्यांच्या वारसाला – तिसऱ्या तुकोजीरावांना – बावला केसमुळे तीच शिक्षा झाली.

जोधपूरच्या सर प्रतापसिंहांना त्यांच्या क्षात्रत्वाचा भलताच अभिमान होता. ते बढाई मारत, "मी आधी लढवय्या आहे, मग राजा." ७० व्या वर्षी ते पहिल्या महायुद्धामध्ये आपल्या सैनिकांबरोबर लढले आणि फ्रान्समध्ये त्यांच्या-समवेत खंदकामध्ये राहिले. सयाजीराव कमी शूर नव्हते; पण ते बुद्धीने लढले, स्वशक्तीचे असे वेडे प्रदर्शन त्यांनी कधी केले नाही. जोधपूरच्या सर प्रतापसिंहांना सम्राज्ञी व्हिक्टोरियांच्या सुवर्णजयंतीच्या निमित्ताने लंडनला बोलावणे आले. इतर राजांनाही तसे आमंत्रण होते. ते सॅव्हॉय, क्लॅरिज किंवा तत्सम महागड्या हॉटेलांमध्ये उतरत. सर प्रताप हट्टून बसले, "मला बकिंगहॅम राजवाड्यामध्येच उतरायचे आहे. उद्या मी काही कारणाने राणीला माझ्याकडे आमंत्रण दिले, तर राणी माझ्याच राजवाड्यामध्ये उतरेल ना? मग मी इतरत्र हॉटेलमध्ये का म्हणून उतरू?" राणीच्या अधिकाऱ्यांसाठी सर प्रताप विनोदाचा विषय होऊन बसले.

याउलट, सयाजीरावांनी विवेक कधी सोडला नाही. त्यांच्यावर छळाचे, दुःखाचे, कपटाचे काही कमी प्रसंग आले नाहीत. पण प्रत्येक वेळी त्यांनी विवेक न सोडता, ते त्यातून सहीसलामत बाहेर सुटत. एकच अपवाद म्हणजे नामदार गोखले यांनी त्यांना स्वतःच्या मनाविरुद्ध इंग्रज सरकारची माफी मागावयास लावली.

काठेवाडातील (सौराष्ट्र) संस्थानिकांच्या कर्तृत्वाविषयी काय लिहावे? जुनागढच्या नबाबाचे छंद दोनच (१) काफरांच्या सोमनाथ मंदिराचा विध्वंस करणे. मुंबईतला पहिला हिंदू-मुसलमान दंगा (१८९३) त्यावरून सुरू झाला होता. इंग्रज पोलिसांना दंगा करणाऱ्या मुसलमानांविरुद्ध तोफा चालवाव्या लागल्या होत्या. (२) कुत्रा कुत्रींची लग्ने लावणे. तेही मोठ्या समारंभाने.

**२) ऊर्जेचा उगम** – सयाजीरावांनी आयुष्याची सुरुवात केली, ती अगदीच छोट्याशा गावात. तेथे त्यांनी एकदम खुजी माणसे पाहिली. त्यांचे लहानसे संसार, लहान आकांक्षा, लहान ध्येये आणि लहान जीवनयात्रा. ते बडोद्यामध्ये आले आणि त्यांना आभाळाएवढी उंच माणसे दिसू लागली. त्यांना ज्यांनी निवडले, ज्यांनी त्यांचा हात पाहिला, कुंडली तयार केली, आपल्याला राजा केले, त्यांनी स्वतःसाठी काही मागितले नाही आणि स्वतःसाठी हे कार्य केले नाही. मग कोणासाठी ही खटपट केली? बडोद्याच्या प्रजेसाठी. कोण ही प्रजा? त्यामध्ये त्यांचे कोणी सगेसोयरे नव्हते. मग हा सारा खटाटोप कशासाठी? बडोदे राज्य मुसलमानांच्या तावडीमध्ये जाऊ नये म्हणून. आपला हिंदू धर्म टिकून राहावा म्हणून. पूर्वीच्या काळी शिवाजी महाराजांनी असेच कार्य केले होते. कोण हे शिवाजी महाराज? ते नसते तर सारा महाराष्ट्र औरंगजेबच्या सैन्याने मुसलमान केला असता. तो तुकाराम असाच वेडा. त्याला शिवाजी महाराज जडजवाहीर देत होते, पण तो मोह त्याने नाकारला. राजाचे

गुरू व्हायचा मान आयता मिळत होता, पण त्याने शिवाजी महाराजांना समर्थ रामदासांकडे धाडले. हे समर्थही अवलिया, म्हणे दास डोंगरी राहतो. या लोकांना कसलीच भीती वाटली नाही. अगदी औरंगजेबाची सुद्धा नाही. त्यांचा एकच ध्यास, हिंदूंचे स्वतंत्र, सार्वभौम राज्य स्थापणे. काही ब्राह्मणांनी अडथळे निर्माण केले, शूद्र म्हटले. त्यांच्या डोक्यावर टिच्चून समर्थांकरवी काशीचा गागाभट्ट ब्राह्मण मागवला आणि आपला राज्याभिषेक करवला. (संदर्भ) राजाचे गुरू सुद्धा त्या सोहळ्यात सामील झाले नाहीत. कसली ही आभाळाएवढी प्रचंड माणसे. आपल्याला अशी माणसे मिळतील का? स्वतःपेक्षा श्रद्धेवर, कर्तव्यावर, कार्यावर जास्त प्रेम करणारी, त्यासाठी प्राण पणाला लावणारी.

सुदैवाने सयाजीरावांना तशीच माणसे भेटत गेली. स्वातंत्र्ययुद्ध हारलो तरी पुन्हा लढण्याची, पुन्हा जिंकण्याची धमक राखणारे नानासाहेब, रंगो बापूजी, तात्या टोपे, केशवानंद, स्वामी दयानंद, त्यांचे भक्तगण सारे तत्त्वनिष्ठ. स्वतःसाठी नाही, पण लोकांसाठी जगणारे. स्वदेश आणि स्वधर्मासाठी प्राण देणारे. आपण त्यांच्या तुलनेमध्ये किती लहान आहोत, ते समज आलेल्या सयाजीस कळू लागले. इलियट सर स्वतः इंग्रज असूनदेखील इंग्रजांच्या हावरेपणावर, अधाशीपणावर टीका करणारा हा आदर्शवादी आयरिश इलियट. त्याने आपल्याला अर्थशास्त्राचे धडे दिले. आपल्या पूर्वजांनी अर्थशास्त्राच्या अज्ञानामुळे सुरत, भडोच आणि अहमदाबाद कसे इंग्रजांच्या हवाली केले! तथाकथित आणि आपला गुरू इंग्रजांना खुष करण्यासाठी, त्यांचे हित सांभाळण्यासाठी कसा चमचेगिरी करतो. इलियटने देशभक्त आणि देशद्रोही मंडळींमधील हा भेद आपल्याला शिकवला. स्वतःला सांभाळून असणारे आणि स्वतःच्या सुखदुःखाची पर्वा न करणारे यांच्यातील भेद असलेल्यांना आपण कसे सांभाळून घ्यायचे, त्यांच्या घरच्या मंडळींच्या सुखदुःखात कसे भागीदार व्हायचे, तो राजधर्म शिकवला. पुण्याची ती थोर मंडळी. काय अडले होते त्या सार्वजनिक काकांना बडोद्याला येऊन मल्हाररावांना मदत करायची? ते रानडे, ते गोखले, ते टिळक, ते आगरकर. सरकारी नोकरीमध्ये न शिरता टिळकांनी शाळा सुरू केली, महाविद्यालय काढले, 'केसरी'चे प्रकाशन सुरू केले. फक्त लोकसेवा; पण त्यासाठी जबरदस्त निर्भीडपणा लागतो. केल्याने होत आहे रे। आधी केलेची पाहिजे॥ टिळकांचा कोर्टातला निर्भीडपणा आपल्याला अतिशय भावून गेला. कोर्टामध्ये टिळकांवर एक एक आरोप होत होते आणि टिळक शांतपणे "हा राजद्रोह नाही" असे उत्तर देत होते. चिडून न्यायमूर्ती कर्झनने विचारले, "मग तुमच्या मते राजद्रोह कशाला म्हणतात?" तेवढ्याच शांतपणे कर्झनला त्यांनी उत्तर दिले, "आपण महाशयांनी आयरीश क्रांतीविरुद्ध केलेल्या भाषणांना."

३) **सयाजीरावांच्या सिद्धी** – त्या अनेक क्षेत्रात अनेक आहेत आणि त्या त्या विषयाच्या अनुषंगाने इतरत्र आल्या आहेतच; पण थोडक्यात अतिमहत्त्वाच्या सिद्धी खालीलप्रमाणे

**अ) राजकीय**

१. दादाभाई नवरोजींना लंडनमध्ये मजूर पक्षाचे खासदार केले.
२. श्यामजी वर्मा यांना इंडिया हाऊस मिळवून देण्यामध्ये मदत केली.
३. इंडिया हाऊसमधील क्रांतिकारकांना गुप्त मदत देणे.
४. टिळकांना गायकवाड वाडा भेट देणे.
५. बरोडा-बर्लिन करार.

आ) सामाजिक

१. प्रजेचे सतत प्रशिक्षण.
२. लाचलुचपतीचा रोग आटोक्यामध्ये आणला.
३. चारित्र्यसंवर्धनावर भर.
४. तेवढेच महत्त्व शारीरिक शिक्षणाला. माणिकराव आखाडा, ना० गु० तालीम, गुजराथ क्रीडा मंडळ आणि हिंद विजय जिमखाना यांना राजाश्रय दिला.
५. दंडनीती, गुन्हेगारांना माफी नाही, कुटुंबीयांना देखील. फुकट्या मराठे सरदारांची वतने नष्ट केली आणि त्यांना लष्करामध्ये नोकऱ्या दिल्या.

**इ) धार्मिक**

१. पाठशाळा आणि तेथील संशोधनाला उत्तेजन.
२. साऱ्या देशातून हजारो पोथ्या जमविल्या आणि त्यांचे जतन केले.
३. शूद्र का क्षत्रिय हा वाद शिताफीने संपवला.
४. गुणांना मदत, जातीला नाही.
५. ओरिएंटल इन्स्टिट्यूट.

**ई) शैक्षणिक**

१. मोफत आणि आवश्यक प्राथमिक शिक्षण.
२. दलितांसाठी मोफत शिक्षण, पुस्तके, वसतिगृहे वगैरे.
३. डॉ० आंबेडकर, डॉ० केतकर वगैरेंना परदेशी शिक्षण, शिष्यवृत्त्या.
४. स्त्रीशिक्षण मोफत आणि अनिवार्य (कंपल्सरी).

५. कोठल्याही मराठा जातीच्या तरुणाला फुकट मराठा वसतिगृह आणि मोफत महाविद्यालयीन शिक्षण. महाराष्ट्र राज्याच्या पहिल्या मंत्रिमंडळातील अर्धे मंत्री (चव्हाणांसकट) या सयाजी मराठा वसतिगृहाचे विद्यार्थी होते.
६. ख्रिस्ती धर्मप्रचारकांना शैक्षणिक क्षेत्रामध्ये मज्जाव. ती पोकळी आर्य-समाजाने भरून काढली. हे धोरण इतरांनी स्वीकारले असते तर?

| मुद्दा | १८८१ | १९३९ |
|---|---|---|
| इंग्रजी शाळा | १३ | १२८ |
| मराठी/गुजराती शाळा | २०४ | २४१४ |
| ग्रंथालये | १ | १५०४ |
| सहकारी संस्था पतपेढ्या | ० | ११२५ |
| ग्रामपंचायती | ० | २१०४ |
| नगरपालिका कसब्यात | २६ | ४१ |
| रेल्वे मार्ग (मैल) | ६० | ७२३ |

**४) स्वॉट मूल्यमापन** – स्वॉट म्हणजे स्ट्रेंग्थ - विकनेस - ऑपॉर्च्युनिटीज आणि थ्रेटस. ताकद, कमजोरी, संध्या - धोके यांच्या आद्याक्षरांचा वापर करून, त्या चरित्र नायकाच्या एकंदर जीवनाचे आणि कर्तृत्वाचे मूल्यमापन (ॲनलिसीस) करणे.

**अ) बलस्थाने** (Strength)– सुरुवातीपासून महाराजांची तब्बेत उत्तम होती. सत्तेवर आल्यावर एवढी कामे असून सुद्धा सकाळी ते व्यायाम करत, कुस्ती खेळत आणि रोज घोड्यावरून २० मैल रपेट करत. आठवड्यातून एकदा डबका गावी डुकराच्या शिकारीसाठी लेफ्टनंट जनरल जे० रिचर्डसन यांच्याबरोबर त्यांना जावे लागे. भारतीय लोक आळशी, बेशिस्त आणि संघटनेचे मोल न समजणारे असतात, असे त्यांच्या डोक्यात त्यांच्या गोऱ्या मास्तरांनी भरवून दिले होते. साहजिकच आपण तसे नाही, हे त्यांना दाखवणे क्रमप्राप्त होते. त्यासाठी "आपण सारा दिवस काही तरी सतत काम करणारे एक यंत्र बनलो होतो" (गायकवाड, फत्तेसिंहराव सयाजीराव, पृ० १३४), असे खुद्द महाराजांनीच लिहून ठेवले होते. आपले राज्य आपण संपूर्णपणे पाहिले नाही, तर आपल्याला निरनिराळ्या जिल्ह्यातील लोक, त्यांच्या आगळ्या वेगळ्या चालीरीती आणि आवडीनिवडी व त्यांची सांपत्तिक परिस्थिती आणि समस्या समजणार कशा? त्यांचे ज्ञान नसेल, तर त्या लोकांवर आपण राज्य कसे करणार? त्यासाठी महाराजांना रेसिडेन्सिनेच सर्टिफिकेट दिले होते. महाराज निलगिरीस जातात. आम्हाला वाटले ते मजा मारण्यासाठी तेथे

जातात. तेथे पाहिले तर बडोद्यापेक्षाही ते जास्त काम करतात. (गायकवाड फत्तेसिंहराव, 'सयाजीराव' (इंग्रजी) पृ० १३४).

भारताच्या तत्कालीन सर्व संस्थानिकांमध्ये लोकमान्य टिळक यांनी सयाजीरावांचीच निवड आपल्या देशकार्यासाठी का केली असावी?

(१) **पार्श्वभूमी** – योगींद्र दयानंद, ब्रह्मानंद आणि त्यांचे चेले केशवानंद, स्वामी दयानंद, स्वामी टहलानंद वगैरे १८५७च्या स्वातंत्र्ययुद्धाशी संबंधित असलेल्या राष्ट्रवादी वीरांचा सयाजीरावांशी प्रत्यक्ष संबंध आला होता. इतर कोणत्याच संस्थानिकाला अशा राजकीय आणि म्हटले तर धार्मिक पार्श्वभूमीचे भाग्य लाभले नव्हते. इंग्रजांशी झुंजणाऱ्या या वीर मंडळींना आज गुप्तपणे कसे जगावे लागत आहे, थोर त्याग करून देखील माणसाच्या कपाळी लिहिलेले नसेल, तर उपहास आणि अज्ञातवास कसा भोगावा लागतो, याचे प्रत्यक्ष प्रशिक्षण सयाजीरावांना लाभले होते. त्यानुसार त्यांच्या मनाची जडणघडण झाली होती. त्यामुळे इतर राजेरजवाड्यामध्ये सयाजीरावांसारखा जाज्वल्य देशाभिमान, ज्ञानलालसा आणि प्रजेचे हितरक्षण व संवर्धन कोठून दिसणार?

(२) **संपर्क** – त्या काळी दळणवळण सोपे नव्हते, संदेश वहन जवळजवळ नव्हतेच आणि असलेच तर इंग्रजांचे संपूर्ण नियंत्रण असलेले (उदाहरणार्थ तार खाते) होते. लोकमान्यांना आपले विश्वासू सहाध्यायी बडोदा येथे नोकरीसाठी ठेवणे आणि त्यांच्यामार्फत सयाजीरावांशी सतत संपर्क ठेवणे एवढे सोपे नव्हते. लोकमान्यांचे मत आठवड्यातून दोनदा 'केसरी'मधून प्रकट होई. केसरीमध्ये नियमितपणे बडोद्याविषयी लिहिणारे अनामिक वार्ताहर आणि मत प्रदर्शन करणारे लेखक बडोद्यामध्ये होते. सयाजीरावांना 'केसरी' हा सच्चा मार्गदर्शक आणि जागरूक पहारेकरी वाटे!

**आ) दुर्बलस्थाने - कमजोरी** (Weakness)– सयाजीराव परमेश्वर नव्हते, मानव होते. त्यांच्याही हातून चुका झाल्या; पण पहिल्या चुकीची पुनरावृत्ती त्यांनी कधीच होऊ दिली नाही. तो त्यांच्या प्रशिक्षणाचा एक भाग होता. अगदी सुरुवातीला ते नवखे होते, नवीन होते. त्यामुळे बरेचसे बावरलेले होते. वडिलधाऱ्या मंडळींचा साहजिकच त्यामुळे वरचष्मा होता. १८८६ मध्ये पहिल्या युरोपच्या भेटीमध्ये त्यांना पंचावन्न मंडळींना न्यावे लागले. त्यात मानकरी, एडीसी, पुरोहित, शागीर्द, शिंपी, न्हावी, पाणके, कपडे काढून ठेवणारा व्हॅले आणि सर्वांत कळस म्हणजे शुद्ध दुधाच्या पुरवठ्यासाठी गायींदेखील होत्या! ह्या सर्व मंडळींना 'आवश्यक' म्हणून लोणचे, पापड, हिंग, जिरे वगैरे पदार्थसुद्धा घेतले होते. बऱ्याच बडोदेकरांना महाराजांचे लंडनला जाणे शिवाजी महाराजांच्या आग्रा येथील

औरंगजेबाच्या भेटीसारखे वाटले. महाराज सुखरूप परत येईपर्यंत त्यांनी आपले देव पाण्यात बुडवून ठेवले होते!

सिंधूबंदीच्या अंधश्रद्धेमुळे सयाजीरावांची परतल्यावर शुद्धी करणे अटळ होते. त्या दौऱ्याचा फायदा त्यांनी जरूर करून घेतला. एवढी मोठी सर्कस सांभाळायची म्हणजे प्रत्येकाचे मन ओळखून त्यांचे योग्य व्यवस्थापन करणे, त्यांच्या अंधश्रद्धा का आणि कशा चुकीच्या आहेत, ते त्यांना समजावून देणे व मुख्य म्हणजे परदेशी थंड हवेमध्ये त्यांच्यावर प्रभुत्व गाजवून त्यांच्या तब्येती आणि मर्जी सांभाळणे.

सुरुवातीला त्यांची तब्येत ठणठणीत होती; पण इंग्रज अधिकाऱ्यांशी लपंडाव खेळत असताना त्यांच्या मनावर अतोनात ताण पडे. त्यांचे मित्र आणि हितशत्रू उलटसुलट बोलत व परस्परविरोधी सल्ले देत. त्यामुळे त्यांच्या मनामध्ये गोंधळाचा हलकल्लोळ माजे आणि बरेच वेळा त्यांचा जीव मेटाकुटीला येई.

सहकाऱ्यांना, लोकांना आणि आप्तमंडळींना सुधारणेचा मार्ग समजावून देताना महाराजांना धर्मशास्त्राचा आधार आणि संदर्भ द्यावा लागला. पौर्वात्य आणि पाश्चिमात्य धर्मशास्त्रांचा अभ्यास असलेल्या शास्त्री पंडितांशी मैत्री करून, त्यांचा सल्ला घेणे इष्ट आणि फायदेशीर ठरू शकते, असे पाहिल्यावर, अशा मंडळींच्या सहवासामध्ये महाराज सतत राहू लागले. त्यामुळे स्वजातीयांचा रोष त्यांना पत्करावा लागला. अर्थात त्या रोषाची त्यांनी कधी पर्वा केली नाही. लायकी नसलेल्या, पण स्वजातीय मंडळींना आर्थिक साहाय्य नाकारल्यामुळे 'हेकेखोर', 'चिक्कूमारवाडी', 'हुकूमशहा', 'भटाळलेला', 'बामणांनी आख्खाच्या आख्खा गिळलेला', 'बाटलेला', 'युरोपमध्ये जाऊन गोऱ्या मडमांशी खेळणारा' वगैरे विशेषणांचा त्यांना नाइलाजाने स्वीकार करावा लागला. बाईबाटली त्यांना वर्ज्य होती. केवळ तत्त्वांसाठी आणि स्वातंत्र्यलालसेच्या इच्छेपोटी असे शिव्याशाप स्वीकारणे म्हणजे एक प्रकारचे अग्निदिव्य होते. ते खोडून काढण्यासाठी त्यांच्याजवळ नव्हता वेळ, ना रस. विलीयर्स प्रकरण, कर्नल बिडुल्फचा अहवाल, बिडुल्फ (इंग्रज) आणि इलियट (आयरीश) या दोघांची दुश्मनी व त्यातून उद्भवलेले बापट प्रकरण आणि प्रतापसिंह या नातवाचे डेक्कन कॉलेज पुणे येथील उच्छृंखल वागणे, ही सारी सयाजीरावांची दुर्बलस्थाने होती; पण अत्यंत धीराने, शांतपणे आणि गंभीरपणे ही प्रकरणे त्यांनी शिताफीने हाताळली. तेवढ्याच चलाखीने त्यांनी लंडनमधील एक कुभांड हाताळले. बेट्रिस स्टॅथम आणि तिचा नवरा यांनी सयाजीरावांना एका लैंगिक लफड्यामध्ये तेही लंडनमध्ये अडकवण्याचा प्रयत्न केला. दोघांचे गुप्त हेरांबरोबर सूत होते. अर्नेस्ट इर्मन्युअर स्टॅथमने महाराजांना धमकावले, "एक लाख पौंड द्या. नाही तर 'लंडन टाइम्स'मध्ये तुमचे

माझ्या बायकोबरोबर लफडे आहे, असा मजकूर मी छापून आणेन." महाराजांनी तेथील वकिलांचा सल्ला घेतला. त्यानंतर त्यांनी अर्नेस्टला सुनावले, "तुला जे काही वाइटात वाईट करावयाचे असेल ते कर." (Do your worst). अर्नेस्टने लंडन टाईम्समध्ये सयाजीरावांची बदनामी केलीच; पण त्यानंतर सयाजीरावांनी इंग्रज बादशहाचा दिल्ली दरबारामध्ये अपमान केला. ते प्रकरण एवढे गाजले की, अर्नेस्टच्या बदनामीला कोणी भाव दिला नाही. उलट राष्ट्रवादी वर्तुळामध्ये सयाजीरावांचा जयजयकारच झाला (गायकवाड फत्तेसिंगराव, 'सयाजीराव', पृ० २४८-४९).

या स्वजातीयांमध्ये इतर राजांशी त्यांची तुलना होई आणि त्यांच्या तुलनेमध्ये ते बुजरे, जुन्या विचारांचे, धैर्य नसणारे आणि 'चालूगिरी' करण्यामध्ये असमर्थ ठरत. त्यामुळे वेळ बरबाद करणाऱ्या असल्या संस्थानिकांना आणि त्यांच्या अवतीभवती वावरणाऱ्या सामाजिक फुलपाखरांना ते चक्क टाळीत!

महाराजांचे जीवन म्हणजे अडथळ्यांची शर्यत होती. एक अडथळा संपला की दुसरा वाटच पाही. ही शर्यत तीन वर्तुळात चाले. पहिल्या म्हणजे संस्थानाच्या हद्दीतील वर्तुळात गोरा रेसिडेंट, त्याचे ब्रिटिश धार्जिणे अधिकारी आणि गुसहेर त्यांना चुकवावे लागत. ते झाले परकीय लोक. स्वकीयांमध्ये दुखावलेले आप्त आणि अधिकाऱ्यांचा समावेश असे. तब्येतीचे निमित्त करून महाराज बराच काळ युरोपमध्ये राहात. त्यामुळे स्वजनांचे आपापसांतील हेवेदावे, मारामाऱ्या, शिव्याशाप अनुभवण्याचे प्रसंग कमी येत. चिडून काही स्वजन त्रागा करत, शत्रूपक्षास मिळून चहाड्या करत आणि प्रसंगी महाराजांचे नुकसान देखील करत. यासाठी म्हणजे संकट विमोचनासाठी नेने आणि माने या दोघा बड्या अधिकाऱ्यांचा ते उपयोग करत. नेन्यांजवळ कृष्णराव मराठे नावाची एक अजब वल्ली होती. बडोदा वत्सल प्रेस नावाचा त्यांचा छापखाना होता. कोणाच्याही घरात त्यांचे स्वागत असे. त्यांच्या कोटाच्या एका खिशामध्ये पेपरमिंटच्या गोळ्या आणि दुसऱ्या खिशामध्ये चॉकलेटस असत. आमच्या घरी आम्ही लहान भावंडे तर त्यांची आतुरतेने वाट पाहत असू. तीच गत इतरत्र. नेने त्यांना अनधिकृत 'बडोद्याचे गॅझेट' म्हणत. त्यांची माहिती अचूक आणि साधार असे. बडोतल्या बडोद्यात संकट विमोचनासाठी कृष्णराव मराठ्यांना बरेचसे श्रेय द्यावे लागेल. दुसरे आणि तिसरे वर्तुळ म्हणजे भारत व भारताच्या बाहेरचे जग.

बऱ्याच उत्तर वा मध्य भारतीय संस्थानिकांना सयाजीरावांच्या लोकप्रियतेचा हेवा वाटे. त्या असूयेपायी त्यांचे नाक कसे कापता येईल, त्या संधीची ते वाटच पाहत असत. त्या दृष्टीने सयाजीराव वारले अशा खोट्या बातमीनंतर आलेल्या

सांत्वनाच्या पत्रांचा आणि संदेशांचा (तसेच टाईम्स-सारख्यांच्या संपादकीयांचा) अभ्यास केला, तर दांभिकतेचा एक प्रबंधच निर्माण होईल! इंग्रजनिष्ठ राजपूत, शीख आणि मुसलमान संस्थानिक महाराजांचे क्रांतिकारकांना मदत करण्याबाबतचे धोरण कसे वेडेपणाचे आहे आणि इंग्रजी राज्य कसे सुखासमाधानाचे आहे वगैरे फुकटचा सल्ला, वेळ आली की मोठ्या (म्हणजे खोट्या) आदरभावाने द्यायची संधी सोडत नसत! महाराजांना त्या वेळी मिर्झाराजे जयसिंग यांची आठवण होई. राजेपण म्हणजे लूटमार करण्याची सुवर्णसंधी, अशी समजूत असणाऱ्या गोऱ्या भाडोत्री बायकांना सयाजीरावांच्या बाबतीत अपयश स्वीकारावे लागे. इंग्रजांचे हेर त्यांची मदत घेऊन, त्यांच्या तोंडी त्यांच्या कानांना संगीत वाटतील असे शब्द वा वाक्ये वदवून घेत. परराष्ट्रामध्ये रुझवेल्ट असो, मुसोलिनी असो, हिटलर असो, जपानचा सम्राट असो किंवा मुस्लीम लीगचा खरा संस्थापक आणि संवर्धक आगाखान असो, महाराजांचा सर्वच वर्तुळामध्ये प्रवेश असे. अशा भेटींमधून ब्रिटिश साम्राज्यशाहीची लक्तरे महाराजांना आपोआप ऐकावयास मिळत. महाराज उत्कृष्ट श्रोते होते. गुणीजनांची गाऱ्हाणी ऐकताना ते थकत नसत.

**इ) संधी** (Opportunities)–

१) योग्य वेळी योग्य माणसे मिळणे.

२) योग्य वेळी लीळीळी निर्माण होऊन त्याचा फायदा महाराजांना मिळणे.

३) महाराजांना हाती संपूर्ण सत्ता मिळणे.

४) चांगले शिक्षक योग्य वेळी मिळणे.

५) नर्मदा-विश्वामित्री मुळामुठा अळी.

६) अरविंद, इलियट आणि टिळकांसारख्यांचे मार्गदर्शन.

७) विदेश यात्रांची संधी.

८) Invitation to be Chief Guest on various occasion by various institutes here and abroad including सर्वधर्मसंमेलन in Chickgo.

९) नशिबाची साथ.

१०) दोन विश्व महायुद्धे.

**ई) भयस्थाने** – (Threats) – अडथळा निर्माण करणारी वर उल्लेख केलेली सर्व मंडळी महाराजांना स्वदेशामध्ये आणि परदेशामध्ये धोकादायक होती. भयस्थानामध्ये जवळची आप्तमंडळी कशी मजेदार वागत, त्याची काही उदाहरणे सांगण्यासारखी आहेत.

१) एका जवळच्या बंधूंनी स्वतःचा बंगला बांधला. मुद्दामच त्याचे प्रवेशद्वार छोटे ठेवले आणि त्यावर कमान बांधली. असे करण्यामागे त्यांचा शुद्ध हेतू हा होता की, "तू भले जगात श्रेष्ठ राजा असशील; पण मला भेटायला यायचे असेल, तर तुला माझ्याकडे वाकूनच यावे लागेल."

२) सरदार राजेशिर्के बडोद्यामध्ये मोठे प्रस्थ होते. खंडेरावांच्या मुलीचा हा मुलगा. खरे म्हणजे मीच बडोद्याच्या गादीवर राजा म्हणून असावयास पाहिजे, असे त्यांना वाटे. सोबतकार ग० वा० बेहेरे आणि ह० वि० कामत यांची ओळख करून देण्यासाठी (खरे म्हणजे करमणूक करून देण्यासाठी) मी त्यांना घेऊन त्यांच्या बंगल्यावर गेलो. सयाजीराव कसे चुकले व मी राजा असतो तर काय केले असते, हे पुराण त्यांनी दोन तास या पाहुण्यांना ऐकवले. उदाहरणार्थ "सयाजीरावांनी रेल्वेचे जाळे निर्माण केले, मी रस्ते बांधून बसेस सुरू केल्या असत्या." "सयाजीरावांनी आजवा सरोवर निर्माण केले, मी कालवे बांधून नर्मदेचे पाणी बडोद्यामध्ये आणले असते," इत्यादी. सयाजीरावांनी बडोद्याचे लंडन बनवण्याचा प्रयत्न केला. आपण राजे असतात तर बडोद्याचे पॅरिस झाले असते, असा नवा मुद्दा देऊन, माझ्या पाहुण्यांनी राजेशिर्के यांचा निरोप घेतला.

३) शंभरएक गायकवाड बडोद्यामध्ये इनामदार होते. सयाजीराव महाराजांचे आप्त हे त्यांचे एकमेव बलस्थान. फुकट खायची जन्मभराची सवय. गुंडगिरी हा एकमेव उद्योग. त्यांना गायकवाड महाराजांनी फौजेमध्ये नोकरीवर 'चिकटवले'. अर्ध्यांनी नोकरी स्वीकारली, तर अर्धे म्हणाले, "आम्ही शाळेत जाणार नाही. आम्ही भीक मागून खाऊ, पण फौजेत नोकरी करणार नाही." सयाजीरावांनी नोकरीसाठी अक्षरओळख असणे आवश्यक मानले होते. हे सारे अंगठाछाप होते. त्यातील एक जण आज चहाची टपरी चालवतो. माझा एक बोहरी पेशंट सांगतो, "माझ्या वडिलांचे दांडिया बाजारात किराणा मालाचे दुकान होते. या अंगठाछाप सरदारांना 'हां सरकार!' असे म्हणत माझ्या वडिलांनी खूप लुटले. त्यांची पद्धत होती दिवाळीला त्यांच्याकडून वार्षिक बिल घ्यायची. बिल तपासायला त्यांना जमायचे नाही. त्यामुळे आमची दिवाळी छान साजरी केली जाई!"

। । ।

# १८



## परिशिष्टे

**१. सयाजीरावांचे दत्तक प्रकरण** – काही गोष्टी माहीत असल्या तरी राजाला त्रास होईल म्हणून त्या बोलायच्या नसतात, असा सुज्ञ आणि विवेकी लोक विचार करतात. म्हणून माणिकरावांनी लिहून ठेवले आहे. ''महाराज गादीवर कसे आले, हा इतिहास देखील मोठा मनोरंजक आहे. परंतु आज तो आपला विषय नसल्याने त्यावर पडदाच राहू देणे इष्ट आहे''(माणिकराव, सयाजी गौरव ग्रंथ, पृ० ४६१). खंडेरावांनी बडोद्याचे इस्लामीकरण एवढ्या मोठ्या प्रमाणावर आणि एवढ्या वेगाने केले की, काही त्रस्त विचारवंत उठून बसले आणि हे प्रकरण हाताबाहेर जायच्या आधी याला आळा घातलाच पाहिजे, असे त्यांनी ठरवले. या विचारवंतांमध्ये दादासाहेब मुजुमदार, तात्यासाहेब नेने, नानाशास्त्री चिपळूणकर वगैरे मंडळी होती. त्यांनी हात आणि कुंडली पाहून एक तरतरीत, हुशार आणि बीस वर्षांचा खेडवळ मुलगा शोधून काढला. चिपळूणकर मूळ त्र्यंबकेश्वरचे. खूप मेहनत घेऊन त्यांनी हा मुलगा जुन्या गायकवाडांच्या वंशावळीतलाच आहे, याचे पुरावे गोळा केले. त्याचे नाव गोपाळ तथा सयाजीराव. या कारस्थानी मंडळींना सयाजीरावांनी भरपूर देणग्या दिल्या. चिपळूणकरांना ती रक्कम कमी वाटली. त्यांनी आपण कटकारस्थान रचून सयाजीरावांना सत्तेवर आणले; पण सत्तेवर येताच राजेसाहेब आम्हाला आणि धर्माला विसरून गेले, अशा अर्थाचा एक २५० पानी ग्रंथ बडोदा वत्सल प्रेसमध्ये छापून घेतला. त्याच्या प्रती व्हाईसरॉय, गव्हर्नर्स आणि महत्त्वाचे राजकीय अधिकारी यांना भेट द्यायचा त्यांचा विचार होता. महाराजांना त्यांच्या हेरांमार्फत चिपळूणकरांचे हे उपद्व्याप समजले. साऱ्या प्रती मागवून चिपळूणकरांकडूनच त्यावर केरोसिन टाकून काडी पेटवली आणि हा ग्रंथ जगातून नाहीसा केला. त्या काळातील प्रथेनुसार त्या ग्रंथाचे मालगाडीप्रमाणे लांबच लांब नाव आहे –

**''बडोदे राज्यातला अविभक्त स्वामित्व संबंध सुमारे ११३ वर्षांपर्यंत अज्ञात असता अभाव स्वरूपावर प्रामाणिक सिद्धान्त घडविल्यामुळे अत्यंत गाडला गेला होता तो उद्धरून कमिशनादिक न्यायासनासमोर बलवत्तर प्रमाणांच्या प्रकाशात**

सिद्ध ठरवीत ठरवीत तुम्हास म्हणजे तुमच्या सर्व वंशजांस दत्तक सहकृत सर्व वंशजांस बडोद्याचे अखंड निष्कंटक राज्य प्राप्त करून दिले यांजविषयी परम प्रत्युपकारार्ह उपकारांचे घेणे.

अपूर्व घेणे, घेणे खरे परंतु मानण्याचे सामर्थ्य नाही.

ज्यास सामर्थ्य नाही त्याचे जर प्रसंगी संरक्षण होईल तर न्यायानेच. (या ग्रंथाची एकुलती एक कॉपी नानाशास्त्री चिपळूणकरांचा नातू यांच्याजवळ आहे. ते गोवा येथे राहतात.)

२. **बरोडा-बर्लिन करार** – बर्लिनच्या ऑलिम्पिकसाठी अमरावतीच्या हनुमान व्यायाम प्रसारक मंडळातर्फे एक संघ युरोपला रवाना झाला. संघाला मदतीची अपेक्षा होती. महाराष्ट्रातील एका राजाने त्यांना एक रक्कम भेट म्हणून दिली; पण सांगितले, ''माझे नाव कोठेही बाहेर येता कामा नये.''

हे लोक बडोदा येथे मदतीसाठी आले. महाराजांनी विचारले, ''सुरुवातीच्या संचलनामध्ये (मार्चिंग परेड) मानवंदना देताना कोणाचा ध्वज वापरणार?'' उत्तर मिळाले, ''युनियन जॅक.'' महाराज म्हणाले, ''तुम्ही बडोदे संस्थानचे प्रतिनिधी म्हणून जा आणि बडोद्याचा भगवा ध्वज बर्लिन शहरी फडकवा.'' बडोद्याचे प्रतिनिधी म्हणून त्या संघाचा जाण्यायेण्याचा सर्व खर्च बडोदा संस्थानाने सोसला. त्याप्रमाणे अध्यक्ष श्री० कृ० काणे, संघटक आणि शिक्षक हरी अनंत असनारे, सचिव खानीवाले, साहाय्यक सचिव डॉ० कल्याणपुरा, मुंबई. हरीसिंग ठाकुर; सुरत. रा० मो० अग्रवाल, एलिचपूर; भ० रा० देशपांडे, अमरावती; नगिदास मेहता, मुंबई; डी० एम० लाड, मुंबई, आणि बडोद्याचे वसंतराव कप्तान व्हेनिस-इटालीच्या मार्गाने त्यांचे पथक २२ जुलै १९३६ ला बर्लिनला पोचले. हिटलरला भगव्या ध्वजाच्या या पथकाने मानवंदना दिली आणि सायंकाळी हिटलरने त्यांना खाना दिला!

अडीच महिन्यांनंतर हे पथक हॉलंड, फ्रान्स या मार्गाने २७ डिसेंबर १९३६ ला मुंबईला परतले. याप्रमाणे युरोप दौऱ्याला अडीच महिने लागले. खेळाडूंच्या या पथकाचा परदेश दौऱ्यावर जाताना अमरावती आणि मुंबई येथे भव्य सत्कार झाला आणि नंतर त्यांना निरोप देण्यात आला. त्या वेळी (टिळक भक्त) दादासाहेब खापर्डे यांनी आशीर्वाद दिला होता. परत आल्यानंतर अमरावती नगरपालिकेमध्ये या पथकाचा सत्कार झाला (अमरावती शहराचा इतिहास पृ० १७०).

सयाजीरावांनी त्यांच्या नेहमीच्या सवयीप्रमाणे आपल्या प्रतापसिंह या नातवाला पत्रामध्ये लिहले, ''ऑलिम्पिक खेळांचे निरीक्षण करण्यात गेला पंधरवडा कसा गेला ते कळलेच नाही. बर्लिनमधील खेळाडूंमध्ये बंधुभाव पाहून त्यांना खूप

भरून आले. त्यांनी पत्रामध्ये लिहिले, ''या तरुण खेळाडूंमधील चांगली स्पर्धा, मैत्री आणि बंधुभाव जर राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर पसरला, तर जगातील तणाव, अडचणी आणि अपसमज दूर होण्यासाठी किती मदत होईल, नव्हे आपल्या साऱ्या समस्याच नष्ट होतील.''

धूर्त महाराज बर्लिनला रीतसर इंग्रज सरकारची परवानगी घेऊन, ऑलिम्पिक खेळ बघण्यासाठी गेले होते. मात्र भगवा झेंडा घेऊन मराठी मुलांची तुकडी, हिटलरच्या प्रेक्षागृहामधील (बॉक्स) बसण्याच्या खास जागेच्या बरोबर खाली सयाजीरावांचे आसन आणि हिटलरने तेथे केलेला सयाजीरावांचा मानसन्मान आणि खास जेवणाचे आमंत्रण या गोष्टी इंग्रज हेरांच्या नजरांना खटकल्याच! त्यामुळेच सयाजीरावांना १९३८मध्ये रशियाचा प्रवास करण्याची परवानगी नाकारली. ऑलिम्पिकनंतर बडोदे राज्यामध्ये शारीरिक शिक्षण आवश्यक करण्यात आले (वसंतराव कसानांनी लेखकाला सांगितलेल्या महाराजांच्या आठवणी). बरोबर तीस वर्षांपूर्वी सयाजीरावांनी इंग्रजांचे राज्य कसे संपुष्टात येईल त्याचे भाकीत केले होते.

"World conditions are bound to change so fundamentally that nothing will be able to save it from total disappearance." (Fatesinghrao Gaekwad, Sayajirao of Baroda, p. 219) सयाजीराव खरोखर प्रेषीत ठरले! कारण ३० वर्षांपूर्वी ते म्हणाले होते, (After we get independence) the first thing to do is to get rid of these rubbishy states. There will never be an Indian Nation so long as there is a Princely Order"(Ibid). सरदार पटेलांनी नेमके तेच केले.

बर्लिन ऑलिम्पिकच्या आधी महाराजांनी आपल्या दूताला (वि० पां० नेने) बर्लिनला धाडून दुसरे महायुद्ध झाल्यास सर्व हिंदू राजे जर्मनीला मदत करतील अशा आशयाची हिटलरशी बोलणी केली होती. ऑलिंपिकच्या खेळांचे निमित्त करून बरोडा-बर्लिन करारावर या दोन नेत्यांनी स्वाक्षरी केली. दुर्दैवाने सयाजीराव मरण पावले. त्या वेळी या राजदूताच्या पत्त्यावर ''ग्रेटली ग्रिव्हड् – अॅडॉल्फ हिटलर'' अशी तार (केबल) देखील आली होती (नेने, म० पां० यांनी सांगितलेल्या आठवणी). त्या तारेमुळे बडोद्यामध्ये खळबळ माजली होती; पण इंग्रज सरकारने ते प्रकरण दडपून टाकले. याच सुमारास बंगाली क्रांतिकारकांनी जीवाचा आटापिटा करून गांधीजींच्या उमेदवारास हरवून सुभाषचंद्र बोस यांना काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडून आणले होते. सुभाषबाबूंनी क्रांतिकारकांना आणि काही निवडक काँग्रेसवाल्यांना एकत्र आणून एक गुप्त बैठक भरवली होती आणि त्यामध्ये इंग्रज

सरकारला एक वर्षाची अंतिम मुदत देण्याची आपली तयारी आहे, असे सांगितले होते. इंग्रजांना त्यांच्या हेरांमार्फत ही बातमी समजली आणि त्यांनी गांधी-नेहरू यांच्यावर दबाव आणून सुभाषबाबूंचे काँग्रेसचे प्राथमिक सभासदत्व रद्द करून त्यांना पक्षाबाहेर काढले; पण सुभाषचंद्रांनी हा क्रांतिकारकांचा अपूर्ण कार्यक्रम (अजेंडा) शेवटी पूर्ण केला!

/ / /

# ११



## सयाजीरावांची काल गणना (क्रोनॉलॉजी)

१८६३ – कवळाणे येथे ११ मार्च रोजी जन्म.

१८७५ – गोपाळाचे दत्तकविधान आणि राज्याभिषेक. (पहा परिशिष्ट)

१८७६ – एफ० ए० एच० इलियट या आयरीश शिक्षकाद्वारे शिक्षण.

१८७७ – स्टेट लायब्ररी (जयसिंगराव) ची स्थापना.

१८८० – सयाजीराव आणि तंजावरच्या चिमणाबाई यांचा विवाह.

१८८१ – पहिले कन्यारत्न, बजूबाई.

१८८१ – वयाची १८ वर्षे पूर्ण. नजरबाग राजवाड्यामध्ये राज्याभिषेक आणि राज्याधिकार आज्ञा पत्रिका (रॉयल ऑर्डिनन्स बुलेटिन) प्रसिद्ध होऊ लागले.

१८८२ – बडोदा कॉलेजची स्थापना.

१८८२ – नजरबाग राजवाड्यामधून मुक्काम मकरपुरा राजवाड्यामध्ये हालवला. सरकारी अजबडी मिलची स्थापना.

१८८३ – राजपुत्र फत्तेसिंगराव यांचा जन्म.

१८८५ – पहिल्या राणीसाहेबांच्या निधनानंतर चिमणाबाई (दुसऱ्या) या द्वितीय राणीसाहेब.

१८८६ – डफरीन (श्री सयाजी जनरल) हॉस्पिटलचे उद्घाटन. बुखारा या बोटीने पहिली युरोपची सहल. महाराणी व्हिक्टोरियांची भेट.

१८८७ – न्यायमंदिर आणि खंडेराव मार्केट यांचा कोनशिला प्रसंग.

१८९० – कलाभवनची सुरुवात.

१८९१ – ग्रामपंचायतची स्थापना.
१८९२ – आजव्याचे पाणी नळाने बडोद्यामध्ये आणले.
इंदिराराजे या राजकन्येचा जन्म.
'सयाजी विजय' या गुजराथी मराठी (द्विभाषिक).
१८९३ – अरविंद घोष बडोद्यामध्ये नोकरी करण्यासाठी येतात.
धैर्यशीलराव यांचा जन्म.
१८९८ – न्यायमंदिर या न्यायालयाची सुरुवात.
१८९९ – छपन्निया दुष्काळ गुजराथेत.
१९०२ – अहमदाबादमध्ये काँग्रेसचे अधिवेशन. तेथे सयाजीरावांचे शेतीच्या उद्योगावर भाषण.
१९०३ – लोकशाहीचा पाया – बडोद्यामध्ये तालुका पंचायतीची सुरुवात.
१९०४ – बालविवाहास बंदी. खंडेराव मार्केट सुरू.
१९०६ – वॉशिंग्टन येथे प्रे० रुझवेल्ट यांची भेट आणि भोजन. बडोद्यामध्ये सर्वत्र मोफत प्राथमिक शिक्षणाची सक्ती (हिंदुस्थानमध्ये सर्वप्रथम). राज्यारोहणाचा रौप्यमहोत्सव;
१९०७ – इंदुमती महाल येथें देवस्थान प्रतिष्ठान.
१९०८ – नातू प्रतापसिंहाचा जन्म. बँक ऑफ बरोडाची स्थापना. पंडित आत्मारामजी (आर्य समाज) यांची दलित शाळांसाठी प्रमुख हणून नियुक्ती.
१९०९ – महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ६ व्या अधिवेशनाचे महाराजांच्या हस्ते उद्घाटन.
१९१० – बडोद्यामध्ये आशियामधील सर्वांत मोठ्या सेंट्रल लायब्ररीची स्थापना. बडोद्यामध्ये अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेचे महाराजांनी उद्घाटन केले.
१९११ – रणोली येथे अखिल आर्यधर्म परिषदेचे महाराजांच्या हस्ते उद्घाटन. लंडन विद्यापीठामध्ये भरलेल्या तत्त्वज्ञान परिषदेचे पहिले अध्यक्ष. दिल्ली दरबारामध्ये महाराजांनी बादशहास पाठ दाखवल्यावरुन गदारोळ आणि गोखले यांनी दबाव आणल्यामुळे महाराजांची लेखी माफी मागणे.

१९१२ – गुजराथी साहित्य परिषदेचे उद्घाटन आणि गौतम बुद्धाच्या पुतळ्याची जपानकडून भेट.

१९१४ – अश्वारुढ पुतळ्याचे उद्घाटन. चिमणाबाई स्त्री उद्योगालयाची स्थापना.

१९१६ – प्रजामंडळाची स्थापना. गायकवाड ओरिएंटल मालेचे प्रकाशन.

मनुभाई मेहता यांची दिवाण म्हणून नियुक्ती.

१९१७ – श्री सयाजी जनरल हॉस्पिटल हुजूर मध्यवर्ती कार्यालय (कोठी).

१९१९ – बॉय स्काउटची हिंदुस्थानमध्ये प्रथम बडोदा येथे स्थापना. मेहेसाणा येथे मुकअंध शाळा (जगात तिसरी शाळा).

१९२३ – गोया गेट (प्रताप नगर) रेल्वे स्टेशनचे उद्घाटन. एस०एन०डी०टी० ची बडोद्यामध्ये स्थापना. कलाभवन सेनापती भवनामध्ये जयसिंह महालामध्ये.

१९२६ – सुवर्ण महोत्सव, कीर्ती मंदिराचा पाया, ओखा बंदराचे उद्घाटन.

१९२७ – महापूर, शिवाजी शोभायात्रा आणि जातीय दंगा.

१९२९ – प्रतापसिंगराव (नातू) आणि शांतादेवी यांचे लग्न.

१९३० – फत्तेसिंगराव (पणतू) यांचा जन्म.

१९३१ – लंडन येथे दुसऱ्या गोलमेज परिषदेमध्ये लोकशाही संघराज्य निर्मितीवर महाराजांचे भाषण. गांधीजींची भेट.

१९३३ – ७१ व्या वाढदिवसानिमित्त महाराष्ट्रामध्ये सर्वत्र महाराजांचा सत्कार आणि मानपत्रे. शिकागो (यू०एस०ए०) येथे जागतिक सर्वधर्म परिषदेमध्ये अध्यक्षपदाचा मान. बरोडा कॉलेजची सुवर्ण जयंती.

१९३४ – दिल्ली येथे अखिल भारतीय हिंदी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद. रोम येथे मुसोलिनी यांची भेट. वॉशिंग्टन येथे प्रो० रुझवेल्ट यांची भेट.

१९३५ – ब्रिटिश लायब्ररी असोसिएशनच्या उपाध्यक्षपदी. सम्राट पंचम जॉर्ज यांची भेट. द लायब्ररी रिव्ह्यू अँड फ्रेंड्स या

संस्थेतर्फे महाराजांच्या सन्मानार्थ भोजन आणि मानपत्र अर्पण.

१९३६ – हिरक महोत्सव, बर्लिन येथे ऑलंपिक क्रीडास्पर्धा आणि हिटलरबरोबर बरोडा-बर्लिन करार. कीर्तीस्तंभ आणि कीर्तीमंदिर यांची स्थापना.

१९३७ – साल्हेर (बागलाण) येथे आदिवासी परिषद. केंब्रिज विद्यापीठाने सन्माननीय कायद्याची पदवी दिली. बीबीसीवर मुलाखत. हरणी विमानतळाची स्थापना.

१९३८ – युरोपच्या शेवटच्या दौऱ्यावरून ३१ ऑक्टोबर रोजी मुंबईमध्ये परत. रणजितसिंह या पणतूचा जन्म. पद्मावती सॅनिटोरियमची स्थापना.

१९३९ – ६ फेब्रुवारी रोजी मुंबई येथील जयमहाल राजमहालामध्ये निधन. ७ फेब्रुवारी रोजी बडोद्यामध्ये अंत्ययात्रा आणि कीर्तीमंदिर येथे अंत्यसंस्कार.

। । ।



# संदर्भ-ग्रंथ-सूची


- आपटे, दाजी नागेश 'सयाजीराव गायकवाड (तिसरे) यांचे चरित्र',
- करंदीकर, अ० ज० 'क्रांतिकारक टिळक नि त्यांचा काळ', काळ प्रकाशन, १९६९,
- केळकर न० चिं०, 'टिळक चरित्र', खंड १,
- घाटे वि० द०, 'दिवस असे होते', मौज, १९९८,
- दादूमिया, 'दलितांचे राजकारण', मॅजेस्टिक, १९७४,
- दादूमिया, दलितांचे राजकारण, मॅजेस्टिक
- दाते, शं० रा०, 'हिंदु सभेच्या कार्याचा इतिहास', काळ प्रकाशन, १९७५.
- नेने, वि० पां० (संपा०) 'सयाजीराव गायकवाड यांची भाषणे', खंड १,
- नेने वि० पां०, 'सयाजीराव यांची भाषणे', भाग २, सावळराम, १९३७,
- बोडस आनंद जयराम, 'प्राचीन भारतीय विमानशास्त्र', मनोरमा,
- वेलकर, प्रताप, महाराष्ट्राच्या उज्वल इतिहासाची अक्षम्य उपेक्षा, मनोरमा,
- सरदेसाई, गो० स० 'सयाजीराव गायकवाड यांच्या सहवासात', १९५६.
- गोवंडे, गं० कृ०, स्मृति विहार, १९७५.
- 'गुराखी जेव्हा राजा होतो'
- नियतकालिके -
- लोकसत्ता रविवार, ६ मे १९७९.
- केसरी, २२ फेब्रुवारी १९५३.
- केसरी, ७ जानेवारी १८९६.
- धर्मभास्कर, सप्टेंबर २००९,

* विविधज्ञान विस्तार' मासिकांचा सुवर्ण महोत्सवी विशेषांक, १९२१.'५० वर्षांपूर्वीचे आणि आताचे महाराष्ट्र',
* शालापत्रक, जानेवारी ७२,

इंग्रजी पुस्तके

* Dadoomiyan '100 years of Muslim Appeasement', 1995.
* Edward Thompson 'Making of the Princes, Oxford, 1944,
* E. L. Totten Ham, 'His Highness of Hindostan',
* Fitz Sir Keneth, 'Twilight of the...'
* Gaekwad Fattesinhrao, 'Sayajirao'
* Hug Toy, 'The springing Tiger'
* Jeffrey, Robin, 'People, Princes and paramadent power', (ed) OUP, 1978, Appendix,
* Kamdar, M. 'Gaekwad of Baroda', Sayajirao III, 1967, unpublished MSS, Chapter 6.
* Sir Mirza Ismile, 'My public Life'
* Nanda, B. R. 'Gokhale' Oxford University Press, 1998.
* Neharu, Jawaharlal, 'What are the Indian States' forword
* Panikkar, K. M. 'His Highness The Maharaja of Bikaner'
* Shishirkumar Mitra, 'Biography of Aurobindo'.
* The Organiser, Weekly, New Delhi, 1 March, 1975.

गुजराती

* पंडित, सुशीला आत्मारामजी, 'म्हेंकती मानवता' (गुज०)
* मेहता, सुमंत, 'आत्मकथा' (गुज०)
* दै० संदेश गुजराथी, ६ जून १९८९.

। । ।

# महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला
## (संच)

| चरित्र-नायक | चरित्र-लेखक |
| --- | --- |
| १. समाजपुरुष जगन्नाथ शंकरशेट | अमला नेवाळक |
| २. आचार्य बाळशास्त्री जांभेकर | व्हि० ए० पाटील |
| ३. समाजसुधारक दादोबा पांडुरंग तर्खडकर | अरुणा दुभाषी |
| ४. समाज-धुरीण डॉ० भाऊ दाजी लाड | अ० प्र० जामखेडकर |
| ५. 'लोकहितवादी' गोपाळ हरी देशमुख | अरुण जोशी |
| ६. समाज-चिंतक विष्णुबुवा ब्रह्मचारी | एन० एम० जैन |
| ७. 'महात्मा' जोतीराव फुले | उमेश बगाडे |
| ८. 'सार्वजनिक काका' जोशी | पुष्पा लिमये |
| ९. प्राच्यविद्या-विशारद डॉ० रा० गो० भांडारकर | वा० ल० मंजुळ |
| १०. बहुभाषाकोविद महादेव मोरेश्वर कुंटे | पुष्पा लिमये |
| ११. विद्वान-प्रशासक शंकर पांडुरंग पंडित | अविनाश सहस्रबुद्धे |
| १२. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे | अरुण टिकेकर |
| १३. नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर | अर्चना ढेकणे |
| १४. 'निबंधमाला'कार विष्णुशास्त्री चिपळूणकर | छाया बकाणे |
| १५. न्यायमूर्ती काशिनाथ त्र्यंबक तेलंग | नरेंद्र चपळगावकर |
| १६. ज्योतिर्भूषण शंकर बाळकृष्ण दीक्षित | अशोक ठाकूर |
| १७. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक | सदानंद मोरे |
| १८. 'सुधारक'कर्ते गोपाळ गणेश आगरकर | अविनाश कोल्हे |
| १९. पंडिता रमाबाई | मीरा कोसंबी |
| २०. महर्षी धोंडो केशव कर्वे | विलास खोले |
| २१. सेवाव्रती रमाबाई महादेव रानडे | माधवी ग० रा० कामत |
| २२. श्रीमंत सयाजीराव गायकवाड | दादूमिया |

# महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला
## (संच)

| चरित्र-नायक | चरित्र-लेखक |
|---|---|
| २३. 'काळ'कर्ते शिवराम महादेव परांजपे | प्र० ना० परांजपे |
| २४. इतिहासाचार्य वि० का० राजवाडे | सुरेश देशपांडे |
| २५. रियासतकार गो० स० सरदेसाई | श० श्री० पुराणिक |
| २६. नामदार गोपाळ कृष्ण गोखले | अशोक मोडक |
| २७. साहित्यसम्राट न० चिं० केळकर | सुरेश जोशी |
| २८. नाट्याचार्य कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर | तारा भवाळकर |
| २९. महर्षी विठ्ठल रामजी शिंदे | सुहास कुलकर्णी |
| ३०. छत्रपती शाहू महाराज | भा० ल० भोळे |
| ३१. रँग्लर र० पु० परांजपे | अनंत देशमुख |
| ३२. बौद्धधर्म-भाष्यकार धर्मानंद कोसंबी | मो० गो० धडफळे |
| ३३. महामहोपाध्याय पां० वा० काणे | पद्माकर दादेगावकर |
| ३४. लोकनायक माधव श्रीहरी अणे | द० ना० धनागरे |
| ३५. सेनापती पांडुरंग महादेव बापट | वासंती फडके |
| ३६. गुलाबराव महाराज | सच्चिदानंद शेवडे |
| ३७. 'समाजस्वास्थ्य'कार र० धों० कर्वे | ज० शं० आपटे |
| ३८. स्वातंत्र्यवीर वि० दा० सावरकर | शं० ना० नवलगुंदकर |
| ३९. 'ज्ञानकोश'कार श्रीधर व्यंकटेश केतकर | मीना वैशंपायन |
| ४०. वनस्पतीशास्त्रज्ञ शंकर पुरुषोत्तम आघारकर | पंडित विद्यासागर |
| ४१. प्रबोधनकार ठाकरे | पंढरीनाथ सावंत |
| ४२. पंडित-सुधारक श्री० म० माटे | विमल भालेराव |
| ४३. कर्मवीर भाऊराव पाटील | रमेश जाधव |
| ४४. घटनेचे शिल्पकार बाबासाहेब आंबेडकर | किशोर गायकवाड |

# महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला
## ( संच )

| चरित्र-नायक | चरित्र-लेखक |
|---|---|
| ४५. आचार्य शंकर दत्तात्रय जावडेकर | राजेश्वरी देशपांडे |
| ४६. आचार्य विनोबा भावे | गणेश राऊत |
| ४७. सहकारमहर्षी विठ्ठलराव विखे पाटील | अनिल शिंदे |
| ४८. आचार्य प्र० के० अत्रे | विलास खोले |
| ४९. कृषितज्ज्ञ पंजाबराव देशमुख | नीतीन रिंढे |
| ५०. कॉम्रेड श्रीपाद अमृत डांगे | वासंती दामले |
| ५१. साने गुरुजी | चैत्रा रेडकर |
| ५२. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | अरुंधती खंडकर |
| ५३. अर्थतज्ज्ञ  धनंजयराव गाडगीळ | सुलभा ब्रह्मे |
| ५४. उद्योगपती शंतनुराव किर्लोस्कर | भा० र० साबडे |
| ५५. स्वामी रामानंदतीर्थ | सुभाषचंद्र वाघोलीकर |
| ५६. मानववंशशास्त्रज्ञ  इरावती कर्वे | रामचंद्र मुटाटकर |
| ५७. गोळवलकर गुरुजी | मधू देवळेकर |
| ५८. संस्कृतिभाष्यकार डी० डी० कोसंबी | अशोक चौसाळकर |
| ५९. तुकडोजी महाराज | प्र० ल० गावडे |
| ६०. विदुषी दुर्गाबाई भागवत | प्रतिभा रानडे |
| ६१. समाजभूषण बाबा आमटे | सुचित्रा घोगरे-काटकर |
| ६२. महाराष्ट्रभूषण यशवंतराव चव्हाण | विश्वास नाईकनवरे |
| ६३. बहुश्रुत-प्रवचनकार बाळशास्त्री हरदास | यशवंत पाठक |
| ६४. समाजहितेच्छू पांडुरंगशास्त्री आठवले | राजेंद्र खेर |
| ६५. विचारवंत नरहर कुरुंदकर | विनोद शिरसाठ |

## श्रीमंत सयाजीराव गायकवाड

(१८६३–१९३९)

प्रजाहितदक्षता, पुरोगामी विचारसरणी, विशाल सामाजिक दृष्टिकोन यामुळे बडोदानरेश श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांचे व्यक्तिमत्त्व आणि कर्तृत्व त्यांच्या समकालीन संस्थानिकांमध्ये आगळेवेगळे दिसते. स्वदेश आणि स्वधर्म यांचा मूलमंत्र मनावर बिंबलेल्या या लोकाभिमुख राजाने लोकसेवेसाठी अवघड असा ज्ञानमार्ग स्वीकारला. त्यासाठी आपल्या संस्थानात सक्तीचे आणि विनामूल्य प्राथमिक शिक्षण सर्वप्रथम सुरू केले. त्यांनी आपल्या राज्यात अस्पृश्यता निवारणाचा कायदा करून अस्पृश्यांच्या शिक्षणाची राहण्या-जेवण्यासह सोय केली. स्त्रीशिक्षणास प्राधान्य देऊन स्त्रियांना प्रशिक्षण देण्यासाठी वेगळे महाविद्यालयही उघडले. अनेकविध शैक्षणिक तसेच सामाजिक सुधारणांच्या जोडीनेच साहित्यविषयक आणि प्रशासनसंलग्न सुधारणा घडवून आणण्यातही सयाजीरावांनी पुढाकार घेतला. ग्रंथप्रसारास व ग्रंथ-कोशनिर्मितीस पाठबळ पुरवून उत्तमोत्तम इंग्रजी ग्रंथांचे अनुवाद मराठी भाषेत व्हावेत, यासाठी त्यांनी प्रोत्साहन दिले. मिश्रविवाह, विधवाविवाह, स्त्रियांचा वारसा, पडदा-पद्धतीवर बंदी, बालविवाह प्रतिबंध यांसारख्या प्रागतिक सामाजिक सुधारणा राबविणाऱ्या सयाजीरावांचा 'आदर्श राजा' असा यथोचित गौरव पंडित मदनमोहन मालवीय यांनी केला आहे.

२२

महाराष्ट्र चरित्र-ग्रंथमाला (संच)

महाराष्ट्र राज्य निर्मितीच्या सुवर्ण महोत्सवी सोहळ्यानिमित्त एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकामधील बुद्धिमान, प्रतिभावान व कर्तबगार मराठी व्यक्तींचा चरित्र ग्रंथमाला संच प्रकल्प

Cover Design: Mohan Thatte




१२८६ सदाशिव पेठ, चिमण्या गणपती जवळ,
पुणे- ४११ ०३०
दूरध्वनी : २४४९३५०२
Email : gandharv_ved@hotmail.com